# न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे.









चित्रशाळा प्रेस पुणें सिटी.

जन्म ता० १८।२।१८४२, मृत्यु १६।१।१९०१.

# श्रीमद्भगवद्गीता.

द्वितीय

## षडध्यायी—भाग पहिला.

चिंतामण गंगाधर भानु.

किंमत २ रुपये.

सद्गुणगणमंडित आणि निष्काम परमेश्वरभक्त

कैलासवासी

न्यायमूर्ती

रावसाहेब महादेव गोविंद रानडे.

एम्. ए., एल. एल. बी., सी. आय. ई.

यांच्या उज्ज्वल आत्म्यास

परमेश्वरस्वरूप व्यक्त करणारी ही षडध्यायी समर्पितों.

# प्रस्तावना

—:**:—

मासिक–पुस्तक–रूपानें गीता समुद्राचें पूर्ण आलोडन केव्हां होईल याचा अजमास करितां येईना, मृत्युलोकची वसति क्षणभंगुर आणि वाचकांचा विशेष तगादा इत्यादि अनेक कारणांनीं श्रीमद्भगवद्गीतेंतील ‘ तत्पद ’ व्यक्त करणारी षडध्यायी ( ७–१२ अध्याय ) पुस्तक-रूपानें प्रकट केली आहे.

परमेश्वरी रूपाचा गीतांतर्गत विचार बाराव्या अध्यायानंतर ‘ द्वितीय षडध्यायीचें तात्पर्य ’ या शिरोलेखाखालीं करीन.

तारीख २० फेब्रुवारी १९०१ } चिंतामण गंगाधर भानु.

# श्रीमद्भगवद्गीता.

## अथ सप्तमोऽध्यायः ।

'योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना ।
श्रद्धावान्भजते यो मां समे युक्ततमो मतः'

इति प्रश्नबीजमुपन्यस्य स्वयमेवेदृश्यं मदीयं तत्त्वमेवं मद्गतान्तरात्मास्यादित्येतद्विवक्षुः—

**शिष्य**—साहाव्या अध्यायाच्या शेवटीं या वरील श्लोकाचा अर्थ आपण मला सांगितला तो समजला व पुढील अध्यायांत सांगावयाचें जें 'तत्पद,' परब्रह्म त्याचा उपन्यास बीजरूपानें तेथें केला आहे वगैरे आपण सांगितलें तेंही समजलें. पण परमेश्वराचें अथवा त्याचें अधिष्ठान जें परब्रह्म त्याचें तत्त्व काय आहे व परब्रह्माशीं अंतःकरण संयुक्त झालें असें केव्हां म्हणावयाचें ह्या प्रश्नांचीं उत्तरें मला समजलीं नाहींत. कृपा करून हें प्रथम सांगावें आणि नंतर पुढील विषयविवेचनास सुरुवात करावी.

**गुरु**—अर्जुनही असेच प्रश्न विचारील असें सर्वज्ञ भगवंतांस तेव्हांच समजलें होतें; म्हणून त्यांनीं आपण होऊनच 'परब्रह्माचे ठिकाणीं असणाऱ्या परमेश्वराचें ( भगवंताचें ) स्वरूप असें आहे व परमेश्वराशीं अंतःकरणाचें लग्न लागतें तें अशा प्रकारानें लागणें' हें सांगण्यासाठींच सातव्या व्याख्यानांतील प्रथम श्लोकास सुरुवात केली आहे. नीट सावधानचित्तानें ऐकः—

**श्रीभगवानुवाच—**

श्रीभगवान म्हणतातः—

**मय्यासक्तमनाः पार्थ**
**योगं युञ्जन्मदाश्रयः ॥**

**असंशयं समग्रं मां**
**यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥ १ ॥**

**पार्थ** ( अर्जुना ! ) **मयि आसक्तमनाः** ( माझ्या ठिकाणीं ज्याचें मन सर्वथा आसक्त झालें आहे )–व–**योगं युञ्जन्** ( ज्यानें आत्मज्ञानपूर्वक योगाचा अभ्यास वैराग्यपूर्णत्वानें चालविला आहे)–व–**मदाश्रयः** ( ज्याचें आश्रयस्थान मी परमेश्वरच, आहे )–असा जो तूं त्या तुला–**यथा समग्रं मां असंशयं ज्ञास्यसि** ( ज्या रीतीनें माझे स्वरूपाचें सर्व ज्ञान निश्चितपणानें होईल ) **तत् शृणु** ( तो प्रकार ऐक )–सारांश, माझ्या ठायीं सर्वथा मन लीन करून आत्मस्वरूपामध्यें ज्यांची समाधि लागते व जे माझे अनन्यभक्त आहेत त्यास माझे स्वरूपाचें यथार्थज्ञान निश्चितपणानें कसें होतें तें ऐक म्हणजे तुलाही माझें पूर्णज्ञान होईल.

**मयि वक्ष्यमाणविशेषणे परमेश्वरे आसक्तं मनो यस्य स मय्यासक्तमना हे पार्थ योगं युञ्जन्मनःसमाधानं कुर्वन्मदाश्रयोऽहमेव परमेश्वर आश्रयो यस्य स मदाश्रयो यो हि कश्चित्पुरुषार्थेन केनचिदर्थी भवति स तत्साधनं कर्माग्निहोत्रादि तपो दानं वा किंचिदाश्रयं प्रतिपद्यतेऽयं तु योगी मामेवाऽऽश्रयं प्रतिपद्यते हित्वाऽन्यत्साधनान्तरं मय्येवाऽऽसक्तमना भवति । यस्त्वमेवंभूतः सन्नसंशयं समग्रं समस्तं विभूतिबलशक्त्यैश्वर्यादिगुणसंपन्नं मां यथा येन प्रकारेण ज्ञास्यसि संशयमन्तरेणैवमेव भगवानिति तच्छृणूच्यमानं मया ॥ १ ॥**

ज्याचें मन माझ्या ठिकाणीं सर्वथा आसक्त झालें आहे—

**शिष्य**—माझ्या म्हणजे परमेश्वराच्या हें ठीक, पण तो ओळखावा कसा ?

**गुरु**—परमेश्वराचे गुण भगवान स्वतःच पुढें सांगणार आहेत. एवं

गुणविशिष्ट परमेश्वराचे ठिकाणीं ज्याचें मन आसक्त, लग्न, झालें आहे; व जो मागील अध्यायांत सांगितल्याप्रमाणें समाधिपूर्वक योगाभ्यास करित असतो आणि परमेश्वर हाच आपला आश्रय आहे असा निश्चय करून शेवटीं माझ्याशीं तादात्म्य पावतो त्याला मात्र माझें खरें स्वरूप समजतें.

**शिष्य**—परमेश्वराचा आश्रय किंवा परमेश्वर हाच आश्रय आहे असें समजून ठेवावयाचें हें मला समजलें नाहीं.

**गुरु**—हे बघ! कोणताही अज्ञानी किंवा ज्ञानी पुरुष घेतला तरी असें आढळेल कीं त्याचें सर्व कर्म कोणत्या तरी हेतूनें होत असतें. तो इष्ट हेतु साध्य करण्यासाठीं जप, तप, दान, अग्निहोत्र इत्यादि कोणत्या तरी एखाद्या साधनाचा आश्रय करून तो आपला इष्ट हेतु साध्य करितो. हें जपतपादि त्याचा आश्रय होतें. द्रव्य मिळण्यासाठीं हल्लींच्या काळीं विद्यार्जन करितात, किंवा पितृलोक मिळण्यासाठीं श्राद्धादि कर्में करितात म्हणजे विद्येचा अगर श्राद्धादिकांचा आश्रय करून ते आपआपले इष्ट हेतु साध्य करितात, त्याचप्रमाणें इतर साधनांचा त्याग करून, ईश्वरानुग्रहाशिवाय अद्वैतवासना उत्पन्न होत नाहीं असें जाणल्यानंतर, माझी श्रद्धापूर्वक भक्ति करून माझाच आश्रय जे करितात, माझ्या ठिकाणीं आसक्त होऊन माझ्या म्हणजे परमेश्वराच्या, सर्वज्ञ, सर्वव्यापी, सर्वदयाघन, अशा शुद्ध स्वरूपाशीं तादात्म्य करून जे योगाभ्यास करितात, ते माझे आश्रित होतात. मीच त्यांचें साधन व मीच साध्य अशी त्यांची निष्काम भक्ति असते. अर्जुना! तूंही अशीच निष्काम भक्ति करून-योगमार्गाचा स्वीकार कर; म्हणजे माझी अनंत शक्ति, माझें अखंड ज्ञान, माझें ऐश्वर्य, इत्यादि जे अनंत गुण त्यांचें तुला संपूर्ण ज्ञान अशा रीतीनें होईल कीं मग तुला परमेश्वरी स्वरूपासंबंधें कोणताही संशय राहणार नाहीं. असो; माझ्या संगतीनें व माझ्या निःसीम भक्तीनें तुला हें स्वरूप समजून घेण्याचा आतांही अधिकार प्राप्त झाला आहे, तेव्हां माझे स्वरूपाचें यथार्थ दिग्दर्शन मी करितों याचें श्रवण कर.

**प्रपाकार, श्रीधर, मधुसूदन, शंकरानंद**—या अध्यायषट्कांत सर्वात्मकस्वरूप प्रतीतीला आणून द्यावयाचें आहे. 'योगाचा अभ्यास माझ्या आश्रयाशिवाय निर्विघ्न कधींही व्हावयाचा नाहीं हें ध्यानांत ठेव.'

**पर्वते**—संशयरहितज्ञान समग्र असतें.

**चतरजी, द्वैतवादी**—'मदाश्रयः' = ( माझी परमेश्वराची इच्छा हाच मोक्षाचा दरवाजा आहे असा ज्याचा निश्चय झाला तो ). ह्या अध्यायषट्कांत 'खरा ईश्वर कोणता' तें सांगितलें आहे.

**द्विवेदी**—'मदाश्रयः' = अहंकार व वासना यांनीं शून्य अशी मनोवृत्ति केवळ परमेश्वरपरच ज्याची असते तो.

**श्रीमद्रामानुज**—ह्या अध्यायषट्कांत सर्वांतर्यामी परम पुरुषाचें स्वरूप व त्याची उपासना सांगितली, भक्ति म्हणजे स्नेहपूर्वक आहे. संतत अनुध्यान होय. ह्या ७ व्या अध्यायांत परमपुरुषाचें स्वरूप, प्रकृतिवैलक्षण्य परमपुरुषाचें ज्ञान, उपासकांचे भेद व ज्ञानी भक्तांचें श्रेष्ठत्व इतके विषय आहेत; असो आसक्त मनाला इष्ट वस्तूचा विरह झाला असतां तें नाश पावतें; यांवरून '.असक्त' शब्दांचें स्वारस्य कळेल.

**द्वैतवादीः**—भगवन्माहात्म्यपर हें षट्क आहे.

**पंडितांचें** या श्लोकावर विस्तृत व्याख्यान आहे त्यांतील एकच ओवी घेतों.....**ज्ञानी सर्वांमध्यें श्रेष्ठ । त्यांत थोर योगनिष्ठ । त्या योगीयांत वरिष्ठ । जरी योगी योजी सगुणभक्ति ॥ "त्वयि मेऽनन्यविषया मतिर्मधुपतेऽसकृत् । रतिमुद्वहतादद्धा गंगेवौघमुपन्वाति ॥"** ( तुझ्या ठिकाणीं माझी अद्वैत प्रीति, अनन्य-भक्ति, जडून ती सदोदित गंगानदीवत् वृद्धिंगत होऊं दे.) ॥ १ ॥

**तच्च मद्विषयम्**—

हें माझेविषयींचें—

**ज्ञानं तेऽहं सविज्ञान-**
**मिदं वक्ष्याम्यशेषतः ॥**

## यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्य-
## ज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥

**सविज्ञानं ज्ञानं** ( प्रत्यक्ष अनुभवासहित ज्ञान ) **इदं** ( -ते-आतां ) **ते अहं** ( तुला मी ) **अशेषतः वक्ष्यामि** ( समग्रतः, संपूर्ण रीतीनें, सांगण्यास प्रारंभ करितों ) **यत् ज्ञात्वा** ( हें ज्ञान समजलें असतां ) **भूयः** ( पुनः ) **अन्यत् ज्ञातव्यं न इह अवशिष्यते** ( आणखी कांहीं एक जाणावयाचें येथें राहत नाहीं. )—सारांश तुला आतां स्वानुभव येईल असें परमेश्वरविषयक ज्ञान संपूर्णत्वानें सांगतों कीं जें समजलें असतां आणखी कांहीं समजून घ्यावयाचें उरत नाहीं. मनुष्य सर्वज्ञच होतो.

**ज्ञानं ते तुभ्यमहं सविज्ञानं विज्ञानसहितं स्वानुभवसं-युक्तमिदं वक्ष्यामि कथयिष्याम्यशेषतः कार्त्स्न्येन । तज्ज्ञानं विवक्षितं स्तौति श्रोतुरभिमुखीकरणाय । यज्ज्ञात्वा यज्ज्ञानं ज्ञात्वा नेह भूयः पुनर्ज्ञातव्यं पुरुषार्थसाधनमवशिष्यते नाव-शेषो भवतीति मत्तत्त्वज्ञो यः सः सर्वज्ञो भवतीत्यर्थः । अतो विशिष्टफलत्वाद्दुर्लभं ज्ञानम् ॥ २ ॥**

ज्ञान म्हणजे शास्त्रीय ज्ञान आणि विज्ञान म्हणजे अनुभवयुक्त ज्ञान होय. ज्ञानाचा प्रत्यक्ष अनुभव येणें, शास्त्रांतील सिद्धांतांचा प्रत्यक्ष परिचय होणें, जसें शास्त्र सांगतें तशीच स्थिति आहे असें कळणें, याचें नांव विज्ञान होय. हें ज्ञान तुला आतां विज्ञानासहित आतां कांहीं एक शिलक बाकी न ठेवितां, संपूर्णत्वानें, सांगतों.

**शिष्य**—म्हणजे पृथ्वी वाटोळी आहे व ती आपल्या सभोंवतीं व सूर्यासभोंवतीं नित्य हिंडत असते हें शास्त्रीयज्ञान प्रत्यक्ष अनुभवानें सिद्ध करून देतों अशासारखेंचना ?

**गुरु**—होय हें विज्ञानसहित ज्ञान अशेषतः म्हणजे साधनफलासहित प्राप्त झालें असतां त्याची फलश्रुति अशी आहे कीं ज्याला हें सविज्ञान ज्ञान विस्तरतः साध्य झालें त्याला पुरुषार्थसिद्धीसाठीं,

आपले इष्टतम हेतु साध्य करण्यासाठीं, अन्य ज्ञानसाधनाची अपेक्षाच राहत नाहीं.. भगवान म्हणतात सारांश माझें ( परमेश्वराचें ) तत्त्व ज्यास समजलें तो सर्वज्ञ होतो; कृतार्थ होतो, असा या ज्ञानाचा विशेष आहे म्हणून तें दुर्लभ आहे.

**शिष्य**—हें कशाला सांगितलें?

**गुरु**—मुमुक्षु श्रोत्याचें लक्ष्य इकडे समग्र लागावें म्हणून. शिवाय परमेश्वराशिवाय अन्य कोणासही हें असलें स्वस्वरूपविषयकज्ञान सांगतां येणें शक्य नाहीं. म्हणून हें गीताशास्त्र ईश्वरीप्रेरणेनें सिद्ध झालें आहे हें तुला आतां सांगावयास नकोच. तसेंच हें ज्ञान समजून घेण्याला विशेष योग्यता लागत असते म्हणून सांगणारा परमेश्वर भेटला तरी श्रोत्यास तें समजत नाहीं म्हणून ही हें ज्ञान दुर्लभ होय.

**प्रपाकार**—सर्वात्मकत्वस्थिति साकल्यानें समजली असतां जाणावयाचें असें आणखी कांहीं उरत नाहीं.

**मधुसूदन, चतरजी**:—'एकविज्ञानेन सर्वं विज्ञातं भवति' ही श्रुति देतात. अर्थ स्पष्ट आहे.

**पर्वते**—सत्य, ज्ञान, आनंद इत्यादि स्वरूपाचें (ब्रह्माचें) परोक्ष ज्ञान झालें तरी 'मी ईश्वर नाहीं, संसारी, सुखी, दुःखी, कर्ता, भोक्ता आहे' असा जो अपरोक्ष भ्रम होतो त्याची निवृत्ति साक्षात्कारानें, अपरोक्षज्ञानानें, (विज्ञानानें) होते. सर्वजगांस सद्रूप ब्रह्मच कारण आहे, नामरूप मिथ्या आहे, नामरूप सोडून जग पाहिल्यास तें ब्रह्मरूपच आहे असें समजल्यावर सर्वज्ञता प्राप्त होते.

**श्रीमद्रामानुजः**—विज्ञान म्हणजे विविक्तज्ञान. इतर पदार्थांपासून भिन्न करणारें असें एका पदार्थाचें लक्षण करून त्यानें तो पदार्थ जाणणें तें विविक्तज्ञान होय. हें जाणलें असतां **माझ्या ठिकाणीं** आणखी कांहीं जाणावयाचें राहत नाहीं.

**द्वैतवादी**:—'विज्ञान म्हणजे विशेष ज्ञान.'

**ज्ञानेश्वर**—प्रपंचज्ञानाला विज्ञान ह्मणतात. पण हा असा अर्थ करण्यापेक्षां विज्ञान म्हणजे ब्रह्मतत्त्वानुभवज्ञान असा अर्थ करणें बरें

**पंडित**—व्यतिरेकज्ञान ( हें दृश्य जगत् नाहीं सत्य, ब्रह्म नाहीं, हें ज्ञान. ) हें ज्ञान आणि अन्वयज्ञान ( सर्व एकच आहे, अनेकांत एक व एकांत अनेक असें ज्ञान ) हें विज्ञान. निर्गुणज्ञान झालें तरी सगुणभक्तीनें योग झाल्याशिवाय खरें सुख नाहीं, असें पंडितांचें म्हणणें आहे.

**डेव्हिस** यांनीं विज्ञानाचा अर्थ मानवी ज्ञान असा केला आहे!

**टॉमसन** ह्मणतात—विज्ञान म्हणजे विशिष्टज्ञान, ( आत्मज्ञान, आत्मानात्मज्ञान. ) ॥ २ ॥

कथमित्युच्यते—

हें कसें तें सांगतातः—

**मनुष्याणां सहस्रेषु**
**कश्चिद्यतति सिद्धये ।**
**यततामपि सिद्धानां**
**कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ ३ ॥**

**मनुष्याणां सहस्रेषु कश्चित् सिद्धये यतति** ( मनुष्ययोनींतील हजारों प्राण्यांपैकीं क्वचित् एखादाच पुरुष, आपल्यास मुख्य पुरुषार्थ साध्य व्हावा, असा प्रयत्न करितो )—आणि—**यततां सिद्धानां अपि कश्चित् मां तत्त्वतः वेत्ति** ( अशी खटपट करणाऱ्या हजारों सिद्धांपैकीं एखाद्यालाच माझें तात्त्विक ज्ञान, माझें यथार्थ स्वरूप, समजतें )—अर्थ स्पष्ट आहे.—

मनुष्याणां मध्ये सहस्रेष्वनेकेषु कश्चिद्यतति प्रयत्नं करोति सिद्धये सिद्ध्यर्थं तेषां यततामपि सिद्धानां सिद्धा एव हि ते ये मोक्षाय यतन्ते तेषां कश्चिदेव मां वेत्ति तत्त्वतो यथावत् ॥ ३ ॥

इतर प्राण्यांची गोष्ट बोलावयास नकोच. आतां या पृथ्वीवर शेकडों लक्ष मनुष्यें, विचारवंत प्राणी आहेत; पण त्यांपैकीं एखाद्या पुण्य प्रकृतीलाच परमार्थ साधावा, आत्मज्ञान व्हावें, अशी बुद्धि उत्पन्न होऊन तो परमार्थाच्या साधनास एकाग्रतेनें प्रयत्न करितो; आणि असल्या श्रवण मननादिकांच्या साहाय्यानें प्रयत्न करणाऱ्या सिद्धांपैकीं, सिद्धि प्राप्त होईपर्यंत प्रयत्नकर्त्यांपैकीं एखाद्यालाच माझें म्हणजे परमेश्वराचें –मत्प्रसादानें–यथार्थ ज्ञान होतें; म्हणजे ईश्वर, जीव आणि जगत् एकच होत, असें ज्ञान होतें.

**शिष्य**—सिद्ध म्हणजे चित्तशुद्धि करून स्वस्वरूपाशीं तादात्म्य पावण्यासाठीं वेदांतशास्त्रें आणि योगमार्ग यांचे द्वारा प्रयत्न करणारे पुरुष, असाच अर्थ?

**गुरु**—होय. बरोबर समजलास. वत्सा! हरीच्या मायेचें अवरण ( जीवांस प्राप्त झालेल्या इच्छास्वातंत्र्याचा दुरुपयोग केल्यानें ) इतकें दुस्तर झालेलें असतें कीं साक्षात् व अपरोक्ष असणारा जो परमार्थ तो साधावा अशी बुद्धि फारच थोड्यांस होते आणि त्यांतील एखाद्यासच खरा मार्ग सांपडतो! 'आपल्या कर्मांच्या प्रतिबंधानें, मायेनें, अपरोक्ष असणारें ब्रह्म आपल्यास दिसत नाहीं!' असें स्वामी मधुसूदनीकार म्हणतात तें सर्वथा सत्य होय.

**पर्वते**—'तत्त्वतः' = स्वात्मत्वेंकरून.

**द्वैतवादी**—मुक्ति ह्मणजे या अध्यायांत जीवन्मुक्ति असें ह्मणतात.

**ज्ञानेश्वर—आस्थेच्या महापुरीं। रिघताती कोटीवरी। परी प्राप्तीच्या तीरीं। विपाइला ( एखादाच ) निघे!**

सर्व उपनिषदांचें तात्पर्य पाहिलें असतां 'प्रयत्न केला तर अनंत ब्रह्माचें मला ज्ञान होईल, स्वरूप मिळेल.' हा विश्वास, ही श्रद्धा, साक्षात्काराला विशेष उपयोगी पडते, असें दिसेल. ॥ ३ ॥

**श्रोतारं प्ररोचनेनाभिमुखीकृत्याऽऽह—**

याप्रमाणें श्रोत्याची चित्तवृत्ति परमार्थाकडे वळेल अशी पण सत्य, फलश्रुति सांगून भगवान म्हणतातः—

भूमिरापोऽनलो वायुः
खं मनो बुद्धिरेव च ॥
अहंकार इतीयं मे
भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥

**भूमिः, आपः, अनलः, वायुः, खं, मनः, बुद्धिः एव च, अहंकारः, इति इयं मे प्रकृतिः अष्टधा भिन्ना** (पृथ्वी, जल, अग्नि, वायु, आकाश, मन, बुद्धि, आणि अहंकार अशा आठ प्रकारांनीं माझें स्वरूप भिन्न झालें आहे, सारांश मी अष्टमूर्ती झालों आहें.)

**भूमिरिति पृथिवीतन्मात्रमुच्यते न स्थूला 'भिन्ना प्रकृतिरष्टधा' इति वचनात् । तथाऽबादयोऽपि तन्मात्राण्येवोच्यन्ते । आपोऽनलो वायुः खं मन इति मनसः कारणमहंकारो गृह्यते । बुद्धिरित्यहंकारकारणं महत्तत्त्वम् । अहंकार इत्यविद्यासंयुक्तमव्यक्तम् । यथा विषसंयुक्तमन्नं विषमुच्यत एवमहंकारवासनावदव्यक्तं मूलकारणमहंकार इत्युच्यते प्रवर्तकत्वादहंकारस्य । अहंकार एव हि सर्वस्य प्रवृत्तिबीजं दृष्टं लोके । इतीयं यथोक्ता प्रकृतिर्मे ममैश्वरी मायाशक्तिरष्टधा भिन्ना भेदमागता ॥ ४ ॥**

आपली संपूर्णता, सृष्ट्यादिकांची कर्तृत्वता व सर्वात्मकता प्रकट करण्यासाठीं प्रथमतः गौणप्रकृतीचें वर्णन देत आहेत हें ध्यानांत ठेव आँ.—पहाः-पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश ह्या पंचमहाभूतांच्या तन्मात्रा म्हणजे गंध, रस, रूप, स्पर्श व शब्द हे पंच सूक्ष्म प्रकार—

**शिष्य**—पृथ्वी इत्यादिकांची स्थूल स्वरूपेंच कां नाहीं घेत?

**गुरु**—कारण '**प्रकृति** म्हणजे मूळस्वरूप हें आठ प्रकारचें आहे' असें सांगितलें आहे म्हणून. पृथ्वी हा गंधाचा परिणाम, विकार, आहे. मूळस्वरूप गंधच होय. त्याचप्रमाणें इतरांची व्यवस्था सम-

जावयाची; तेव्हां आदिस्वरूप घेणें इष्ट आहे म्हणून गंध रस इत्यादिक घेतले. नंतर सहावा प्रकार म्हणजे मन. आतां मन शब्दानें त्याचें कारण जो अहंकार तोच घेतला पाहिजे. अरे! गडबड करूं नको! मी काय सांगतों तें ऐकून मग विचार करावें.—सातवा प्रकार बुद्धीचा: बुद्धि म्हणजे अहंकाराचें कारण जें महत्तत्त्व (समष्टि बुद्धि) तें होय. आणि आठवा अहंकार म्हणजे अविद्यायुक्त जें अव्यक्त तें होय. पहा कीं अन्नांत विष कालविलें असतां ज्याप्रमाणें सर्व अन्नास विष अशी संज्ञा प्राप्त होते, त्याचप्रमाणें मूलकारण जें अव्यक्त तें अहंकार आणि वासना यांनीं परिपूर्ण आहे म्हणून त्या अव्यक्तास अहंकार असें म्हटलें. शिवाय अहंकारामुळेंच सर्वत्र प्रवृत्ति आहे. व्यवहारांत जी प्रवृत्ति दिसते त्याचें बीज, आदिकारण पाहिलें असतां अहंकारच दिसून येतो, येणेंप्रमाणें गंध, रस, रूप, स्पर्श, शब्द, अहंकार, महत्तत्त्व, आणि अव्यक्त अशा आठ प्रकारच्या भिन्न स्वरूपांनीं 'माझी' अनिर्वचनीय प्रकृति, ईश्वराची मायाशक्ति, प्रकट झाली आहे. समजलें? मन म्हणजे अहंकार, बुद्धि म्हणजे महत्तत्त्व आणि अहंकार म्हणजे अव्यक्त असें अर्थ कां घ्यावयाचे याचें कारण समजलेंना? कार्य न घेतां कारण घेतलें म्हणजे मूळस्वरूप कळतें. ह्याचा विस्तार १३ व्या अध्यायांत व्हावयाचा आहे. तेथें २४ तत्वें सांगितलीं त्यांचा अंतर्भाव वरील आठ तत्त्वांत होतो. (म्हणजे पृथ्वी, आप, इत्यादिकांत १० तत्वें, अहंकारांत पंच ज्ञान व पंच कर्मेंद्रियें व मन अशीं अकरा, बुद्धि (महत्तत्त्व) अहंकार अविद्या) असा अंतर्भाव आहे.

**श्रीधर**—तन्मात्रासह पंचभूतांची स्थूलस्वरूपें, अहंकारासहित अहंकारजन्य सर्व इंद्रियें, इत्यादि असाही एक अर्थ करितात.

**शंकरानंद**—'**मायां तु प्रकृतिं विद्यात्**' ही श्रुति स्पष्टच आहे.

**पर्वते**—'**अभिन्ना प्रकृतिः**'=(माझ्याहून भिन्न नव्हे अशी आभासरूपी प्रकृति, असा निराळाच अर्थ काढितात.

**द्वैतवादी**—'नारदीय' पुराणांतून समानार्थक श्लोक सांगतात.॥४॥

**अपरेयमितस्त्वन्यां**
**प्रकृतिं विद्धि मे पराम् ॥**
**जीवभूतां महाबाहो**
**ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥**

**अपरा इयम्** ( ही वर सांगितलेली प्रकृति गौण, कमी दर्जाची आहे ) **इतः अन्यां मे परां प्रकृतिं** ( इच्यापासून निराळी अशी माझी प्रधानप्रकृति ) **विद्धि** ( जाणून ठेव )–ती कशी आहे तर ऐक–**जीवभूतां** ( ती चैतन्ययुक्त आहे ) **महाबाहो** ( आजानुबाहू अर्जुना ! ) **यया इदं जगत् धार्यते** ( इच्यामुळें हें सर्व विश्वचक्र आधारभूत झालेलें आहे. )–सारांश जड प्रकृतिहून व्यतिरिक्त अशी चैतन्ययुक्त जी प्रकृति आहे व जिचा आधार सर्व विश्वचक्रास आहे ती श्रेष्ठ प्रकृति समजून घेतली पाहिजे.–

**अपरेति । अपरा न परा निकृष्टाऽशुद्धाऽनर्थकरी संसारबन्धनात्मिकेयमितोऽस्या यथोक्तायास्त्वन्यां विशुद्धां प्रकृतिं ममाऽऽत्मभूतां विद्धि मे परां प्रकृष्टां जीवभूतां क्षेत्रज्ञलक्षणां प्राणधारणनिमित्तभूतां हे महाबाहो यया प्रकृत्येदं धार्यते जगदन्तःप्रविष्टया ॥ ५ ॥**

**शिष्य**—अपरा म्हणजे काय ?

**गुरु**—म्हणजे श्रेष्ठ नव्हे ती; कनिष्ठ प्रतीची; सारांश जड, अशुद्ध, विकारपूर्ण, अनर्थ करणारी म्हणजे संकटांत लोटणारी, संसाराचें बंधन म्हणजे जन्ममरणाचें चक्र उत्पन्न करावें हाच जिचा स्वभाव अशी ही मागील श्लोकांत सांगितलेली प्रकृति आहे. पण या आतांच वर्णिलेल्या प्रकृतीहून निराळी अशी जी शुद्ध, विकारशून्य, अशी श्रेष्ठ प्रकारची परा प्रकृति आहे ती जाणून घे. ही प्रकृति म्हणजे माझा केवळ आत्माच होय. क्षेत्रज्ञ म्हणजे जाणणेपणा, ज्ञातृत्व, हेंच या प्रकृतीचें लक्षण आहे. विश्वांत प्राण म्हणून

जी अद्भुतशक्ति आहे, सारांश चैतन्य म्हणून जी वस्तु आहे ती या श्रेष्ठ प्रकृतीच्या अस्तित्वामुळेंच उदयास येते. ही सर्व विश्वगत पदार्थांच्या अंतर्यामीं आहे म्हणूनच हें विश्वचक्र सुरळीत चाललें आहे. अशा प्रकारची ही श्रेष्ठ प्रकृति आहे.

**मधु०:**—'**अनेन जीवेनाऽऽत्मनाऽनुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणि**' अशी श्रुति आहे.

**शंकरानंद**—'**पराऽस्य शक्तिर्विविधैव श्रूयते.**' (याची शक्ति श्रेष्ठ असून नाना प्रकारची आहे. श्वेता० ६।८). तोषण, पोषण, रक्षणादि क्रिया या परा प्रकृतीमुळें होतात.

**मधुसूदन, पर्वतेः**—या जीवस्वरूप प्रकृतीनें कर्म केलेलें असतें म्हणून परमेश्वरास जग उत्पन्न करून प्राण्यांस त्याच्या शुभाशुभ कर्मांचें फल उपभोगिण्यास लावावें लागतें. सर्व जीवांचा फलोपभोग संपला म्हणजे जगाचा लय होतो.

**द्विवेदी**—परा प्रकृति = क्षेत्रज्ञ = सांख्योक्त पुरुष.

**रामानुज**—'जगत्' = अचेतन जगत्.

**द्वैतवादी**—सर्वदा विद्यमान असणारी ती जीवभूत प्रकृति. या दोन्ही प्रकृति मला वश आहेत. या जीवभूत प्रकृतींत लक्ष्मी व मुक्त लोक यांचा अंतर्भाव होतो असें यांचें मत आहेसें दिसतें.

**ज्ञानेश्वर**--**जे जडातें जीववी। चेतनेतें चेतवी। मनाकरवीं मानवी** (मानविते) **। शोक मोहो॥ पै बुद्धीच्या अंगीं जाणणें। तें जिये जवळिकेचें** (सन्निधतेचें) **करणें। जिया अहंकाराचें विंदाणें** (कौशल्यानें) **। जगचि धरिजे॥**

**पंडित**—'परा प्रकृति' = सत्वशुद्ध प्रकृति. (अंतःकरणाची चिच्छक्ति) = क्षेत्रज्ञ. क्षेत्र (object) आणि क्षेत्रज्ञ (subject) हे शब्द विषय आणि विषयज्ञाता यांस चांगले शोभतात. ॥ ५ ॥

**एतद्योनीनि भूतानि**
**सर्वाणीत्युपधारय ॥**

**अहं कृत्स्नस्य जगतः**
**प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥**

**सर्वाणि भूतानि एतद्योनीनि इति उपधारय** (अर्जुना! असें निश्चितपणानें समजून ठेव कीं यच्चावत भूतांची उत्पत्ति या दोन परा व अपरा प्रकृतींपासून झालेली आहे.)–म्हणून–**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः तथा प्रलयः** (मी संपूर्ण जगताचा उत्पन्नकर्ता व त्याचप्रमाणें संहारकर्ताही आहे.)–सारांश विश्वामधील सर्व चराचर वस्तु या दोन प्रकृतींपासून उत्पन्न झालेल्या आहेत. आणि ज्या अर्थीं ह्या दोन्ही प्रकृति माझींच स्वरूपें आहेत त्या अर्थीं मीच सर्व विश्वाची उत्पत्ति करणारा व संहार करणारा आहे.–

**एतदिति । एतद्योनीन्येते परापरे क्षेत्रक्षेत्रज्ञलक्षणे प्रकृती योनिर्येषां भूतानां तान्येतद्योनीनि भूतानि सर्वाणत्येवमुपधारय जानीहि । यस्मान्मम प्रकृती योनिः कारणं सर्वभूतानामतोऽहं कृत्स्नस्य समस्तस्य जगतः प्रभव उत्पत्तिः प्रलयो विनाशस्तथा प्रकृतिद्वयद्वारेणाहं सर्वज्ञ ईश्वरो जगतः कारणमित्यर्थः ॥ ६ ॥**

ह्या ज्या क्षेत्र क्षेत्रज्ञ अशा दोन प्रकृति आहेत—

**शिष्य**—क्षेत्र तें काय?

**गुरु**—हा विषय पुढें येईलच. आतां इतकें ध्यानांत ठेव कीं जाणण्याचा जेवढा विषय तें क्षेत्र आणि त्या विषयाला जाणणारा तो क्षेत्रज्ञ. समजलें? अपरा प्रकृति म्हणजे क्षेत्र आणि परा प्रकृति म्हणजे क्षेत्रज्ञ. अपरा प्रकृति देह उत्पन्न करिते व परा प्रकृति जीवाचें कारण आहे. असो; तेव्हां सर्व चराचर वस्तु या क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ नामक प्रकृतींपासून निर्माण झाल्या आहेत. चराचर वस्तूंचें उत्पत्तिस्थान या दोन प्रकृति आहेत. आणि या दोन्ही प्रकृति माझींच भिन्न स्वरूपें आहेत म्हणून मी सर्व चराचर विश्वाचा उत्पादक

आहे व संहारकही आहे. सारांश या दोन प्रकृतींच्या द्वारें सर्वज्ञ जो मी ईश्वर तो जगताचें कारण आहे.

**प्रपाकार**--**य इमा विश्वा भुवनानि जुह्वदृषिर्होता न्यषीदत्पिता नः । स आशिषा द्रविणमिच्छमानः प्रथमच्छदवराना-विवेश ॥ ऋक्शाखीया श्रुतिः ॥** ( ज्या परमेश्वरानें प्रलयकालाचे वेळीं हे पृथिव्यादि सप्तलोक स्वस्वरूपीं आकर्षून घेतलें आणि सर्वज्ञत्व स्वरूपानें आपण एकटाच असता झाला, त्यालाच पुनः जगद्भोगाची इच्छा उत्पन्न होऊन त्यानें आपलें पारमार्थिक स्वरूप अंतर्हित केलें आणि स्वतः पासून उत्पन्न झालेल्या प्राणीशरीरामध्यें प्रवेश करितां झाला. )

**मधुसूदन**--मी सर्वज्ञ, सर्वेश्वर, अनंतशक्ति, मायावी सर्व जगांचा उत्पादक व या स्वाप्निक प्रपंचाचा संहार कर्ता मीच आहें. मीच द्रष्टा व स्रष्टा हा प्रपंच मायेनें उत्पन्न करून त्याचा नाश करितों. उपादान व निमित्त कारण मीच आहें.

**शंकरानंद**--या दोन प्रकृतींची उपाधि लागल्यावर सर्वज्ञ व सर्वशक्तिमान परमेश्वर सर्व जगतांचा, स्थूल, सूक्ष्म आणि तत्कारणांचें उपादान कारण होऊन कर्ता, नियंता व संहारकर्ता होतो.

**द्विवेदी**-प्रत्येक पदार्थ चिद्-अचिद् रूप आहे. सर्व चिदचिद् मिळून ब्रह्मावर आभासरूपानें असणारें जगत् ब्रह्माशिवाय संभवतच नाहीं.

**द्वैतवादी**—प्रकृतींचा उदय व लय करित असतां मला सुखच होत असतें.

**ज्ञानेश्वरांनीं** येथें टांकसाळ, नाणें, चलनी नाणें, असें एक प्रकृती-वर रूपक केलें आहे तें विस्तृत म्हणून घेत नाहीं, पण गीताभक्तांनीं अवश्य वाचावें.

**पंडितांचा** विस्तार फार ! एकच ओवी घेतोः **तेव्हां निर्गुणातेंचि ईश्वरपण । निर्गुणत्वेंचि मी सगुण । तोचि मी स्वयें आपण । सृष्टि, स्थिति, संहार ॥** निर्गुणानें सर्वात्मयोग व सगुणानें भक्तियोग साधतो. ॥ ६ ॥

**यतस्तस्मात्—**

असें आहे म्हणून—

**मत्तः परतरं नान्य-**
**त्किंचिदस्ति धनंजय ॥**
**मयि सर्वमिदं प्रोतं**
**सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥**

**धनंजय** ( अर्जुना ! ) **मत्तः परतरं अन्यत् किंचित् न अस्ति** ( माझ्याशिवाय अन्य असें कोणतेंही कारण नाहीं; किंवा माझ्याहून श्रेष्ठ असें दुसरें कांहीं नाहीं ) **सूत्रे मणिगणा इव** ( सूत्रामध्यें, दोरीमध्यें अनेक मणी गोंवलेले असतात त्याप्रमाणें ) **मयि इदं सर्वं प्रोतं** ( माझ्यामध्येंच हें सर्व गोंवून गेलेलें आहे. )–सारांश परमेश्वराशिवाय अन्य किंवा श्रेष्ठ असें कारण नाहीं. ज्याप्रमाणें सूत्रामध्यें मणी गोंविलेले असतात, त्याप्रमाणें हें सर्व चराचर विश्व माझ्या आधारावर स्थित झालेलें आहे.—

**मत्तः परमेश्वरात्परतरमन्यत्कारणान्तरं किंचिन्नास्ति न विद्यतेऽहमेव जगत्कारणमित्यर्थः । हे धनंजय यस्मादेवं तस्मान्मयि परमेश्वरे सर्वाणि भूतानि सर्वमिदं जगत्प्रोतमनुस्यूतमनुगतमनुविद्धं ग्रथितमित्यर्थः । दीर्घतन्तुषु पटवत्सूत्रे च मणिगणा इव ॥ ७ ॥**

उत्पत्ति–संहाराचें कारण मीच आहें हें गेल्या श्लोकांत सांगितलें. येथें ( या श्लोकांत मीच ) स्थितिकारण आहे असें सांगतात.—

अर्जुना ! मी जो परमेश्वर आहे—

**शिष्य**—गुरुराज ! प्रकृतीच्या पलीकडचा पुरुष जसा श्रेष्ठ-कारण आहे, तद्वतच परमात्म्याच्या, परमेश्वराच्या ही पलीकडचें श्रेष्ठतर असें एक कारण असलेंच पाहिजे.

**गुरु**—तेंच ऐक. भगवान म्हणतात दोन्ही प्रकृतींचा, क्षेत्रक्षेत्रज्ञांचा स्वामी जो मी मायेचा धनी परमेश्वर, त्या माझ्याहून श्रेष्ठ कारण असणें संभवनीय किंवा शक्यच नाहीं. सर्व जगतांचें अतिश्रेष्ठ कारण व स्थिति कारण मीच आहें. असें आहे म्हणून हीं सर्व चराचर भूतें व हें सर्व विचित्र जगत् माझ्यामध्येंच ओंवून गेलेलें, स्वरूपास प्राप्त झालेलें, सारांश माझ्यामुळें प्रकट झालेलें आहे. कसें ? तर ज्याप्रमाणें दीर्घ तंतु असतात म्हणून पट दिसतो, किंवा सूत्र असतें म्हणून माळेचे चित्रविचित्र मणी साधार असतात त्याचप्रमाणें होय.

**मधुसूदन**--सत्ता व स्फुरण रूपानें सर्व मायिक पदार्थांस उत्पन्न करून त्यांसच प्रकाश देणाऱ्या माझ्याशिवाय श्रेष्ठ वस्तुच नाहीं. 'हें जगत् माझ्यामध्यें आहे व मी आहें म्हणून आहे.' हें म्हणणें व्यावहारिकच होय. वस्तुतः माझ्याशिवाय अन्य वस्तूच नाहीं. कल्पित जग अर्थातच माझ्याहून श्रेष्ठ नसावयाचें.

**शंकरानंद**--येथें सांख्य व नैयायिक यांचे खंडन 'प्रकृति व परमाणु हे शेवटचें कारण नाहींत, शेवटचें कारण मीच आहें.' असें सांगून केलें. ब्रह्मसूत्रांत या सर्व वादांचें खंडन उत्तम केलें आहे. **"यः सर्वज्ञः सर्वविद्यस्य ज्ञानमयं तपः । एष सर्वेश्वर एषोऽतर्याम्येष योनिः सर्वस्य प्रभावाप्ययौ हि भूतानां"** याप्रमाणें सर्वज्ञ, सर्ववित्, सर्वशक्ति, सर्वनियामक, सर्वकारण, सर्वाधार, आणि सर्वसंहारक परमेश्वराचें अस्तित्व श्रुतीनें सांगितलें आहे. शिवाय वस्तुतः जगत् आणि मी भिन्न नाहीं. एकच आहों. सूत्र आणि मणी भिन्न दिसतात, तरी वस्तुतः एकच म्हणजे 'मौतिक' असतात, तद्वतच जगत् आणि जगत्कारण एकच आहेत. परमेश्वर स्वकारण (Self-cause) आहे.

**पर्वत्यांचा** अभिप्राय शंकरानंदांच्या उलट भासण्याचा संभव आहे. सूत्र आणि मणी हे पर्वत्यांनीं 'भिन्न दिसतात ते व्यवहारांत दिसतात' असें स्पष्ट म्हटलें आहे. तथापि त्यांचें व्याख्यान घोंटाळ्यांत घालणारें आहे.

**चतरजी**—सूत्र दिसत नसतांही जसे मणी त्याच्या आधारावर आपआपल्या स्थळीं असतात, त्याचप्रमाणें ज्ञानस्वरूपाच्या आधारावर हें विचित्र भासणारें जगत् स्थित होतें. (इसाया अध्याय ४४ श्लोक ६ पहा.) **कुराणां**तही असेंच वाक्य आहे.

**द्विवेदी**—येथें अद्वैत सिद्धि करून "'अस्ति, भाति, प्रिय, नाम आणि रूप' हीं जीं पांच रूपें वस्तूंची भासतात तीं ब्रह्माच्या सत्, चित् आणि आनंद स्वरूपानें भासतात; नामरूप मिथ्याच आहे" हें उत्तम सिद्ध केलें आहे.

**रामानुज**—सर्व कारणांचें कारण म्हणून आणि माझें ज्ञान, शक्ति, बल इत्यादि अमोघ आहेत म्हणून मी सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहें. जगत् हें माझ्यामध्यें आहे, तरी माझ्याहून भिन्न आहे, असा आग्रह या आचार्यांचा आहे.

**द्वैतवादी**—'दुःखी असतात म्हणून जीव कनिष्ठ, दुःख देणारी म्हणून प्रकृति कनिष्ठ होय. स्थूलापासून लक्ष्मीपर्यंत सर्व कनिष्ठ. आणि या सर्वांचा आधार, सुखहेतु, म्हणून विष्णु श्रेष्ठ. लक्ष्मीस कधीं दुःख होत नाहीं म्हणून ती परा; मुक्तांस कधीं कधीं दुःखसंबंध येतो! म्हणून ते पराभास आणि केवळ सुख देणारा म्हणून हरि श्रेष्ठ होय.'

**ज्ञानेश्वर**—हें (दृश्य विश्व) **रोहिणीचें जळ** (मृगजळ)**। तयाचें पाहतां येईजे मूळ। तें रश्मि नव्हती केवळ। होईजे भानु॥.... सुवर्णाचे मणी केले। ते सोनियाचे सुतीं ओविले। तैसें म्यां जग धरिलें। सबाह्याभ्यंतरीं॥**

**पंडित**—म्हणतात कीं, सूत्रमण्याच्या दृष्टांतानेंच आश्रय-आश्रितभाव, सेव्यसेवकभाव सिद्ध झाला; निर्गुण ज्ञान झालें तरी पंडितांस सगुणभक्ति सोडवत नाहीं. सारांश अहंविषयज्ञान नाहींसें व्हावयाचें नाहीं असा यांचा संकेत दिसतो.

**डेव्हिस**—महाभारतांतील शांतिपर्वांत अशीच मणीसूत्राची कल्पना आहे.

**सरकार**—कवि मूर म्हणतोः—

Thou art oh God ! the life and light
Of all the wondrous world we see
Its glow by day, its smile by night,
Are but reflections caught from thee.॥ ७ ॥

**केन केन धर्मेण विशिष्टे त्वयि सर्वमिदं प्रोतमित्युच्यते—**

**शिष्य**—हे जग तर विचित्र दिसतें; तेव्हां कोणकोणते धर्म परमेश्वरस्वरूपामध्यें प्रकट झाले म्हणजे हे विचित्र जग परमेश्वरांत ओवलेलें आहे असें कळेल.

**गुरु**—तेंच सांगतात ऐकः—

**रसोऽहमप्सु कौन्तेय**
**प्रभाऽस्मि शशिसूर्ययोः ॥**
**प्रणवः सर्ववेदेषु**
**शब्दः खे पौरुषं नृषु. ॥ ८ ॥**

**अप्सु अहं रसः कौन्तेय** (कुंतीपुत्रा! मी जलामधील रस आहे) **शशिसूर्ययोः प्रभा अस्मि** (चंद्र आणि सूर्य यांमधील तेज मीच आहें) **सर्व वेदेषु प्रणवः** (सर्व वेदांमधील प्रणव) **खे शब्दं** (आकाशांतील शब्द) **नृषु पौरुषं** (व मानवांमधील पुरुषतेज)–हीं सर्व मीच आहें.–सारांश, पाण्याला पाणीपण, चंद्रसूर्याची सतेजता, वेदांचें पूज्यत्व, आकाशांतील शब्द आणि मनुष्याचा मानवीपणा हीं सर्व मीच आहें.

रसोऽहमपां यः सारः स रसस्तस्मिन्रसभूते मय्यापः प्रोता इत्यर्थः । एवं सर्वत्र । यथाऽहमप्सु रस एवं प्रभाऽस्मि शशिसूर्ययोः । प्रणव ओंकारः सर्ववेदेषु तस्मिन्प्रणवभूते मयि सर्वे वेदाः प्रोताः । तथा ख आकाशे शब्दः सारभूतस्तस्मिन्मयि खं प्रोतम् । तथा पौरुषं पुरुषस्य भावो यतः पुंबुद्धिर्नृषु तस्मिन्मयि पुरुषाः प्रोताः ॥८॥

जलांचें सार जो रस तो रस व त्याची तन्मात्रा मी होत्तों आणि माझ्यामध्यें सर्व पाणी ओंवून जातें; म्हणजे पाणीपणा आहे म्हणून पाणी अस्तित्वांत असतें; सारांश पाणी मीच आहे:—

**शिष्य**—याप्रमाणेंच सर्वत्र अर्थ लावावयाचाना ? म्हणजे ज्याप्रमाणें जलामधील रस परमेश्वरच आहे त्याचप्रमाणें चंद्रसूर्यांतील प्रभा ( तेज ) व तेजतन्मात्रा ही परमेश्वरच असला पाहिजे. तसेंच सर्व वेदांचें आदिस्थान, आदिशब्द, जो ओंकार तोही परमेश्वरच असला पाहिजे. अर्थात ओंकार हा जो वेदांतील सारभूत शब्द तोही परमेश्वरच आहे. ओंकारामध्यें सर्व वेदांचें ग्रथन होतें. ह्याचप्रमाणें आकाशाचें सार जो शब्द ( ध्वनि ) व शब्दतन्मात्रा त्या शब्दांतच ( परमेश्वरांतच ) सर्व आकाश प्रोत झालेलें आहे. होयना ?

**गुरु**—होय. तसेंच जिच्या योगानें मनुष्याला मानवत्व येतें अशी जी मानवीबुद्धि तिच्या स्वरूपानें मी सर्व पुरुषांस आपल्यामध्यें ओंवून घेतों.

**प्रपाकार श्रीधर** 'पौरुष' = उद्योगशीलत्व.

**मधुसूदन**—'**ओंकारेण सर्वा वाक्**' छांदोग्य उप० ( ज्याप्रमाणें शंकूनें सर्व पत्रें ग्रथित होतात त्याप्रमाणें सर्व वाणी ओंकारानें ग्रथित होते ). सामान्यरूप जो मी त्या माझ्यामध्यें सर्व विशेषस्वरूपें अंतर्भूत होतात. जातीमध्यें ( Genus ) जशा उपजाति किंवा व्यक्ति ( Species or individuals ) अंतर्भूत होतात, तसाच हा प्रकार आहे. त्यांचें अस्तित्व भिन्न नसतें. **शंकरानंदा**चा हाच अभिप्राय आहे. सर्व पदार्थ परमेश्वरात्मक असून परमेश्वर आहे म्हणून भास रूपानें अस्तित्वांत असून परमेश्वरस्वरूपांतच असतात.

**द्विवेदी**—'ओंकार स्वरूप **मांडूक्य** उपनिषदांत सांगितलें आहे.

**द्वैतवादी**—येथून विज्ञानाला ( परमेश्वराच्या विशेष माहात्म्यवर्णनाला ) सुरुवात झाली. पाण्याचा स्वाभाविक धर्म हरीपासून झाला, हरीस्वरूपी झाला, हरीस उपभोग देण्यासाठीं झाला व हरिनियमित झाला म्हणून हरि रस आहे. रस हें हरीचें नाम आहे. असेंच सर्वत्र जाणावें.

**पंडित**:—ज्याच्या सुखासाठीं प्राणी धडपडत असतो तो आत्मा ईश्वरच आहे, असें समजलें म्हणजे समदृष्टीनें जी भक्ति होते ती अव्यभिचारिणी होय. ही भक्ति व परमेश्वराचें स्मरण, उत्पन्न करण्यासाठींच हा विस्तार आहे. ॥ ८ ॥

**पुण्यो गन्धः पृथिव्यां च**
**तेजश्चास्मि विभावसौ ॥**
**जीवनं सर्वभूतेषु**
**तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥**

**च** ( आणि ) **पृथिव्यां पुण्यः गन्धः** (पृथ्वीमधील पवित्र सुवास) **च** (व) **विभावसौ तेजः** ( अग्नीमधील तेज ) **सर्वभूतेषु जीवनं** ( सर्व प्राण्यांमधील प्राण ) **च** ( आणि ) **तपस्विषु तपः** ( तपोनिष्ठांमधील तप ) **अस्मि** ( मीच आहें. ) अर्थ स्पष्ट आहे.–

**पुण्य इति । पुण्यः सुरभिर्गन्धः पृथिव्यां चाहं तस्मिन्मयि गन्धभूते पृथिवी प्रोता पुण्यत्वं गन्धस्य स्वभावत एव पृथिव्यां दर्शितमबादिषु रसादेः पुण्यत्वोपलक्षणार्थम् । अपुण्यत्वं तु गन्धादीनामविद्याधर्माद्यपेक्षं संसारिणां भूतविशेषसंसर्गनिमित्तं भवति । तेजो दीप्तिश्चास्मि विभावसावग्नौ । तथा जीवनं सर्वभूतेषु येन जीवन्ति सर्वाणि भूतानि तज्जीवनम् । तपश्चास्मि तपस्विषु तस्मिंस्तपति मयि तपस्विनः प्रोताः ॥ ९ ॥**

पृथ्वीमध्यें जो सुवासिक गंध व गंधतन्मात्रा आहेत त्या गंधस्वरूपी माझ्यामध्यें गंधवती पृथ्वी ओंवली आहे.

**शिष्य**—गुरुराज ! गंधाला पुण्य, पवित्र, सुवासिक, असें विशेषण कशाला ?

**गुरु**—इतकेंच दर्शविण्यासाठीं कीं सुगंध असणें हा पृथ्वीचा सामान्यधर्मच आहे. सुगंध हा पृथ्वीचा सहजधर्म आहे, त्याचप्रमाणें

सुरसत्व इत्यादि जलादिकांचे गुण आहेत; हें दाखविण्यासाठीं पुण्य शब्दाची योजना आहे. शिवाय पृथ्वीत्यादिकांमध्यें दुर्गंधादि जे दुर्गुण दृष्टीस पडतात ते अविद्येचा परिणाम होत. जन्ममरणाच्या आधीन झालेल्या जीवांचा पंचमहाभूतांशीं संपर्क झाला असतां दुर्गंध इत्यादि उत्पन्न होतात. जीवन्मुक्तास दुर्गंध नाहीं. असो; अग्नीमधील तेज, तसेंच ज्याच्या योगानें सर्व भूतें जिवंत राहतात, ती जीवन कला (अन्न म्हणजे अमृत) त्याचप्रमाणें तपस्व्याचें तपही मीच आहें. म्हणजे चित्ताची एकाग्रता हें जें तप त्यामध्यें तपस्वी ओंवलेले आहेत (तपाच्या योगानें तपस्व्यांचा व माझा समागम होतो व पुढें तादात्म्य होतें.) शंकरानंद आचार्यानुयायी आहेत.

**प्रपाकार, श्रीधर, मधुसूदन,** 'जीवन = ' आयुष्य. 'तप' = शीतोष्ण सहन करण्याचें सामर्थ्य. 'पुण्य' = अविकृत ॥ ९ ॥

## बीजं मां सर्वभूतानां
## विद्धि पार्थ सनातनम् ॥
## बुद्धिर्बुद्धिमतामस्मि
## तेजस्तेजस्विनामहम् ॥ १० ॥

**पार्थ** ( अर्जुना ! ) **सर्वभूतानां सनातनं बीजं मां विद्धि** (सर्वभूतांचें जें चिरंतन बीज तेंही मीच आहें ) **बुद्धिमतां बुद्धिः** ( बुद्धिवंत लोकांची बुद्धि )–व–**तेजस्विनां तेजः** ( तेजस्वी लोकांचें तेज तेंही ) **अस्मि** ( मीच आहे )–अर्थ स्पष्ट आहे.–

**बीजमिति । बीजं प्ररोहकारणं मां विद्धि सर्वभूतानां हे पार्थ सनातनं चिरंतनम् । किंच बुद्धिर्विवेकशक्तिरन्तःकरणस्य बुद्धिमतां विवेकशक्तिमतामस्मि तेजः प्रागल्भ्यं तद्वतां तेजस्विनामहम् ॥ १० ॥**

**शिष्य**—सर्व भूतें तर आपआपल्या कारणांच्या आधारावर आहेत; त्यांस परमेश्वराचा आधार कोठून आला ?

**गुरु**---कोठून आला म्हणजे ? अरे ! परमेश्वर हाच चिरंतन म्हणजे चिरकालिक ( अनादि व अनंत ) बीज आहेना सर्व चराचर वस्तूंचें अविनाशी असें वृद्धिकारण ? एवंच वस्त्रामध्यें जसे तंतु तसा मी सर्वत्र, सर्व कार्यामध्यें अनुस्यूत आहे; फार काय सांगावें ? विवेकी म्हणजे सारासार विचार करणारे जे लोक आहेत त्यांच्या अंतःकरणांतील जी तारतम्यमूलक विचारशक्ति ( इच्याच योगें निश्चय होतो. ) ती ही, भगवान म्हणतात, मीच आहें. तसेंच तेजस्वी लोकांची जी प्रगल्भता ( गंभीरता ) तीही मीच आहें ! इच्याचमुळें तेजस्वी लोकांचा इतर लोक पराभव करूं शकत नाहींत; इतकेंच नाहीं तर ते शत्रु स्वतःच पराभूत होऊन तेजस्वी लोकांजवळून पळून जातात.

**शंकरानंद**–'आत्मन आकाशः संभूतः। आकाशाद्वायुः' इत्यादिः येथें आत्मा हेंच आदिकारण आहे. आकाश, वायु इत्यादि उपकारणें होत. "'परमेश्वराचें, परब्रह्माचें कारण काय?' ह्यास उत्तरः-- **'सा काष्ठा सा परा गतिः'** परमेश्वर हाच आदिकारण आहे. **'न तस्य कश्चिज्जनिता'** इत्यादि श्रुतींवरून परब्रह्माचें स्वकारणत्वसिद्ध होतें. एवंच परमेश्वर सर्व कारण आणि सर्वाधार आहे असें ठरलें.

**पर्वते**---तात्पर्य सर्व चराचर, दृश्यादृश्य, पदार्थ माझ्यामध्यें व माझ्या आश्रयानें राहतात.

**चतरजी**---'बुद्धि' = श्रद्धायुक्त सत्याची भक्ति; सत्यनिश्चय.

**द्विवेदी**---बीजांत जसा वृक्ष, त्याच्या शाखा, त्याचीं पर्णें, त्याचीं पुष्पें, त्याचीं फळें असतात, तद्वत माझ्यामध्यें सर्व जगत् असतें.

**द्वैतवादी**---हें स्वरूपवर्णन प्रतिमासाहाय्यानें, मूर्तीच्यायोगें, उपासना करिता यावी यासाठीं आहे.

**पंडित**---मी इतर बीजांसारखा नाहीं. ॥ **कीं उपजतां अंकुर । बीजनाश सत्वर । बीज होऊनिही मी नव्हे नश्वर । सनातन, नित्य, शाश्वत ॥ १० ॥**

**बलं बलवतां चाहं**

**कामरागविवर्जितम् ॥**

धर्माविरुद्धो भूतेषु
कामोऽस्मि भरतर्षभ ॥ ११ ॥

च ( आणि ) **बलवतां कामरागविवर्जितं बलं अहं** ( शक्तिवंत लोकांचें जें इच्छाद्वेषशून्य सामर्थ्य तेंही मीच आहें. ) **भरतर्षभ** ( भरतकुलश्रेष्ठा ! ) **भूतेषु धर्माविरुद्धः कामः अस्मि** ( प्राणीमात्रांची अधर्मशून्यभूत जी इच्छा ती ही मीच आहें )—सारांश वासना व अहंकार यांनीं शून्य असें जें बळवंतांचें बळ व धर्मयुक्त अशी प्राणीमात्रांची इच्छा ती ही मीच आहें—

**बलमिति । बलं सामर्थ्यमोजो बलवतामहम् । तच्च बलं कामरागविवर्जितं कामश्च रागश्च कामरागौ कामस्तृष्णाऽसंन्निकृष्टेषु विषयेषु रागो रञ्जना प्राप्तेषु विषयेषु ताभ्यां विवर्जितं देहादिधारणमात्रार्थं बलमहमस्मि न तु यत्संसारिणां तृष्णारागकारणम् । किंच धर्माविरुद्धो धर्मेण शास्त्रार्थेनाविरुद्धो यः प्राणिषु भूतेषु कामो यथा देहधारणमात्राद्यर्थोऽशनपानादिविषयः कामोऽस्मि हे भरतर्षभ ॥११॥**

भरतकुलश्रेष्ठा ! बळवंत लोकांमध्यें जें सामर्थ्य किंवा ओज म्हणून असतें तें मीच आहें. मात्र तें बळवंतांचें बळ काम आणि राग यांनीं वर्जित असें असलें पाहिजे.

**शिष्य**—काम आणि राग एकचना ?

**गुरु**—एकच परंतु फरक आहे. पहा: विषय जवळ नसला, आपल्यास प्राप्त झालेला नसला, म्हणजे जी तृष्णा उत्पन्न होते, प्राप्त होण्याचा संभव नसला तरी जी आशा उत्पन्न होते, तो काम होय. हा राजस गुण आहे; आणि विषय प्राप्त झाला असतां त्याविषयीं जी प्रीति, जें सुख, तो राग होय. हा तामस गुण आहे. समजलें ? हाच विषय प्राप्त झाला नाहीं म्हणजे क्रोध उत्पन्न होतो. असो; तेव्हां तृष्णा अगर• प्रीति यांनीं शून्य असें जें बळ ( याचा उपयोग स्वधर्माचरणासाठीं व धर्मोपदेशासाठीं देह धारण व्हावा इतक्याच पुरता मात्र

करावयाचा )—तें बल मी आहें. संसारामध्यें, प्रपंचामध्यें, गुंतलेले जे प्राणी आहेत त्यांचें बल तृष्णा आणि प्रीति यांपासून उत्पन्न झालेलें असतें. तें बल मात्र मीं नव्हे तर स्वधर्मासाठीं लागणारें सात्विक बल मी आहे म्हणजे बलवंत लोक माझ्याचमध्यें आहेत. तसेंच धर्माशीं म्हणजे शास्त्राच्या खऱ्या अर्थाशीं विरोध केव्हांही येत नाहीं अशी जी प्राणीमात्रांचे ठायीं इच्छा दृष्टीस पडते ती इच्छाही मीच आहें. या इच्छेनें मात्र स्वधर्म साध्य होतो.

**शिष्य**—हें नाहीं मला समजलें.

**गुरुः**—अरे! शास्त्रानें जसें वागावें म्हणून सांगितलें आहे तसें वागण्याविषयींची जी इच्छा ती मीच आहें. ही इच्छा शास्त्राची कधींही अमर्यादा करित नाहीं. शास्त्रास धरूनच चालते. असली इच्छा असणारा पुरुष अन्नपानादिकांची इच्छा करितो. कशासाठीं? तर देहधारण व्हावा म्हणून. आणि तो देहसुद्धां धारण करावयाचा अशासाठीं कीं त्यायोगें जीवाचें सार्थक होऊन जन्ममरणाच्या चक्रांतून तो सुटावा. असो; अशी शास्त्रशुद्ध व शास्त्रमर्यादित जी सात्विक इच्छा ती मीच आहें. एवंच सर्व सात्विक पदार्थ माझ्यामध्यें असून मीच त्यांचा आधार आहें.

'काम' = मदन = जाति कायम ठेवण्यासाठीं जो स्वस्त्रीशीं धर्मनिष्ठ व्यवहार. असाही कित्येक टीकाकार अर्थ करितात. शिवाय काम आणि राग या शब्दाचे परस्पर उलट अर्थ शंकरानंद, द्विवेदी, आदि घेतात; म्हणजे आचार्यांचा काम तो यांचा राग व आचार्यांचा राग तो यांचा काम, असे अर्थ करितात.

**द्वैतवादी, पंडित**—ईश्वरी स्वरूप सात्विक वस्तूंतच पाहावें! सात्विक वृत्ति = वेदोक्त स्वधर्माचरणाची वृत्ति.

**ज्ञानेश्वर—जो श्रुतिगौरवाचिया** ( वेदमहत्वाच्या ) **मांडवीं कामसृष्टीचा वेल वाढवी। जंव कर्मफलेंसी पालवी। अपवर्गीं** ( मोक्षामध्यें ) **ठेके ॥**

**टॉमसन** साहेब अर्थ करितांना घसरले! 'ज्याला कोणताही धर्म आवरूं शकत नाहीं, तो काम मी आहें' अशा अर्थाचे शब्द

वापरून गीतातत्त्व आपल्यास समजलें नाहीं असें यांनीं आपल्या लिहिण्यावरून दाखविलें. नामदार तेलंगांनींही ही चूक सौम्य शब्दांनीं दाखविली आहे. ॥ ११ ॥

किंच—

फार काय सांगावें? शेवटीं आणखी इतकेंच सांगतों कीं—

**ये चैव सात्त्विका भावा**
**राजसास्तामसाश्च ये ॥**
**मत्त एवेति तान्विद्धि**
**न त्वहं तेषु ते मयि ॥१२॥**

**च** ( आणि ) **ये एव सात्त्विकाः भावाः ये राजसाः तामसाः च** ( जे जे म्हणून सात्विक किंवा राजस किंवा तामस भाव आहेत ) **तान् मत्तः एव इति विद्धि** ( ते सर्व मजपासून उत्पन्न झालेले आहेत असें समजून घे ) **तु अहं तेषु न** ( पण मी त्यांच्यामध्यें नाहीं ) **ते मयि** ( ते भाव माझ्यामध्यें आहेत हें जाण ).–सारांश जे जे म्हणून सात्विक, राजस किंवा तामस पदार्थ आहेत, ते सर्व माझ्यापासूनच उत्पन्न झाले आहेत. मी केव्हांही त्यांच्या स्वाधीन नसतों; ते मात्र माझ्या स्वाधीन सर्वथा असतात.—

ये चैव सात्त्विकाः सत्त्वनिर्वृत्ता भावाः पदार्था राजसा रजोनिर्वृत्तास्तामसास्तमोनिर्वृत्ताश्च ये केचित्प्राणिनां स्वकर्मवशाज्जायन्ते भावास्तान्मत्त एव जायमानानित्येवं विद्धि सर्वान्समस्तानेव। यद्यपि ते मत्तो जायन्ते तथाऽपि न त्वहं तेषु तदधीनस्तद्वशो यथा संसारिणस्ते पुनर्मयि मद्वशा मदधीनाः ॥ १२ ॥

**शिष्य**—म्हणजे सदसद्विवेक आणि आनंद यांनीं युक्त असे सर्व पदार्थ परमेश्वरापासून उत्पन्न झाले, असें होतें. पण बाकीच्यांची काय वाट?

**गुरु**—तीच वाट सांगतात, ऐकः 'अर्जुना! सत्वगुणापासून शमदम इत्यादि किंवा रजोगुणापासून हर्षदर्पेत्यादि, किंवा तमोगुणापासून शोकमोहादि ज्या ज्या चित्तवृत्ति उत्पन्न होतात त्या सर्व माझ्या प्रकृतीपासूनच उत्पन्न होतात असें जाण.'—

**शिष्य**—भगवन्! सत्वगुणाच्याही पलीकडे असणारा जो श्रीभगवान त्याच्यापासून सात्विक, राजस व तामस असे निरनिराळे पदार्थ उत्पन्न व्हावे हें आश्चर्य होय. एकाच खाणींत हिरा व कोळसा सांपडावा हें आश्चर्यकारक आहे.

**गुरु**—यांत आश्चर्य कांहींच नाहीं. हिरा व कोळसा यांचीं मूलभूतकारणें एकच आहेत! 'पुनः असें पहा कीं प्राण्यांस इच्छास्वातंत्र्य मींच दिलें. त्याचा उपयोग कांहीं प्राणी चांगला करितात, ते सात्विक असून सात्विक गुणच प्रसृत करितात. दुसरे कित्येक या इच्छास्वातंत्र्याचा वाईट व अज्ञानात्मक उपयोग करून राजस व तामस गुण प्रसृत करितात आणि येणेंप्रमाणें सृष्टीस वैचित्र्य आणि विविधता प्राप्त आणितात. पण हे प्राणी मीच उत्पन्न केले असल्यामुळें त्यांनीं प्रसृत केलेल्या गुणांचें उत्पादन स्वामित्व माझ्याकडेच येतें. सारांश, सर्वांचे आदिकारण मीच आहें. आतां हें गुण किंवा हे पदार्थ मी उत्पन्न करितों म्हणून मी त्यांचे स्वाधीन आहें किंवा यांनीं विकृत मी आहें, असें मात्र समजूं नको. अज्ञानी प्रापंचिक लोक गुणांस लुब्ध होऊन त्यांच्या स्वाधीन होतात. अर्थातच तसा मी गुणांच्या स्वाधीन नसतो, इतकेंच नाहीं तर ते गुण, ते पदार्थ, ते भाव, माझ्या सत्तेनें मात्र अस्तित्वांत असतात. सारांश, मी असंग व केवलस्वरूपी आहे, तथापि सर्व प्रापंचिक जगाचा तत्तद्गुणकर्मानुसार उत्पत्तिकर्ता आहें असें व्यवहारामध्यें समजावयाचें आहे. पंडितांचा हाच अभिप्राय आहे.

**शंकरानंदाचें** अद्वैतपर व्याख्यान, मायेनें अज्ञान उत्पन्न होऊन जगताचा आभास कसा होतो, ब्रह्मसत्तेनें माया कशी उत्पन्न होते वगैरे विवरण, वाचण्यासारखें आहे.

**द्विवेदी**—माझा परिणाम हे गुण नाहींत, तर माझ्या सत्तेनें हे आहेत; म्हणून हें सिद्ध झालें कीं, मी अनादि, अनंत, अव्यय,

सनातन व एकरस आहे आणि प्रपंच हा सादि, सांत, व्ययशील, नश्वर आणि नानाप्रकारचा आहे.

रामानुज--लीलामात्रें करून उत्पन्न झालेले हे विकार आहेत. माझ्या शरीरापासून हे उत्पन्न झाले आहेत.

द्वैतवादी--'तदाश्रितं जगत्सर्वं नासौ कुत्रचिदाश्रितः' अर्थ स्पष्ट आहे. 'सर्वस्वभावो नियतस्तेनैव किमुतापरं' (परमेश्वरानें सर्व स्वभावाचें नियमन केलें आहे!)

ज्ञानेश्वर--परी तयामाजीं मी नाहीं। जैसी स्वप्नीच्या डोहीं। जागृती न बुडे॥ ना तरी रसांचीच सुघट (चांगली घडलेली) बीज कणिका (बियाचा दाणा) घनवट। परी तियेस्तव होय काष्ठ। अंकुरद्वारें॥ मग तयाकाष्ठाच्या ठायीं। सांगपा! बीजपण असे कांई?। तैसा विकारीं मी नाहीं। जरी विकारिला दिसे॥ .... सांगे अग्नीस्तव धूम होये। तिये धूमीं काय अग्नी आहे?॥ १२॥ .

एवंभूतमपि परमेश्वरं नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावं सर्वभूतात्मानं निर्गुणं संसारदोषबीजप्रदाहकारणं मां नाभिजानाति जगदित्यनुक्रोशं दर्शयति भगवान्। तच्च किंनिमित्तं जगतोऽज्ञानमित्युच्यते—

गुरु—अशा रीतीचा म्हणजे नित्य, शुद्ध, मुक्त व बुद्ध असा स्वभाव आहे ज्याचा असा परमेश्वर आहे, तो सर्व भूतांचा आत्मा असून स्वतः गुणशून्य (निरुपाधिक) आहे, संसारस्थ दोषांचें बीज जें अज्ञान (अविद्या) त्याचा सर्वतोपरी नाश करण्यास तो एकटाच समर्थ आहे, असें परमेश्वराचें स्वरूप जगताला कळत नाहीं म्हणून प्रजावात्सल्यानें आपलें स्वरूप गुणवाचक शब्दांनीं प्रकट केलें. तेव्हां असलें हें सर्वमंगल, सर्वसुखकारी स्वरूप लोकांस कां समजत नाहीं याची मीमांसा भगवान करितात; हेतु हा कीं आपलें अज्ञान कोठें आहे हें कळून तरी लोकांनीं आपलें अज्ञान टाकावें.

त्रिभिर्गुणमयैर्भावै-
रेभिः सर्वमिदं जगत् ॥
मोहितं नाभिजानाति
मामेभ्यः परमव्ययम् ॥ १३ ॥

**इदं सर्वं जगत्** ( हें सर्व जग ) **एभिः त्रिभिः गुणमयैः भावैः मोहितं** ( ह्या सात्विक, राजस आणि तामस भावांनीं मोह पावलें आहे. )–म्हणून–**एभ्यः परं अव्ययं मां न अभिजानाति** ( ह्या गुणांहून अतिश्रेष्ठ व अव्यय असा जो मी त्या मला ओळखीत नाहीं. )–अर्थ स्पष्ट झाला आहे.

त्रिभिर्गुणमयैर्गुणविकारै रागद्वेषमोहादिप्रकारैर्भावैः पदार्थैरेभिर्यथोक्तैः सर्वमिदं प्राणिजातं जगन्मोहितमविवेकतामापादितं सन्नाभिजानाति मामेभ्यो यथोक्तेभ्यो गुणेभ्यः परं व्यतिरिक्तं विलक्षणं चाव्ययं व्ययरहितं जन्मादिसर्वभावविकारवर्जितमित्यर्थः ॥ १३ ॥

**शिष्य**—परमात्मा जर आत्मभूत आणि स्वयंप्रकाश आहे तर तो जगाला कसा दिसत नाहीं या प्रश्नाला त्या श्लोकांत उत्तर दिलें आहेना ?

**गुरु**—होय. प्रकाश, प्रवृत्ति आणि मोह किंवा अनुक्रमें सत्व, रज आणि तम हे तीन गुण व प्रेम, द्वेष, मोह इत्यादि त्या गुणांचे क्रमानुसार विकार तसेंच या गुणांच्या देवता यांनीं परिपूर्ण व अधिष्ठित झालेले जे सात्विक, राजस किंवा तामस पदार्थ यांचें वर्णन आतांच केलें आहे. ह्या पदार्थांच्या योगानें हे सर्व प्राणी ( अगदीं ब्रह्मदेवापासून तों अगदीं क्षुल्लक कीटकापर्यंत सर्व ) मोहून बहिर्मुख झाले आहेत. जगांत जें अज्ञान किंवा अविवेक हे पसरले आहेत, त्याचें कारण या त्रिगुणात्मक पदार्थांनीं उत्पन्न केलेला मोह हा होय. शुक्तिकेवर रजताचा आरोप करून रजताच्या पाठीमागें धावणारे सर्व लोक आहेत.

हे भ्रामक पदार्थच आपल्यास मिळाले म्हणजे आपली पुरुषार्थसिद्धि झाली असें जग मानितें हाच तो मोह होय. या गुणांच्या पलीकडे असणारा, यांचें नियमन करणारा, या गुणांहून अत्यंत विलक्षण असा जो मी अविक्रिय, सच्चिदानंदघन परमेश्वर–ज्याला कधींही व्यय नाहीं, म्हणजे जन्ममरणादि कोणताही विकार नाहीं–त्या मला हें जग ओळखीत नाहीं, याचें कारण वर सांगितलेला मोह होय.

**शंकरानंद**–"**इन्द्रियाभ्यामजय्याभ्यां द्वाभ्यामेव हतं जगत्। अहो उपस्थजिह्वाभ्यां ब्रह्मादिमशकावधि**" ॥ ( अरेरे ! जिव्हा आणि उपस्थ या दोन इंद्रियांनीं हें जग ( ब्रह्मदेवापासून तों मशकापर्यंत ) व्यापून, मोहून, नासून टाकिलें आहे ! ).

**चतरजी**—ज्ञान अ० १ श्लोक १० । ११ पहा.

**रामानुज**—माझे गुण अनंत आहेत म्हणून मी श्रेष्ठ आहे.

**द्वैतवादी**—ब्रह्मादिकांच्या देहाला विकार होतात, म्हणून विष्णूच्या देहाला होतात असें मूढ लोक मानितात.

**ज्ञानेश्वर—पै उदकीं झाली बाबुळी** ( शेवाळ ) **। ते उदकातें जैसी झांकोळी । कां वायाची आभाळीं । आकाश लोपे ॥.... तैसी माझीच हे बिंबली । त्रिगुणात्मक साउली । कीं मजाचि आड ओडवली** ( प्राप्त झाली ) **। जवनिका** ( पडदा ) **जैसी ॥ म्हणवूनि भूतें मातें नेणती । माझींच, परी मी नव्हती । जैसीं जळींचीं जळीं न विरतीं । मुक्ताफळें ॥ १३ ॥**

**कथं पुनर्दैवीमेतां त्रिगुणात्मिकां वैष्णवीं मायामतिक्रामन्तीत्युच्यते—**

**शिष्य**–तर मग हा जो अनादि मायापाश यांतून सुटका होण्याची आशाच नको म्हणावयाची ! भगवन् ! दयानिधे ! ही भगवंताची त्रिगुणात्मक जी दैवी अद्भुत माया, इचें आक्रमण करण्यास कांहीं मार्ग आहे कां हो ! मला तर या सर्वव्यापी वैष्णवी मायेचें अतिक्रमण प्रायः अशक्यच वाटतें.

**गुरु**—इतका घाबरूं नको ! भगवंतांच्या वाक्याकडे सावधान लक्ष दे. ऐक–

**दैवी ह्येषा गुणमयी**
**मम माया दुरत्यया ॥**
**मामेव ये प्रपद्यन्ते**
**मायामेतां तरन्ति ते ॥ १४ ॥**

**एषा मम दैवी, गुणमयी, माया हि दुरत्यया** ( ही माझी दैवी व त्रिगुणपूर्ण माया आहे म्हणून हिला ओलांडून जाण्याचें अशक्य आहे. )-पण-**ये मां एव प्रपद्यन्ते** ( मलाच ईश्वराला, ब्रह्माला जे शरण येतात ) **ते एतां मायां तरन्ति** ( ते ही, अशी, दुस्तर माया तरून जातात. )-सारांश, भगवंताच्या त्रिगुणात्मक मायेस तरून जावयाचें असेल तर एकच मार्ग आहे आणि तो भगवद्भक्ति हाच होय. याशिवाय अन्य उपायांनीं गेल्यास वैष्णवी माया तरणें अत्यंत कठिण आहे.—

**दैवी देवस्य ममेश्वरस्य विष्णोः स्वभूता हि यस्मादेषा यथोक्ता गुणमयी मम माया दुरत्यया दुःखेनात्ययोऽतिक्रमणं यस्याः सा दुरत्यया। तत्रैवं सति सर्वधर्मान्परित्यज्य मामेव मायाविनं स्वात्मभूतं सर्वात्मना ये प्रपद्यन्ते ते मायामेतां सर्वभूतमोहिनीं तरन्त्यतिक्रामन्ति संसारबंधनान्मुच्यन्त इत्यर्थः ॥ १४ ॥**

ही जी अतिप्रसिद्ध व अलौकिक सामर्थ्यवती माया आहे ती दैवी म्हणजे माझ्यापासूनच सर्वशक्तिमान परमेशापासूनच, प्रकट झाली आहे. सात्विक, राजस, आणि तामस अशा तीन गुणांनीं या मायेचें स्वरूप घटित झालें आहे. असो; ही जी माझी वैष्णवी म्हणजे सर्वव्यापी माया, इचें अतिक्रमण करणें अत्यंत कठिण आहे. दुःखानें, अतिकष्ट घेऊनच, या मायेचें अतिक्रण होऊं शकेल. प्रायः सामान्य मनुष्यास तें अशक्यच होय. कारण मनुष्यें या त्रिगुणात्मक मायेस व मायाकृत जगतास भुलून जाऊन तीं सर्वथा मायेच्या आधीन

होतात. असो; अशी जरी ही दुरत्यय माया आहे; तथापि मायेचा स्वामी व सर्वांचा आत्मा जो मी परमेश्वर या परमेश्वराचें भजन-पूजन जो अनन्य भावानें, अव्यभिचारिणी, भक्तीनें करितो, इतर बाकीचे गौण धर्म टाकून देऊन जो अधिकारी पुरुष मला अनन्यभावानें शरण येतो तो पुरुष या दुर्निवार व सर्वांस मोह घालणाऱ्या मायेचेंही अतिक्रमण करूं शकतो. सारांश संसाराच्या सर्व बंधांपासून मुक्त होतो. एवंच सर्व भावानें परमेश्वरास शरण गेलें असतां मायेचे सर्व पाश तुटून जाऊन मनुष्य मुक्त होतो.

**प्रपाकार**--तैत्तिरीय श्रुतिः " **देवीमहं निर्ऋतिं वन्दमानः पितेव पुत्रं दासये वचोभिः** ( ह्या राक्षसी पण सामर्थ्यशील मायेला मी उपनिषद् वाक्यांनीं दासी करितो. पुत्रावर बाप सत्ता चालवितो. याप्रमाणें मी इच्यावर ज्ञानसामर्थ्यानें सत्ता चालवितों. ) कालस्थलवर्तमानास सर्वतोपरि वश होऊन तत्प्रीत्यर्थ शास्त्रार्थ काढणाऱ्या आमच्या प्रस्तुत नास्तिक प्रापंचिकांनीं वरील उत्साहकारी वाक्याचा शतशः जप केला तरच त्यांस सात्विक पौरुष प्राप्त होईल. असो; प्रपाकारांनीं ऋक्शाखेंतील '**चतुष्कपर्दा युवती, सुपेशा, घृतप्रतीका वयुनानि वस्ते**' हा मंत्र मायेचें दुरत्ययत्व दाखविण्याकरितां देऊन त्यावरील **रावणभाष्य** दिलें आहे त्याचें तात्पर्यः मायेचे चार उत्कर्ष आहेत. (१) ती सदा तरुणी आहे; (२) ती कुशल रचना व अघटित घटना करण्यांत चतुर आहे; (३) तिची संगति प्रारंभीं मात्र सुखकर आहे आणि (४) ती ज्ञानाचा अपकर्ष करणारी आहे. 'तुझ्या आश्रयानें मी राक्षसी मायेला झिडकारून देतों' हा एका तैत्तिरीयक श्रुतीचा उतारा देतात.

**मधुसुदन**-'**तद्यो यो देवानां प्रत्यबुध्यत स एव तदभवत्तथर्षीणां तथा मनुष्याणम्**' (देवांपैकीं ज्यास आत्मज्ञान झालें तो आत्मस्वरूप झाला; तसेंच ऋर्षीपैकीं किंवा मनुष्यांपैकीं जे आत्मज्ञानी झाले ते आत्मस्वरूपी झाले ). या स्वामींनीं मायेचें स्वरूप व ईश्वराची सर्वसत्ता यांचें उत्तम वर्णन केलें आहे. जीवेश्वर व बिंबप्र-

तिबिंब भाव हे येथें द्विवेदींनीं व शंकरानंदांनीं व पर्वत्यांच्या ' निवृत्तींत' चांगले समजतात. प्रल्हाद म्हणतोः–

" नैवात्मनः प्रभुरयं निजलाभपूर्णो
मानं जनादविदुषः करुणो वृणीते ।
यद्यज्जनो भगवते विदधीत मानं
तच्चात्मने प्रतिमुखस्य यथा मुखश्रीः " ॥

( आत्मज्ञानी व आत्मलाभसंतुष्ट पुरुष हे सामान्य जनापासून मानाची इच्छा करित नाहींत. शिवाय कोणी पुरुष निष्कामत्वानें परमेश्वरास जो मान देतो, तो मान आत्मारामासच दिलासें होतें. आपलें मुख सुंदरश्रीनें शृंगारून जर आरशांत पाहिलें तर तें प्रतिबिंबित सुंदर दिसतें. नाहीं बरें ? ) ईश्वररूपानें आत्माराधनाचे उत्तरोत्तर उपायांचा समाहार यांनीं केला आहे तो गीताशास्त्रास अनुसरूनच आहे. शंकरानंदांनीं सगुण भक्तीनें मात्र मोक्ष नाहीं हें सिद्ध केलें आहे. श्रुतिस्मृतींचा आधार घेऊन सिद्ध केलें आहे.

**चतरजी**––ह्या श्लोकांत असें सांगितलें कीं परमेश्वर निरुपाधिक आणि मायेचा स्वामी आहे, ज्या लोकांस हें ज्ञान होतें ते परमेश्वराधीन होतात व मायेचा पराभव करतात. ( बायबल स्तोत्र ९२ पहा. जानचें शुभवर्तमान पहा. )

**रामानुज**—माया = विचित्र कार्यकर्तृत्व. मिथ्याभास असा अर्थ नाहीं. ही शक्ति भगवंताच्या सत्स्वरूपाला झांकून ठेवून विषयाकडे लाविते. परम कारुणिक जो मी त्या सर्वाश्रय परमेश्वराला शरण गेलें असतां ही माया नष्ट होते.

**द्वैतवादी**––नित्य विचित्रक्रीडा करणारा जो मी त्या माझी आवडती, त्रिगुणात्मक माया मोहक आहे. **व्यास**योगांत सांगितलें आहे कीं, ' शेष, ब्रह्मदेव, शंकर, यांना या मायेच्या एका कलेचेंही सामर्थ्य नाहीं. त्यांनासुद्धां ही माया **विष्णुप्रसादाशिवाय** दुर्गम आहे. मत्स्वरूपानें गुरु, पिता, इत्यादिकांस पाहूं लागेल त्यासच मी प्राप्त होतो.

**ज्ञानेश्वर**—पुढील १९ व्या श्लोकाखालीं जो प्रपाकारांनीं एक रूपकात्मक श्लोक दिला आहे त्याच्यावर—रूपकाची—ताण करून ज्ञानेश्वरांनीं आपल्या अगाध भाषासामर्थ्यानें माया नदीचें गुणमयत्व व मराठी भाषेचें विलक्षण प्रकटनप्रभुत्व प्रकट केलें आहे; आणखी; भगवद्भक्तजनाव्यतिरिक्त केलेले तरणोपाय अपायकारक होतात ह्याचा थोडासा मासला पहा:—**एक स्वयंबुद्धीच्या बाहीं** ( अभिमानाच्या बाहुबलावर ) । **रिगाले तयांची शुद्धीच नाहीं ! । एक जाणीवेचे डोहीं । गर्वेचि गिळिले ॥ एकीं वेदत्रयाच्या सांगडी । घेतल्या अहंभावाच्या थोंडी । ते मदमीनाच्या तोंडीं । सगळेची गेले ॥** .... नंतर विषयाच्या कांसला धरून जातात, ते बुडतात असें सांगून; **एकीं यजनक्रियेची** ( यज्ञादिकाची ) **पेटी । बांधोनी घातली पोटीं । ते स्वर्गसुखाच्या कपाटीं । सिरकोनी ठेले ॥** .... सारांश **जेथ वैराग्याची नाव न रिगे । विवेकाचा तागा** ( दोर ) **न लगे । वरी कांहीं तरोंये योगें । तरी विपाय तो ! ॥** एवंच सर्वच उत्तम आहे; जिज्ञासूंनीं अवश्य वाचावें. निदान शेवटचा भाग तरी अवश्य, अवश्य वाचावा.

**रंगनाथां**चाही असाच विस्तार आहे.

**पंडित**—माया शब्दाचा विग्रह करितात; ‘ मा ’ म्हणजे नसें ‘ या ’ म्हणजे जें **नसोनि भासें । ....** ॥ ही माया— .... **गोंवी गुणत्रयाच्या** ( तीन दोरांच्या ) **भावीं । .... धरूं न जातां न सांपडे । धरणार अधिक फांसीं पडे । जों जों पाहेल तों तों बुडे । प्रवाहीं इच्या ॥ सत्य लोकादि पर्यंत । बुडोनि सेवाळले अत्यंत । तरले म्हणोनि तेथपर्यंत । चढले, घसरले ते तोंडघशीं ! ॥** कल्पना उत्तम आहे. ॥ १४ ॥

**यदि त्वां प्रपन्ना मायामेतां तरन्ति कस्मात्त्वामेव सर्वे न प्रपद्यन्त इत्युच्यते—**

**शिष्य**—सर्वज्ञ परमेश्वराला शरण गेलें असतां जर ही दुस्तर माया तरतां येते, तर सर्व लोक त्यालाच कां शरण जात नाहींत ?

**गुरु**—ह्याचें कारण ऐक:—

न मां दुष्कृतिनो मूढाः
प्रपद्यन्ते नराधमाः ॥
मायया ऽपहृतज्ञाना
आसुरं भावमाश्रिताः ॥१५॥

**दुष्कृतिनः मूढाः नराधमाः मां न प्रपद्यन्ते** (दुष्ट कृत्यें करणारे, मूर्ख व मानव योनींत जन्म घेऊन अधमवृत्तीनें वागणारे, लोक मला शरण येत नाहींत.)-कारण-**मायया अपहृतज्ञानाः** (त्यांचें ज्ञान आवरण करणाऱ्या मायेनें हिरावून घेतलेलें असतें. सारांश ते मायेनें मोहित झालेले असतात.)-व-**आसुरं भावं आश्रिताः** (त्यांची वृत्ति तामसी जे राक्षस त्याच्या वृत्तीसारखी झालेली असते)-एवंच जे दुर्व्यसनी, मूर्ख, नीच कोटींतले लोक आहेत, ते परमेश्वराचें आराधन अनन्य बुद्धीनें करित नाहींत. कारण त्यांच्या बुद्धीला मायेच्या योगानें विपर्यास आलेला असतो व त्यांनीं राक्षसी वृत्तीचा अंगिकार केलेला असतो.

**न मां परमेश्वरं दुष्कृतिनः पापकारिणो मूढाः प्रपद्यन्ते नराधमा नराणां मध्येऽधमा निकृष्टास्ते च मायया ऽपहृतज्ञानाः संमुषितज्ञाना आसुरं भावं हिंसानृतादिलक्षणमाश्रिताः ॥ १५ ॥**

गुरु—इच्छास्वातंत्र्याचा दुरुपयोग करून पाप करण्याचें व प्रपंचांत गुंतून राहण्याचें व्रत ज्यांनीं स्वीकारलें व तेणेंकरून ज्यांचा अविवेक वृद्धिंगत होऊन जे मूर्ख व कामुक झाले आणि म्हणूनच मानवजन्म प्राप्त होऊनही जे अधम कोटींतील प्राण्याप्रमाणें वागूं लागले, ते शुद्ध अशा परमेश्वराचें आराधन कधींही करणार नाहींत, किंवा त्या परमेश्वराला अनन्यभावानें शरणही जाणार नाहींत. कारण त्यांचें ज्ञान मायेनें हिरावून घेतलेलें असतें; आणि म्हणूनच ते राक्षसीवृत्तीचे झालेले असतात. राक्षसीवृत्ती म्हणजे हिंसा करणें, असत्य बोलणें, दंभ, दर्प, अभिमान इत्यादि गुण-

विशिष्ट असणें अशीं अनेक तामसी लक्षणें आलींच. तात्पर्य हें कीं अल्प सृष्टींतच जीवांचा पुरुषार्थ साध्य व सिद्ध होतो असें इच्छास्वातंत्र्याच्या दुष्ट उपयोगानें ज्यांस वाटतें तेच मायेला वश होतात आणि उपदेश झाला असतांही परमेश्वराला शरण जात नाहींत. सर्वात्मक परमेशाला जे शरण जात नाहींत त्यांची भक्ति नसल्यामुळें ते मायावश होऊन बुडतात हें सांगावयास नकोच.

**मपाकार**—"**दुःसंकल्पविकल्पकूलयुगला धैर्यद्रुमोन्मूलिनी ।**
**कल्लोलैरभिमानमत्सरमुखैः षड्भिः परीतोर्मिका ॥**
**आवर्तैर्ममतादिभिः परिवृता दुःखैकधारान्विता ।**
**पूर्णा मोहपयस्विनीव निभृतं चेतःस्थितिर्मायिनाम् ॥**

संसारी लोकांची मनःस्थिति व मोहनामक नदी यांचे उत्तम साम्य वरील श्लोकांत आहे.

**पर्वते**—मायेचे ठिकाणीं आवरक (ज्ञान उत्पन्न होऊं न देण्याची) व विक्षेप (दुसरीकडे वाळविण्याची, विषय लोलुप करण्याची) अशा शक्ति आहेत; म्हणून देहादिकांवर आत्मभ्रम होतो.

**चतरजी**—(ज्ञान क्र० शुभ० अध्या० ८ श्लोक ४२, ४७ पहा.)

**रामानुज**—भगवदुपभोगासाठीं हें विश्व आहे हा खरा अर्थ न समजतां यःकश्चित् क्षणभंगुर जीवाच्या दुःखमूलक सुखासाठीं धडपड करणारे लोक नराधम होत. हेच लोक शब्दपांडित्यानें मत्संबंधी ज्ञानाचा अपहार करितात; सारांश नास्तिक होतात. परमेश्वराचे ऐश्वर्याचा, परमेश्वरीज्ञानाचा, परमेश्वराचे स्वरूपाचा द्वेष करणारे ते असुर होत.

**द्वैतवादी**—असु म्हणजे प्राणांचे, किंवा इंद्रियांचे ठिकाणीं मात्र जे रत ते असूर तमोगुणी व नित्य संसारी, होत. '**ज्ञानं स्वभावो जीवानां माययाचाभिभूयते** (ज्ञान हा जीवांचा स्वभाव खरा, पण तो माझ्या त्रिगुणात्मक मायेनें लुप्त होतो.

**ज्ञानेश्वर**—....**पाहे पां शरीराचिया गांवा । जयालागीं आले पांडवा! । तो कार्यार्थ आघवा सांडूनिया ॥ इंद्रियग्रामींचे राजबिदीं** (राज्यमार्ग)। **अहं ममतेचिया जल्पवादीं । विकारां-**

**तरांची** .( दुसऱ्या विकारांची ) **मांदी** ( समुदाय ) **मेळवुनिया** ( मिळवितात. ) ॥ **दुःखशोकाच्या घाई । मारिलीयाची सेंच** ( आठवण ) **नाहीं ! । हें सांगावया कारण काई ? । जे ग्रासिले माया ॥ ह्मणोनि ते माते चुकले । .... ॥ १५ ॥**

**ये पुनर्नरोत्तमाः पुण्यकर्माणः—**

परंतु जे श्रेष्ठ कोटींतले लोक आहेत व जे पुण्यकर्मांचें आचरण करतात ते—–

**चतुर्विधा भजन्ते मां**
**जनाः सुकृतिनोऽर्जुन॥**
**आर्तो जिज्ञासुरर्थार्थी**
**ज्ञानी च भरतर्षभ ॥ १६ ॥**

**अर्जुन** ( अर्जुना ! ) **चतुर्विधाः सुकृतिनः जनाः मां भजन्ते** ( जे पुण्य कर्म करणारे लोक आहेत ते माझें भजन करितात. ह्यांचें चार वर्ग आहेत ) **भरतर्षभ** ( हे भरत कुलश्रेष्ठा ! अर्जुना ! ) **आर्तः, जिज्ञासुः, अर्थार्थी; ज्ञानी च** ( भ्रष्टैश्वर्य किंवा दुःखपिडीत लोक, (२) ज्ञान मिळवूं इच्छिणारे विद्यार्थी (३) धन मिळवूं इच्छिणारे, आणि (४) परमेश्वराचे तत्त्व जाणणारे; ) असे चार प्रकारचे लोक माझें भजन करितात.

**चतुर्विधाश्चतुष्प्रकारा भजन्ते सेवन्ते मां जनाः सुकृतिनः पुण्यकर्माणो हेऽर्जुन। आर्त आर्तिपरिगृहीतस्तस्करव्याघ्ररोगादिनाऽभिभूत आपन्नो जिज्ञासुर्भगवत्तत्त्वं ज्ञातुमिच्छति योऽर्थार्थी धनकामो ज्ञानी विष्णोस्तत्त्वविच्च हे भरतर्षभ ॥ १६ ॥**

अर्जुना ! आतां पूर्वसुकृतानें जे पुण्यकर्म करणारे आहेत असें सामान्य लोक समजतात, हे ही माझें भजन पूजन करितात. यांचे चार वर्ग आहेत. (१) कोणावर संकट आलेलें असलें म्हणजे चोरी झाली, रोग प्राप्त झाला, वाघ येऊन खावयास लागला, एवंच

कोणत्या तरी संकटांत सांपडून दीन झालेला असला म्हणजे त्या त्या संकट निवारणार्थ हे आपन्न लोक माझें, परमेश्वराचें,-क्षुद्र देवतांचें नव्हे-भजन करितात (२) भगवंताचें खरें तत्त्व काय आहे हे समजून घेण्याची आस्थापूर्वक खटपट करणारे विद्यार्थी परमेश्वराचें आराधन करितात. (३) धन हवें असलें किंवा ऐहिक व पारात्रिक सुख हवें असलें ह्मणजे कांहीं लोक माझी पूजा अर्चा करितात. (४) आणि सर्वव्यापी परमेश्वर जो विष्णु त्याचें तत्त्व पूर्णपणें समजलें आहे असे ज्ञानी लोकही परमेश्वराचें आराधन करितात. सारांश पहिल्या तीन प्रकारचे लोक वासनायुक्त आराधना करितात आणि चवथे जे ज्ञानी त्यांची भक्ति निष्काम असते. व त्यांच्या भक्तीचें पर्यवसान आत्मसाक्षात्कारलाभ हें होतें. आत्मज्ञानी ही शरीरवंत असेल तर भक्तिच करितोः '**विस्मर्यते कृतविदा कथमार्तबन्धो**' 'हे दीनबन्धो! तुझ्या प्रसादानें ज्याला आत्मप्रसाद झाला तो तुला कसा विसरेल?'

**मधुसूदन**—आर्त व अर्थार्थी यांनीं परमेश्वराचें भजन पूजन केलें असतां त्यांस जिज्ञासा उत्पन्न होऊन चित्तशुद्धि, श्रवणमनन, योग, निष्काम भक्ति, आत्मसाक्षात्कार या मार्गानें ते मुक्त होतात.

**शंकरानंद** पहिले तीन सगुणभक्ति करितात व ज्ञानी निर्गुणोपासना करितो.

**चतरजी** ( १ राजे अ० ३ श्लोक ११ पहा ).

**द्विवेदी**:-जिज्ञासु = शमदम, उपरम, तितिक्षा, समाधान इत्यादि साधनयुक्त असणारा निष्काम मुमुक्षु; आणि मोक्षाचीही इच्छा नाहीं, केवळ ब्रह्मस्वरूपीच लक्ष्य ज्याचें आहे, तो ज्ञानी अथवा निष्कारण अनन्यप्रेममय वृत्तीनें एकाकार झालेला भक्त, होय. **भागवतांत**ही हेंच सांगितलें आहे.

**रामानुज**–भगवत्प्राप्ति हाच परमपुरुषार्थ आहे असें समजणारा तो ज्ञानी.

**पंडित**—सगुणब्रह्म म्हणजे ईश्वर असें म्हणतात. ॥ १६ ॥

चिंतनांत 'आनंदातिरेकानें निमग्न असल्यामुळें त्यास सर्पविषाची खबरही नव्हती.

**पंडित**---सुगुणाशिवाय प्रीति नाहीं, प्रीतिशिवाय भक्ति नाहीं, आणि भक्तिवांचून नित्ययुक्तता नाहीं, असें सिद्धांत सांगून सगुणाची स्थापना करितात. सगुणाचा निषेध निर्गुणोपासक ज्ञानी करितात. केव्हां? सगुणभक्तीनेंच ज्ञान स्थिर होऊन आत्मसाक्षात्कार पूर्ण बाणेल तेव्हां! असा खरा मार्ग आहे तर पंडितांनीं सगुणाविषयीं इतका अट्टाहास कां केला आहे? याला उत्तर एकच कीं, शब्दघेवडया नास्तिक अद्वैत बोलभांडांनीं सर्व धर्ममार्गांचा बालिशपणानें निषेध केला व अत्याचार केला म्हणून निर्गुणांवर पंडितांचा हा कटाक्ष दिसतो. शिवाय पंडितांस निर्गुणता रुक्ष वाटत होती असेंही दिसतें.

**टामसन**--' अत्यर्थ ' सर्व विषयांपेक्षां श्रेष्ठ. ॥ १७ ॥

**न तर्ह्यार्तादयस्त्रयो वासुदेवस्य प्रियाः । न, किं तर्हि--**

**शिष्य**--संकटांत सांपडल्यामुळें परमेश्वरास आळविणारे इत्यादि पहिले तीन भक्त तर मग परमेश्वरास प्रिय नाहींतं असें होतें!

**गुरु**--तसें नाहीं.

**शिष्य**--तर मग वरील ह्मणण्याचें तात्पर्य सांगावें.

**गुरु**--ऐकः---

**उदाराः सर्व एवैते**
**ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ॥**
**आस्थितः स हि युक्तात्मा**
**मामेवानुत्तमां गतिम्॥ १८ ॥**

**सर्वे एव एते उदाराः** ( हे सर्वेही भक्त उदार, उत्कृष्ट, मोक्षमार्गी आहेत. ) **तु** ( पण ) **ज्ञानी आत्मा एव** ( ज्ञानी पुरुष माझा आत्माच आहे ) **इति मे मतं** ( असें माझें मत आहे. ) **हि** ( कारण ) **अनुत्तमां गतिं मां एव** ( ज्यापेक्षां श्रेष्ठ गति नाहीं असा जो मी

त्या माझेच ठिकाणीं ) **स युक्तात्मा आस्थितः** ( तो ज्ञानी भक्त, पुरुषार्थसिद्धि आहे असें समजून, समाधिनिष्ठ होतो. ) सारांश सर्वही भक्त मीमांसकादि कर्मठ, न्यायपर नास्तिक वावदूकांपेक्षां चांगलेच आहेत, पण ज्ञानी भक्त माझा प्रत्यक्ष आत्माच आहे. कारण सर्वश्रेष्ठगति म्हणजे मुक्ति, आत्मसाक्षात्कार ( परमेश्वरसाक्षात्कार ) झाल्यानेंच मिळणार असा निश्चय करून तो नित्य ज्ञानपूर्णसमाधीमध्यें निमग्न असतो. एवंच माझा आत्माच होतो.--

**उदारा उत्कृष्टाः सर्व एवैते त्रयोऽपि मम प्रिया एवेत्यर्थः। न हि कश्चिन्मद्भक्तो मम वासुदेवस्याप्रियो भवति ज्ञानीत्वत्यर्थं प्रियो भवतीति विशेषः। तत्कस्मादित्याह ज्ञानी त्वात्मैव नान्यो मत्त इति मे मम मतं निश्चयः। आस्थित आरोढुं प्रवृत्तः स ज्ञानी हि यस्मादहमेव भगवान्वासुदेवो नान्योऽस्मीत्येवं युक्तात्मा समाहितचित्तः सन्मामेव परं ब्रह्म गन्तव्यमनुत्तमां गतिं गन्तुं प्रवृत्त इत्यर्थः॥ १८॥**

संकटापन्न, ज्ञानार्थी व धनार्थी हे सर्व आपापली इच्छा तृप्त करण्यासाठीं भगवंताचें ( माझें ) सर्वकर्मार्पणपूर्वक आराधन करितात ह्मणून मला ते प्रियच आहेत. कोणत्याही निमित्तानें कां होईना पण सर्वेश्वर, सर्वदयाघन परमेश्वराचें आराधन करणारे सर्व भक्त मला, वासुदेवाला, केव्हांही अप्रिय होत नाहींत. हे सर्वच चांगले आहेत, सुकृति आहेत व हे सर्वच माझे लाडके आहेत; एक त्यांस ज्ञान नाहीं, म्हणून ते मला अप्रिय होतील असें म्हणण्याचें कारण नाहीं. ते मला प्रिय आहेत हें खरें; पण ज्ञानी जो आहे तो मला अत्यंत प्रिय होतो.

**शिष्य**--हें कशावरून ?

**गुरु**—प्रत्यक्ष भगवान सांगतात त्यावरून! शिवाय ज्ञानी पुरुषाला आत्मरूपाचें ज्ञान होऊन त्याचें अज्ञाननिरसन झालेलें असतें व 'मीच ब्रह्म आहें' असा त्याचा निश्चय झालेला असतो म्हणून तो परमेश्वरास प्रिय कसा असतो व त्यास परमेश्वर कसा प्रिय होतो

याचें स्पष्टीकरण ' आत्मा ' शब्दाच्या सहाय्यानं मागील श्लोकांत केलेंच आहे.

**शिष्य**—बरें येथें पक्षपात दोष तरी आहे! एक प्रिय आणि एक अत्यंत प्रिय असा तरी भेदाभेद आहे!

**गुरु**—नाहीं. ज्याची जशी योग्यता असेल तसें त्यास वागविणें किंवा तसें त्यास फल देणें यांत पक्षपात नाहीं. भाष्यांत व्याकरण शिकलेला विद्यार्थी व ' रामो हरिः ' ची संथा घेणारा विद्यार्थी हे दोघेही वैय्याकरण आहेत असें म्हणून एकसारखी दक्षणा दिल्यानें पक्षपात होईल; पण त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें दक्षणा दिल्यास होणार नाहीं. याचप्रमाणें मीच भगवान वासुदेव आहें, 'मी दुसरा तिसरा कोणीं नाहीं ' या प्रमाणें मनोनिश्चय करून जो नित्य समाधिनिष्ठ असतो व ' मी परमेश्वर आहें; परब्रह्म हीच अत्युत्तम गति आहे, महा पुरुषार्थसिद्धि हीच आहे, ' असें समजून जो मोक्षमार्गानें जातो, तो पुरुष माझा आत्मा होतो म्हणजे माझा अत्यंत प्रियकर होतो, एवंच माझें तादात्म्य पावतो, हें योग्यच आहे. हा भगवंतांचा सिद्धांत बाधित होईल असें म्हणण्यास कोण धजेल? सारांश—सर्वांत अद्वैत ज्ञानी पुरुष श्रेष्ठ आहे, कारण त्याची भक्ति निष्काम असते. इतरांसारखी सकाम नसते.

**श्रुतिप्रकार**—य एवं वेदाहं ब्रह्मास्मीति स इदꣳ सर्वं भवति, तस्य ह न देवाश्च नाभूत्या ईशत आत्मा ह्येषाꣳ स भवति ' ( मी ब्रह्म आहें, असें ज्यास ज्ञान झालें तो ब्रह्मच होतो; देवांच्याही हातून त्याचा पराभव होत नाहीं; कारण तो त्यांचाही आत्मा, ( नियामक, स्वामी ) होतो !)

**द्वैतवादी**—'ज्ञानी आत्माच आहे ' हें अद्वैतवाक्य लक्षणापर, स्तुतिपर आहे, वास्तविक अद्वैत नाहीं, असें स्वमताग्रहानें म्हणतात !

**ज्ञानेश्वर**—पाहे पां दुभतेयाचिया आशा । जग धेनूसी करितसे फांसा । परि दोरेवीण कैसा । वत्साचा बळी ॥ कां जे तनुमनप्राणें । तें आणीक कांहींच नेणें । देखतसांतें म्हणे । हे माय माझी ! ॥ तें येणें मानें (असें ) अनन्य गति । म्हणूनि

**धेनूही तैसीच प्रीति ।....जाणोनिया माते । जे पाहें विसरले माघौते** ( संसाराकडे ) । **जैसे सागरा येऊनि सरिते । मुरडावें ठेलें** ( माघारें वळणें राहिलें. ) ॥ **तैसी अंतःकरणकुहरीं** ( गुहेमध्यें ) **जन्मली । जयाची प्रीतिगंगा मज मीनली । तो मी हें काय बोली । फार करूं ? ॥**

**टॉमसनः**—' आत्म इव ' = माझ्यासारखा. हा अर्थ व पाठ अद्वैतास बाधक होय. ॥ १८ ॥

**ज्ञानी पुनरपि स्तूयते—**

पुनः ज्ञानी पुरुषाची स्तुति करितातः—

**बहूनां जन्मनामन्ते**
**ज्ञानवान्मां प्रपद्यते ॥**
**वासुदेवः सर्वमिति**
**स महात्मा सुदुर्लभः ॥ १९ ॥**

**बहूनां जन्मानां अन्ते** ( पुष्कळ जन्म घेतल्यानंतर शेवटीं ) **ज्ञानवान् ' वासुदेवः सर्वं ' इति मां प्रपद्यते** ( ज्ञानी पुरुषाला ' सर्वच वासुदेवमय आहे ' असा साक्षात्कार होऊन तो माझ्याशीं तादात्म्य पावतो. )–म्हणून–**स महात्मा सुदुर्लभः** ( अशा प्रकारचा महात्मा प्रायः दुर्लभच होय. )–' सर्वच वासुदेव आहे ' हें ज्ञान दीर्घ प्रयत्नानें व एकनिष्ठ भक्तीनें मात्र होत असल्यामुळें अशा प्रकारचे ज्ञानी दुर्मिळ आहेत व म्हणूनच ते परमात्म्यास अत्यंत प्रिय असतात हें योग्यच होय.—( " सर्व विश्वाला मायेनें वासयति म्हणजे आच्छादित करितो व प्रकाशित करितो तो सूत्रात्मा ( हिरण्यगर्भ ) वासुदेव होय. )–

**बहूनां जन्मनां ज्ञानार्थसंस्काराश्रयाणामन्ते समाप्तौ ज्ञानवान्प्राप्तपरिपाकज्ञानो मां वासुदेवं प्रत्यगात्मानं प्रत्यक्षतः प्रपद्यते । कथं, वासुदेवः सर्वमिति । य एवं सर्वा-**

**त्मानं मां प्रतिपद्यते स महात्मा न तत्समोऽन्योऽस्त्यधिको वा। अतः सुदुर्लभो मनुष्याणां सहस्रेष्वित्युक्तम् ॥ १९ ॥**

तत्त्वज्ञान, अद्वैतज्ञान उत्पन्न होण्यास जी बुद्धिशुद्धीची अपेक्षा, विषयवैराग्य व ज्ञानाविषयीं तीव्र जिज्ञासा, इत्यादि सामग्री लागते ती दृढनिश्चयी साधु पुरुषास पुष्कळ ( अनंत ) जन्माच्या शेवटीं प्राप्त होते; ही सामग्री प्राप्त झाली आणि गुरूपदेश, परमेशानुग्रह, यांच्या योगानें ज्ञान प्राप्त होऊन त्या ज्ञानाचा परिणाम झाला, दृष्टि अपरिच्छिन्न झाली, तें ज्ञान पूर्ण झालें, म्हणजे एकनिष्ठ राजयोगाच्या समाधिशुद्ध आत्मचिंतनसाहाय्यानें या ज्ञानी पुरुषाला प्रत्यगात्म्याचा, आत्मस्वरूपाचा, साक्षात्कार होतो. हा साक्षात्कार ह्मणजे वस्तुतः 'वासुदेवमय सर्व दृश्यविश्व आहे' या सिद्धांताचा प्रत्यक्ष परिचय अथवा विज्ञान होय. असो; याप्रमाणें सर्वात्मा जो मी याप्रत जो जातो, ज्याला परमात्मसाक्षात्कार होतो तोच महात्मा होय. त्याच्याशीं तुलना करण्यास योग्य किंवा त्याच्याहून अधिक, असा कोणी असत नाहीं. असला अद्वितीय पुरुष अत्यंत दुर्मिळ असतो. हजारों, लाखो, मनुष्यांत एखादाच सांपडतो, हें आतां आणखी जास्त फोड करून सांगावयास नकोच.

**द्वैतवादी**—'वासुदेवाच्या स्वाधीन सर्व आहे म्हणून सर्वच वासुदेव आहे ही लक्षणा होय!' अद्वैत ध्यावयाचें नाहीं म्हणून हा लक्षणापर अर्थ आहे. **ज्ञानेश्वरांचें** व्याख्यान चिंतनीय आहे. ॥१९॥

**आत्मैव सर्वं वासुदेव इत्येवमप्रतिपत्तौ कारणमुच्यते—**

**शिष्य**—गुरुमहाराज! 'सर्वच आत्मा आहे, सर्वच वासुदेव आहे' असें ज्ञान प्रत्येक पुरुषास कां होत नाहीं?

**गुरु**—याचीं कारणें मागें अनेक वेळां सांगितलींच आहेत; आणखी पुनः सांगतात :—

**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः**

**प्रपद्यन्तेऽन्यदेवताः ॥**

**तं तं नियममास्थाय**
**प्रकृत्या नियताः स्वया ॥ २० ॥**

**तैः तैः कामैः हृतज्ञानाः** ( त्या त्या म्हणजे निरनिराळ्या प्रकारच्या जारणमारणादि दुष्ट वासनांनीं ज्यांचें ज्ञान दुष्ट व नष्ट झालें आहे )–ते लोक–**अन्यदेवताः प्रपद्यन्ते** ( निराळ्या, गौण, देवतांचा आश्रय करितात ) **स्वया प्रकृत्या नियताः तं तं नियमं आस्थाय** ( आपआपल्या प्रारब्धानें प्राप्त झालेल्या प्रकृतींनीं म्हणजे स्वस्वभावांनीं बद्ध झाल्यामुळें देवताविशेषांचे ते ते नियम पाळून–ते अन्य देवतांची भक्ति करितात. )–सारांश वासनेच्या योगानें सामान्य जनांस परमेश्वर निष्ठा उत्पन्न होत नाहीं. क्षुद्र देवतांचें नियम पाळून ते त्यांची आराधना करितात.–आयास दोहीकडेही सारखेच असतात तथापि प्रकृतिवश लोक क्षुद्र देवतांचें आराधन करितात व सूज्ञ लोक ईश्वराची निष्काम आराधना करितात.

**कामैस्तैस्तैः पुत्रपशुस्वर्गादिविषयैर्हृतज्ञाना अपहृतविवेकविज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः प्राप्नुवन्ति वासुदेवादात्मनोऽन्या देवतास्तं तं नियमं देवताराधने प्रसिद्धो यो यो नियमस्तं तमास्थायाऽऽश्रित्य प्रकृत्या स्वभावेन जन्मान्तरार्जितसंस्कारविशेषेण नियता नियमिताः स्वयाऽऽत्मीयया ॥ २० ॥**

सामान्यतः जीवांची विवेकबुद्धि नष्ट होते ह्याचें कारण ‘ मला पुष्कल पशु-गृह-रूपी संपत्ति असावी, ’ ‘ मला संतति असावी,’ ‘ मला स्वर्गलोक मिळावा ’ इत्यादि वासना, मनुष्याची विवेकबुद्धि, दुष्ट करितात हें होय. आत्मस्वरूपाची प्राप्ति करून घेण्याऐवजीं विषयप्राप्तीची वासना आपल्या इच्छास्वातंत्र्याच्या दुरुपयोगानें प्रबल होते; त्यामुळें नित्यानित्य विवेकबुद्धि अस्तंगत होते. मग त्या त्या वासना पूर्ण करण्यासाठीं वासुदेवरूपी जो आत्मा त्याहून अत्यंत भिन्न, त्याहून विलक्षण अशा भूत, प्रेत, यक्षादि दुसऱ्या क्षुद्र देव-

तांचें आराधन सुरू होतें. ही आराधना अर्थातच त्या त्या देवतेच्या नियमाप्रमाणें जप, तप, उपवास इत्यादि नियमांन्वयें करावी लागते. सारांश विषयप्राप्तीसाठीं ज्या देवतांचें कामुक आराधन होतें त्या त्या क्षुद्र देवता होत व तीं मनुष्येंही क्षुद्रच होत. आत्मस्वरूपप्राप्तीसाठीं जें आराधन तें निष्काम व म्हणून श्रेष्ठतम असतें.

**शिष्य**—पण सगळेच लोक असें कां नाहीं करीत ? उत्तम सुख मिळावें ही सर्वांचीच इच्छा असतेना ?

**गुरु**—एकदां इच्छास्वातंत्र्याचा दुरुपयोग करण्यास सुरुवात झाली कीं जीवाच्या स्वभावाला विषयसंस्कार लागतात व ते संस्कार दृढ झाले म्हणजे पुढील व त्यापुढील जन्मांचीं कृत्यें वासना, विचार, व वाणी हीं सर्व त्या त्या पूर्वसंस्कारांनीं दृढ बद्ध होऊन तो पुरुष प्रकृतिवश होतो. म्हणून त्याचें इच्छास्वातंत्र्य उत्तरोत्तर नष्ट होऊन तो प्रकृतीचा दास होऊन बसतो; एतावता त्याला सदिच्छा होत नाहीं.

**चतरजी**—सकाम मूर्तिपूजा व्यर्थ आणि अनर्थक आहे असें सुचवितात. ( कठो० अ० २ श्लोक १८ ).

**ज्ञानेश्वर**—**आणि फळाचिया हांवा । हृदयीं कामा झाला रिगावा । कीं तयाचिये घसणी** ( संघट्टणानें ) **दिवा । ज्ञानाचा गेला ॥ ऐसे उभयतां आंधारे पडले । म्हणोन पासींच मातें** ( मी जवळ असतांनाही ) **चुकले ! । मग सर्वभावें अनुसरले । देवतांतरा ॥**

**पंडित**—ज्ञान असूनही वासनेमुळें तें पंगु होतें. **धुतां वस्त्रांचा मळ सुटे । परी बिबव्याचा डाग न फिटे । तैसा नैसर्गिक स्वभाव न सुटे । सच्छास्त्र सत्संगें करूनिही ॥** हा केवळ आग्रह होय. असो; **जो त्याचा स्वभाव । तो त्यास ' मी ' म्हणोनि वाटे भाव ! .... ॥ कामचि वाटे पुरुषार्थ । मोक्षप्रसंग म्हणती व्यर्थ । कीं विषयभोगाचे पदार्थ । मोक्षांत कैंचे ! ॥ २० ॥**

**तेषां च कामिनाम्**--

आणि या कामुक भक्तांची—

**यो यो यां यां तनुं भक्तः**
**श्रद्धयाऽर्चितुमिच्छति ॥**
**तस्य तस्याचलां श्रद्धां**
**तामेव विदधाम्यहम् ॥ २१ ॥**

**यः यः भक्तः यां यां तनुं आश्रित्य श्रद्धया अर्चितुं इच्छति** ( जो जो भक्त ज्या ज्या मूर्तीचा अवलंब करून तिचें श्रद्धापुरःसर पूजनार्चनादिक करूं इच्छितो ) **तां एव** ( त्या त्या मूर्तीवरच ) **तस्य तस्य श्रद्धां अहं अचलां विदधामि** ( त्या त्या भक्ताची श्रद्धा मी दृढ करून ठेवितों. )—ह्मणजे प्रत्येकाच्या उपास्य देवतेवरच त्याची श्रद्धा मी दृढ करितों.—

**यो यः कामी यां यां देवतातनुं श्रद्धया संयुक्तो भक्तश्च सन्नर्चितुं पूजयितुमिच्छति तस्य तस्य कामिनोऽचलां स्थिरां श्रद्धां तामेव विदधामि स्थिरीं करोमि ययैव पूर्वं प्रवृत्तः स्वभावतो यो यां देवतातनुं श्रद्धयाऽर्चितुमिच्छतीति ॥ २१ ॥**

जो कोणी कामुक ( सात्विक, राजस आणि तामस ) भक्त आपली वासना पूर्ण होण्यासाठीं एखाद्या देवतेवर श्रद्धा ठेवितो व तिचें आराधन करण्याविषयीं इच्छाप्रेरित होतो, त्या सकाम भक्ताची श्रद्धा त्या विषयपूर्ण करणाऱ्या देवतेवर मी दृढ करवितों. कारण मी सर्वांतर्यामी परमेश्वर आहे व श्रद्धा पूर्ण करण्याचें काम माझें आहे. सारांश, पूर्वकर्मार्जित इच्छेनें वासनायुक्त होऊन ती पूर्ण करण्यासाठीं ज्या श्रद्धेनें तो पुरुष देवतांचें आराधन करितो ती त्याची श्रद्धा मी त्या त्या देवतेवरच दृढ करितों.

**शिष्य**—वासुदेवच सर्वात्मक आहे तेव्हां ही प्रत्येक देवता म्हणजे वासुदेवच होय. तेव्हां या कामुक भक्तासही मुक्तीच मिळणार !

**गुरु**—नाहीं. विषयवासना तृप्तीसाठीं केलेल्या सकाम आराध-

नानें मुक्ति कधींही मिळणार नाहीं. मुक्ति मिळावयास आत्मस्वरूपाचें निष्काम व निःसीम आराधन पाहिजे.

**रामानुज**—'**य आदित्ये तिष्ठन्नादित्यो न वेद**' ( जो सूर्याच्या अंतर्यामीं राहून सूर्याचें नियमन करितो पण त्या सूर्यास त्या परमात्म्याचें ज्ञान नसतें. ) एवंच सर्व देवता ईशस्वरूपच आहेत.

**डेव्हिस**—त्याची ती अचल श्रद्धा मीच उत्पन्न करितों. ॥२१॥

**स तया श्रद्धया युक्त-**
**स्तस्या राधनमीहते ॥**
**लभते च ततः कामा-**
**न्मयैव विहितान्हि तान् ॥ २२ ॥**

**स तया श्रद्धया युक्तः** ( हा कामुक पुरुष वरील श्रद्धेनें युक्त होत्साता ) **तस्याः राधनं ईहते** ( त्या देवतेला संतुष्ट करण्याचा प्रयत्न करितो ) **च** ( आणि ) **ततः कामान् लभते** ( त्या देवताराधनापासून त्याचे इष्ट मनोरथ पूर्ण होतात. ) **हि मया एव तान् विहितान्** ( कारण वस्तुतः मीच ते त्याचे मनोरथ पूर्ण करितो ). सारांश या कामुक भक्तानें दृढश्रद्धा ठेऊन त्या त्या इष्ट देवतेचें आराधन विधिपूर्वक केलें म्हणजे त्याचे मनोरथ फलप्रद होतात. पण वस्तुतः सर्वश्रेष्ठ भगवानच हे मनोरथ सफल करितो.—

स तयेति । स तया मद्विहितया श्रद्धया युक्तः संस्तस्या देवतातन्वा राधनमाराधनमीहते चेष्टते लभते च ततस्तस्या आराधिताया देवतातन्वाः कामानीप्सितान्मयैव परमेश्वरेण सर्वज्ञेन कर्मफलविभागज्ञतया विहितान्निर्मितांस्तान्हि यस्मात्ते भगवता विहिताः कामास्तस्मात्तानवश्यं लभत इत्यर्थः । हितानिति पदच्छेदे हितत्वं कामानामुपचरितं कल्प्यं नहि कामा हिताः कस्यचित् ॥ २२ ॥

याप्रमाणें माझ्याकडून ती त्या कामुक भक्ताची श्रद्धा दृढ झाली असल्यामुळें तो भक्त त्या त्या देवतास्वरूपाची आराधना एकनिष्ठतेनें करितो. शास्त्रविधीप्रमाणें ही आराधना पूर्ण झाली म्हणजे आराध्यदेवता प्रसन्न होते व त्या कामुक भक्ताचे इष्ट मनोरथ पूर्ण होतात. पण ध्यानांत ठेव कीं ह्या देवतेच्या स्वरूपानें मी सर्वज्ञ, कर्मफलाची वांटणी कशी करावी हे जाणणारा आणि सर्व शक्तिमान परमेश्वरच कामुक भक्तांचे ईप्सित मनोरथ पूर्ण करित असतो. असो, माझ्याकडून ही व्यवस्था होत असल्यामुळें श्रद्धायुक्त कामुकभक्तींचीं फलें त्या त्या भक्तांस अवश्य मिळत असतात.

**शिष्य**— भगवन्! '**हितान् कामान्**' ( हित करणाऱ्या वासना ) अशीं पदें पाडलीं तर एक सुंदर अर्थ निष्पन्न होतो हें लक्ष्यांत आलेंच असेल. 'मी परमेश्वरच त्या त्या भक्तांच्या कल्याणकारी वासना पूर्ण करितो' असा अर्थ होणार!

**गुरु**—पदच्छेद ठीक आहे. पण कल्याणकारक हें विशेषण येथें लक्षणेनें मात्र लागू पडणार. कारण वासना आणि त्या हितकारक असा विचारच असंबद्ध होय! प्रत्येक वासना संसारांत घालणारी असते म्हणून ती कल्याणकारी असणें अशक्य आहे.

**शंकरानंद**—'**एष एव साधु कर्म कारयति**' ( पुरुषाच्या हातून सत्कर्म करविणारा परमेश्वरच आहे. ) सारांश त्या देवता व सर्व सृष्टि-नियम माझ्याच सत्तेनें चालतात; वस्तुतः त्या देवता परतंत्रच आहेत.

**रामानुज**—सर्व देवता मी; श्रद्धा माझीच होते; फलदाताही मीच; पण त्या त्या कामुक भक्तांस मात्र हें ज्ञान नसतें म्हणून ते फसतात.

राधन म्हणजे पूजन असा अर्थ घेतला म्हणजे **शंकरानंद, लॉसेन** इत्यादिकांप्रमाणें '**तस्याः आराधनं**' याचा '**तस्याराधनं**' असा आर्ष संधि करावा लागत नाहीं. **डॉव्हिस** साहेबांस या व मागील दोन श्लोकांत क्षुद्र देवतांची, परमेश्वराशिवाय बाकीच्या देवांची, निंदा प्रकट झालेली दिसते. दिसो बापडी! ॥ २२ ॥

**यस्मादन्तवत्साधनव्यापारा अविवेकिनः कामिनश्च तेऽतः--**

**गुरुः**—वत्सा! हें कामुक भक्त केवळ अविवेकी व सारासारविचार न करणारे होत. कारण ज्याला अंत आहे, मृत्यु आहे, अशा फलांची अपेक्षा करून तें फल मिळविण्यासाठीं ते जें कर्म करितात तेंही अंतवतच असतें. म्हणून—

> **अन्तवत्त फलं तेषां**
> **तद्भवत्यल्पमेधसाम् ॥**
> **देवान्देवयजो यान्ति**
> **मद्भक्ता यान्ति मामपि ॥ २३ ॥**

**तु अल्पमेधसां तेषां तत् फलं अंतवत् भवति** ( परंतु मंदबुद्धीच्या त्या कामुक भक्तांस प्राप्त झालेलें फल सांत, नाश पावणारें असतें. ) **देवयजः देवान् यान्ति** ( देवतांची आराधना करणारे लोक त्या त्या देवतांप्रत जातात. )—आणि—**मद्भक्ता अपि मां यान्ति** ( माझे भक्तही माझ्याकडेच येतात. )—देवतांनीं दिलेलें फल नाशवंत असतें. सारांश देवतांचे भक्त देवतांकडे व माझे भक्त माझ्याकडे येतात.—केवढा फरक होतो तो पहा ! देवतारूपानें माझेंच आराधन, देवतारूपानें मीच फल देणारा असतांही ह्या भक्तांस विनाशी फल मिळतें; आणि मी सर्वव्यापी परमेश्वर, याची निष्काम भक्ति केली असतां अविनाशी फल मिळतें. माझें ज्ञान होऊन सकाम आराधन कोणीं कदाचित् केलें तरी शेवटीं माझ्या अनुग्रहानें माझे सकाम भक्तांची कामना नष्ट होऊन ते निष्काम होतात आणि मुक्तीप्रत जातात.

**अन्तवद्विनाशि तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसामल्पप्रज्ञाना देवान्देवयजो यान्ति देवान्यजन्तीति देवयजस्ते देवान्यान्ति । मद्भक्ता यान्ति मामपि । एवं समानेऽप्यायासे मामेव न प्रपद्यन्तेऽनन्तफलायाहो खलु कष्टं वर्तन्त इत्यनुक्रोशं दर्शयति भगवान् ॥ २३ ॥**

**ज्यांची** बुद्धि अत्यंत मंद आहे, ज्यास दूरदृष्टि मुळींच नाहीं अशा

कामुक भक्तांस माझ्याकडून प्राप्त झालेले फळ व फळसुख हीं नाशिवंत असतात. आणि हें फल व हें फलसुख नाशिवंत आहे असें दिसत असूनही कामुक लोक त्या फलाची व फलसुखाची आशा करितात ! तेव्हां त्यांच्या बुद्धिमांद्याचें काय वर्णन करावें ? असो; देवतांची आराधना करणारे लोक त्या त्या देवतांप्रत जाऊन अंतवंत फळें पावतात; आणि माझे भक्त माझ्याकडे येऊन अनंतफल पावतात ! अर्जुना ! काय चमत्कार आहे पहा:-कीं जरी मी अनंतफल व परमावधीचें सुख देणारा आहे तरी माझी निष्कामभक्ती करणारे भक्त फारच थोडे निपजतात. आतां माझी भक्ती फार आयासकारी आहे असें कोणी ह्मणेल तर तसाही भाग नाहीं. सारांश संसारचक्रामध्यें केवळ आपल्या मंदबुद्धीनें वागणाऱ्या बिचाऱ्या लोकांची स्थिती सर्वतः अनुकंपनीय होय.

**प्रपाकार**—शातपथी श्रुतिः-" स यो हैतानन्तवन्त उपास्तेऽन्तवतꣳ स लोकं जयत्यथ यो हैताननन्तानुपास्तेऽनन्तꣳ स लोकं जयति."( अर्थ मूळश्लोकासारखाच आहे. जयति=प्राप्त करून घेतो. )

**शंकरानंद**—'कर्मणा पितृलोकः' 'विद्यया देवलोकः' '**देवो भूत्वा देवानप्योति**' ह्या श्रुति वरील अर्थाचें समर्थन करितात.

**संप्राप्यैनमृषयो ज्ञानतृप्ताः कृतात्मानो वीतरागाः प्रशान्ताः॥**
**ते सर्वगं सर्वतः प्राप्य धीरा युक्तात्मानः सर्वमेवाविशन्ति ॥**

( ज्ञानी, कृतकृत्य, निष्काम आणि प्रशांत ऋषी सर्वव्यापी परमेश्वराचें सर्वत्र दर्शन घेऊन समाधिनिष्ठ होत्साते ब्रह्म होतात.

**पर्वते**—'अपि' = यक्षराक्षसादिकांचें यजन करणारे यक्षराक्षसांप्रत जातात !

**द्विवेदी**—येथें सकामभक्तीचा अत्यंत निषेध व तिची अत्यंत निरर्थकता दाखविली आहे. संकोच, परिच्छिन्नता, ही उत्पन्न झाली म्हणजे दुःख आणि निःसीमता, अभेदता व निष्कामत्व प्राप्त झालीं म्हणजे निरतिशय सुख हा भेद आहे.

**रामानुजांचेंही** हेंच मत आहे.

**द्वैतवादी**—माझें आराधन प्रधानत्वानें करावें. इतर देवता ‘ हा परिवार आहे ’ असें समजावें.

**ज्ञानेश्वर**—ते भक्त मातें नेणती । जे कल्पनेबाहेरी न निघती । म्हणोनि कल्पितफळा पावती । अंतवंत ॥
कल्पना = इच्छा.

**रंगनाथ**—अगा मी प्रत्यक्षतर असतां । आणि ते मजमाजीच वर्ततां । परी नेणोनि क्षुद्र देवता । भजती सर्वथा काय सांगों ? । जैसें आमृताच्या सागरीं बुडिजे । मग तोंडासी वज्रमीठी पाडीजे ! । आणि मनीं तरी आठविजे । थिल्लर सहजे अभाग्य जनीं ॥ २३ ॥

**किं निमित्तं मामेव न प्रपद्यन्त इत्युच्यते—**

**शिष्य**—भगवन् ? हा काय चमत्कार बरें ? भगवंताकडेसच लोकप्रवृत्ति कां बरें होत नाहीं ?

**गुरु**—तेंच सांगतात, ऐक:—

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं**
**मन्यन्ते मामबुद्धयः ॥**
**परं भावमजानन्तो**
**ममाव्ययमनुत्तमम् ॥ २४ ॥**

**अबुद्धयः अव्यक्तं मां व्यक्तिं आपन्नं मन्यन्ते** ( मंद बुद्धीचे लोक असें समजतात कीं अव्यक्त, प्रपंचातीत, असा जो मी तो व्यक्त, प्रापंचिक झालों आहें ) कारण—**मम अव्ययं, अनुत्तमं परं भावं अजानन्तः** ( माझे अव्यय, सर्वोत्तम व सर्वश्रेष्ठ स्वरूप त्यांस समजलेलें नाहीं )—सारांश विकारशून्य, अद्वितीय आणि सर्वश्रेष्ठ असें जें माझें नित्य स्वरूप त्या स्वरूपाचें वास्तविक ज्ञान न झाल्यामुळें हे मंद बुद्धीचे लोक सर्वांस अगोचर असणारा जो मी तो गोचर स्वरूपाचा आहे, क्षणिक आहे असें मानितात; वस्तूस असणारा जो परि-

च्छेद तो नसणारा, देशकाल यांच्या पलीकडे असणारा, जागृति, सुषुप्ति इत्यादि तीन अवस्थांचा व स्थूल, लिंग व कारण देहांचा साक्षी, नित्य, निर्विकार अशा अगोचर परमेश्वरास अज्ञानी लोक देह धारण करणारा, मर्त्य, मोहग्रस्त असा समजतात! —

**अव्यक्तप्रकाशं व्यक्तिमापन्नं प्रकाशं गतमिदानीं मन्यन्ते मां नित्यप्रसिद्धमीश्वरमपि सन्तमबुद्धयोऽविवेकिनः परं भावं परमात्मस्वरूपमजानन्तोऽविवेकिनो ममाव्ययं व्ययरहित-मनुत्तमं निरतिशयं मदीयं भावमजानन्तो मन्यन्त इत्यर्थः॥२४॥**

मनास व वाणीस मी अगोचर आहे हें जें वेदप्रणीत माझें स्वरूप, तें न कळल्यामुळें मूर्ख लोक असें समजतात कीं मी आतां सर्वांस ज्या स्वरूपानें गोचर झालों आहें, तेंच माझें मूर्त स्वरूप हें खरें स्वरूप आहे. पण हें माझें नित्य म्हणजे खरें स्वरूप नव्हे. मी परमेश्वर स्वरूपानें नित्य प्रसिद्ध असतांही म्हणजे वेदवेदांतांनीं माझें स्वरूप 'अगोचर' आहे असें एक कंठानें अनंत वेळ सांगितलें असतांही मंद-बुद्धि लोक मला 'एक व्यक्ति आहे' असें समजतात. अर्थातच परमात्मस्वरूपाची व त्यांची ओळखच झालेली नाहीं. मी अव्यय आहे म्हणजे माझ्या अनंत स्वरूपाला बालाग्रही विकार होत नाहीं; (माझ्यामध्यें कमीज्यास्ती कांहीं होत नाहीं); मी सर्वोत्तम आहें; (माझ्यापेक्षां सुंदरतर असा पदार्थ नाहीं व असणें शक्य नाहीं); इत्यादि माझें स्वरूप सर्वप्रसिद्ध असतांही मला हे खुळे लोक इतर देवतेसारखी ही एक देवता असें समजतात व कामुक वासनेनें इतर देवतांप्रमाणेंच माझेंही आराधन सांसारिक बुद्धीनें करतात.

**प्रपाकार; रामानुज**—जगद्रक्षणाकरितां व उत्तम फल देण्याकरितां अवतार धारण करणाऱ्या मला हे अज्ञानी लोक मनुष्यस्वरूपानें ओळखतात, माझें खरें स्वरूप जाणत नाहींत.

**मधुसूदनाकार**— '**अव्यक्तं**' = कारणस्वरूप. '**व्यक्तं**' = कार्यस्वरूप. कारण स्वरूपाला कार्यस्वरूप असें मानितात; सर्वांचें कारण जो मी त्या मला 'एक कार्य आहे' असें मानितात. तसेंच माझें '

अवताररूपी सोपाधिक स्वरूपही सर्व कारणांचें कारण आहे, हें लोकास समजत नाहीं, मग निरुपाधिक, सच्चिदानंदघन, अद्वितीय असें माझें तत्त्व त्यांस कसें कळणार? मधु० प्रपा० श्रीधर हे सर्व म्हणतातः— 'अज्ञानी लोक मला सोडून अन्य देवतांची उपासना करितात.'

**शंकरानंद**—'मला अनात्मक, सोपाधिक स्वरूप देऊन तेंच स्वरूप आत्मा आहे, असें अज्ञान उराशीं धरून बाळगणाऱ्यास खरें ज्ञान कोठून होणार?'

**चतरजी**—अवताराचें रहस्य प्रापंचिक पुरुषास कळत नाहीं. (पहा. जानकृ० गु० अ० १ श्लो० ११)

**द्वैतवादी**—'**अव्यक्तं**' = जीवविलक्षण ईश्वरस्वरूप; हें ज्यास समजत नाहीं ते असुर होत. जीव व ईश्वर यामध्यें भेद असतांना तो नाहीं असें मानणारे राक्षस होत. '**अव्यक्तः परमात्माऽसौ व्यक्तो जीव उदाहृतः। मन्यते यस्तयोरैक्यं स यात्यधरं तमः॥**' (जीव व परमात्मा एकच आहेत असे मानणारे लोक अंधकारपूर्ण लोकाप्रत जातात.) हा अद्वैत्यांवर कडाखा आहे. पण जीव तोच ईश्वर असें अद्वैती मानितात हें म्हणणें भ्रांतिमूलक आहे. उपाधि सुटली, जीव-दृष्टि नाहींशी झाली म्हणजे 'सर्व ब्रह्ममय होतें' असा सिद्धांत आहे.

**टॉमसन** साहेब पुनः येथें घसरले! परब्रह्म आणि अवतार घेत-लेली मूर्ति यांमधील भेद न समजल्यामुळें या साहेबांनीं आमच्या गीताकारास फांशी देण्यासाठीं फांस व दोरी कृपा करून दिली आहेत! पण बिचाऱ्यास काय ठाऊक कीं गीताकारांच्या ऐवजीं स्वतःच्या अज्ञानामुळें तत्त्वज्ञानाच्या न्यायासनापुढें स्वतःवरच ही पाळी येणार आहे म्हणून! ॥ २४ ॥

**तदीयमज्ञानं किमित्युच्यते**—

**गुरुः**—असें अज्ञान कां उत्पन्न होतें म्हणून विचारशील तर त्याचें उत्तर हें पहा—

**नाहं प्रकाशः सर्वस्य**
**योगमायासमावृतः ॥**

मूढोऽयं नाभिजानाति
लोको मामजमव्ययम् ॥२५॥

**योगमायासमावृतः अहं सर्वस्य प्रकाशः न** ( योगमायेनें मी गुरफटून गेलों असल्यामुळें मी सर्वांसच गोचर होतों असें नाहीं; ) **अयं लोकः मूढः** ( हे प्रापंचिक लोक मूर्ख आहेत. ) **अजं अव्ययं मां न अभिजानाति** ( जन्मरहित व विकारशून्य जो मी त्या मला हे लोक जाणत नाहींत. )-योगमायेचें आवरण माझ्या भोंवती असल्यामुळें मी कामुक लोकांस दिसतच नाहीं व हे लोक मूर्ख असल्यामुळें माझें अनादि व अनंत स्वरूप त्यांस कळतही नाहीं.–

**नाहं प्रकाशः सर्वस्य लोकस्य केषांचिदेव मद्भक्तानां प्रकाशोऽहमित्यभिप्रायः । योगमायासमावृतो योगो गुणानां युक्तिर्घटनं सैव माया योगमाया तया योगमायया समावृतः संछन्न इत्यर्थः । अत एव मूढो लोकोऽयं नाभिजानाति मामजमव्ययम् ॥ ५५ ॥**

सर्वच लोकांस माझें स्वरूप प्रकट होतें असें नाहीं; तर मत्प्रसाद झालेले माझे जे खरे निष्काम आणि ज्ञानी भक्त आहेत त्यांना मात्र मी प्रकट असतों!

**शिष्य**—मागील श्लोकांत निर्गुण, निरंजन असें परमेश्वर स्वरूप प्रापंचिक लोकांस कळत नाहीं असें सांगितलें आणि ह्या श्लोकांत सगुण साकार, पण अनंत आणि अनादि असें परमेश्वर स्वरूपही कळत नाहीं हें सांगावयाचें आहेना?

**गुरु**—होय. परब्रह्माचेंच स्वरूप हे जी सृष्टिकर्त्री–योगमाया आहे या मायेनें—

**शिष्य**—ही माया तीन गुणांनीं म्हणजे सत्व, रज आणि तम या गुणांनीं झालेली आहे, नव्हे काय?

**गुरु**—बरोबर! ह्या त्रिगुणात्मक मायेनें झांकून ठेवलेलें जें परमेश्वर स्वरूप तेंही संसारी लोकांस दिसत नाहीं. एवंच निर्गुणाची प्रतीति

नाहीं आणि सगुण, साकार पण अनादि आणि अनंत अशा परमेश्वरी स्वरूपाचेंही ज्ञान अज्ञानी लोकांस होत नाहीं.

**प्रपाकार; मधूसुदन**—हा लोक योगमायासमुद्रांत बुडून गेला असल्यामुळें परमेश्वररूप जाणत नाहीं, असाही अर्थ करितात. परमेश्वर स्वच्छ व प्रकाशवंत आहे. मायेमध्यें प्रापंचिक लोक बुडाले असल्यामुळें मला ओळखत नाहींत. ह्या अर्थाच्या समर्थनार्थ प्रपाकार एक टिप्पणिकाग्रंथातील श्लोक व ऋग्वेदातील मंत्र देतात. '**नीहारेण प्रावृताः जल्प्या चासुतृप उक्थशासश्चरन्ति**' ( –अज्ञानांचीं कारणें ऋक्शाखेंतील श्रुतींत सांगितली आहेत.--दाट धुकें पडलें असतां काष्टपाषाण हे जसें ओळखतां येत नाहींत, त्याचप्रमाणें अज्ञानानें तुम्हांस खरें स्वरूप कळत नाहीं. ( २ ) शिवाय मी देव आहे, मी मनुष्य आहे, अशा तुमच्या अज्ञानानें असत्य कल्पना चाललेल्या असतात. ( ३ ( तुम्ही केवळ असुतृप म्हणजे उदरंभर, उदराप्रीत्यर्थ धडपड करणारे अहांत. आणि ( ४ ) येथील भोगांवर तृप्त न होतां तुम्हास स्वर्गांतील भोग हवे असल्यामुळें त्या भोगांसाठीं तुम्ही यज्ञयागादिक करीत असता. एवंच तुम्ही भोगपर, मायामोहित असल्यामुळें तुह्मांस वास्तविक ज्ञान होत नाहीं. )

**मधुसूदन**—योग म्हणजे संकल्प हीच माया ती योगमाया.

**श्रीधर**—योग म्हणजे युक्ती, अचिंत्य प्रज्ञाविलास तोच आहे माया म्हणजे अघटितघटनाचातुर्य त्यानें झांकून गेलेला.

**शंकरानंद**—पुरुषाला जन्ममरणप्रवाहांत घालणारी ती योगा, तीच आहे तमोरूपा माया ती योगमाया. डोळ्यावर पटल आलें म्हणजे अंध असें वाटतें तद्वतच आणि त्यामुळेंच मी परमेश्वर स्वयंप्रकाश असतांही अज्ञानव्याप्त लोकांस दिसत नाहीं. अज व अव्यय हीं विशेषणें सार्थ आहेत असें दाखविण्यासाठीं श्रुतींचे आधार देतात.

**पर्वते**—'योग' = हे योगी अर्जुना ! असें निराळें पद काढितात. भगवंताचा चित्तसमाधि जो योग त्यानें उत्पन्न केलेली माया ती योगमाया असाही अर्थ सांगतात.

**चतरजी**—सृष्ट्युत्पादकशक्तीनें आवृत केला गेलों असल्यामुळें मी कोणास दिसत नाहीं.

**द्वैतवादी**—'माझ्या इच्छेनें अज्ञान उत्पन्न होतें' असें परमेश्वराकडून द्वैतवादी वदवितात हें इच्छास्वातंत्र्याच्या समर्थकांस अन्याय्य वाटतें. असो; 'परमेश्वर दिसत नाहीं, मायेचा पडदा आहे म्हणून; तसेंच या पडद्यानें ईश्वरासही आपलें हें जग दिसत नसेल!' या शंकेस येथें व खालील श्लोकांत उत्तर आहे.

**ज्ञानेश्वर**—**कां जे योगमायेच्या पडळें** ( पटलानें )**। हे झाले आहाति आंधळे। ह्मणोनि प्रकाशाचेनि देहबळें। न देखती मातें॥ येऱ्हवी मी नसें ऐसें। कवण वस्तुजात असे?। पाहे पां लवण जळरसें। रहित आहे?॥ पवन कवणातें न शिवेचि?। आकाश कें** ( काय ) **न समावेचि?। हें असो; एक मीचि। विश्वीं आहे॥**

**पंडित**—त्रिगुणमायातीत जो मी तो मी त्रिगुणमायाबद्ध आहे, असें मूर्ख लोक समजतात.॥ २१॥

**यया लोकमायया समावृतं मां लोको नाभिजानाति नासौ योगमाया मदीया सती ममेश्वरस्य मायाविनो ज्ञानं प्रतिबध्नाति यथाऽन्यस्यापि मायाविनो माया ज्ञानं तद्वद्यत एवमतः-**

**शिष्य**—भगवन्! ह्या अलौकिक व त्रिगुणात्मक मायेनें व्यापून टाकिलें आहे म्हणून परमेश्वरी स्वरूप लोकांस दिसत नाहीं हें समजलें. पण मला असें वाटतें कीं ज्याप्रमाणें मायावश झाल्यामुळें लोक अज्ञानांत राहतात, याप्रमाणें परमेश्वराचें या मायेशीं नित्य सान्निध्य असल्यामुळें त्याचेंही ज्ञान ही माया नष्ट करीत असेल. परमेश्वराचीच माया असली तरी व तो तिचा स्वामी असला तरी या अलौकिक मायेला तो वश झालाच पाहिजे

**गुरु**—नाहीं. ज्याप्रमाणें व्यवहारांतील जादूगार आपल्या जादु-

गिरीस आपल्या स्वाधीन ठेवितो, तसाच हा प्रकार आहे. एवंच परमेश्वराचें सर्वज्ञत्व अबाधित आहे.

**वेदाहं समतीतानि**
**वर्तमानानि चार्जुन ॥**
**भविष्याणि च भूतानि**
**मां तु वेद न कश्चन ॥ २६ ॥**

**अर्जुन** (अर्जुना!) **अहं समतीतानि, वर्तमानानि च, भविष्याणि भूतानि वेद** ( भूतकालिन, वर्तमान आणि भविष्यकालचे, सारांश ती तिन्ही काळचे यच्चावत सचराचर पदार्थ व व्यवहार मला माहित आहेत, मला त्रिकाल ज्ञान आहे. ) **तु** ( पण ) **कश्चन मां न वेद** ( मला मात्र कोणी जाणत नाहीं ). अर्थ स्पष्ट आहे.

**अहं तु वेद जाने समतीतानि समतिक्रान्तानि भूतानि वर्तमानानि चार्जुन भविष्याणि च भूतानि वेदाहं मां तु वेद न कश्चन मद्भक्तं मच्छरणमेकं मुक्त्वा मत्तत्त्ववेदनाभावादेव न मां भजन्ते ॥ २६ ॥**

योगमायेनें माझें ज्ञान कलुषित झालें नाहीं म्हणून भूतकालीन ( पाठीमागें होऊन गेलेले ) वर्तमान कालीन ( हल्लीं असणारे ) व भविष्य कालीन ( पुढे होणारे ) सर्व चराचर पदार्थांची आणि म्हणूनच प्राण्यांची व त्यांच्या व्यवहारांची यथार्थ माहिती मला आहे कारण मी जगाच्या उत्पत्तिस्थितिलयाचा कर्ता व मायेचा स्वामी आहे. मला मोह पाडण्याचें सामर्थ्य मायेला नाहीं; म्हणून मी त्रिकालज्ञ आहे. समजलें ? पण मला मात्र सामान्यतः कोणी जाणत नाहीं; कारण सर्व जग अनित्य व जड मायेनें व्यापलें आहे.

**शिष्य**—काय ? परमेश्वराचे निष्काम व अनन्य भक्तांस सुद्धां त्याचें स्वरूप कळत नाहीं ?

**गुरु**--ते लोक सोडून दे रे! आपण प्रापंचिक लोकांविषयीं बोलत आहोंत. असो; प्रापंचिक लोकांस परमेश्वराचें खरें तत्त्व काय आहे हें न समजल्यामुळें ते त्या सर्वेश्वराची निष्काम भक्ति करीत नाहींत. एवंच, स्वतः आपण होऊन आपलें अज्ञान वाढविणाऱ्या प्रापंचिकांच्या मंद बुद्धीचा हा परिणाम होय. यायोगें परमेश्वर व आपण एकच असतां अभिमानामुळें ते व्यक्तिरूपानें वावरतात व अज्ञानी होतात. परमेश्वरास अभिमान नाहीं म्हणून तो समष्टिदृष्टीचा, सर्वज्ञ, असतो.

**शंकरानंद**--देह, इंद्रियें, मन अगर बुद्धि या कोणासही मी गोचर नाहीं. ' **अहं विजानामि विविक्तरूपो न चास्ति वेत्ता मम चित्सदाहम्** ' ( अर्थ स्पष्ट आहे ).

**द्विवेदींचें** व्याख्यान अवश्य वाचावें.

**द्वैतवादी**--' मी स्वतंत्र आहें ' म्हणून माया मला कांहीं करूं शकत नाहीं. माझ्या प्रसादानेंच इतरांचेंही मायाबंधन तुटतें.

**ज्ञानेश्वर--येथें भूतें आहाति जेतुलीं । तियें मीच होऊनि ठेलीं । ....हा बोलधी** ( हें बोलावयाचें मात्र ), **येऱ्हवीं कांहीं । होय ना जाय ॥ दोराचिया सापासी । डोंबा** ( काळा ), **वडिया** ( कवडा ), **ऐसी । संख्या न करवे कोणासी । तेवीं भूतांसी मिथ्यत्वें ! ॥ २६ ॥**

**केन पुनर्मत्तत्त्ववेदनप्रतिबन्धेन प्रतिबद्धानि सन्ति जायमानानि सर्वभूतानि मां न विदन्तीत्यपेक्षायामिदमाह—**

**गुरु**—पुनः भगवान सांगतात तें ऐकः ह्या श्लोकांत परब्रह्म व परमेश्वरी तत्व समजण्याला कोणते कोणते अडथळे येतात व जन्ममरण पावणारे प्रापंचिक लोक मायाबद्ध कसे होतात आणि परमश्रेष्ठ तत्त्वांचा विचार कां करित नाहींत, सारांश परमपुरुषार्थाची प्राप्ति त्यांस कां होत नाहीं, याचा उलगडा केला आहे. ऐकः--

**इच्छाद्वेषसमुत्थेन**

**द्वंद्वमोहेन भारत ॥**

**सर्वभूतानि संमोहं**
**सर्गे यान्ति परंतप ॥ २७ ॥**

**भारत** ( शूर व शुद्ध भरत कुलामध्यें जन्म पावलेल्या अर्जुना! ) **इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन सर्वभूतानि परंतप सर्गे संमोहं यान्ति** ( इच्छा आणि द्वेष यांच्या पासून उत्पन्न होणारा जो द्वंद्व-मोह त्या मोहाच्यामुळें, हे शत्रुतापका! सर्वांवर जय मिळविणाऱ्या अर्जुना! सर्व प्राणी जन्मकाळाच्या वेळींच अज्ञानवश होतात. ) अर्थ स्पष्ट आहे व भाष्य वाचल्यावर स्पष्टतर होईल.—

इच्छाद्वेषसमुत्थेनेच्छा च द्वेषश्चेच्छाद्वेषौ ताभ्यां समुत्तिष्ठतीतीच्छाद्वेषसमुत्थस्तेनेच्छाद्वेषसमुत्थेन । केनेति विशेषापेक्षायामिदमाह द्वंद्वमोहेन द्वंद्वनिमित्तो मोहो द्वंद्वमोहस्तावेवेच्छाद्वेषौ शीतोष्णवत्परस्परविरुद्धौ सुखदुःखतद्धेतुविषयौ यथाकालं सर्वभूतैः संबध्यमानौ द्वंद्वशब्देनाभिधीयेते । तत्र यदेच्छाद्वेषौ सुखदुःखतद्धेतुसंप्राप्त्या लब्धात्मकौ भवतस्तदा तौ सर्वभूतानां प्रज्ञायाः स्ववशापादनद्वारेण परमार्थात्मतत्त्वविषयज्ञानोत्पत्तिप्रतिबन्धकारणं मोहं जनयतः न हीच्छाद्वेषदोषवशीकृतचित्तस्य यथाभूतार्थविषयज्ञानमुत्पद्यते बहिरपि, किमु वक्तव्यं ताभ्यामाविष्टबुद्धेः संमूढस्य प्रत्यगात्मनि बहुप्रतिबन्धे ज्ञानं नोत्पद्यत इति । अतस्तेनेच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत भरतान्वयज सर्वभूतानि संमोहितानि सन्ति संमोहं संमूढतां सर्गे जन्मन्युत्पत्तिकाल इत्येतद्यान्ति गच्छन्ति हे परंतप । मोहवशान्येव सर्वभूतानि जायमानानि जायन्त इत्यभिप्रायः । यत एवमतस्तेन द्वंद्वमोहेन प्रतिबद्धप्रज्ञानानि सर्वभूतानि संमोहितानि मामात्मभूतं न जानन्त्यत एवाऽऽत्मभावेन मां न भजन्ते ॥ २७ ॥

कोणता तरी बाह्य विषय आपल्यास हवा अशी जी वासना उत्पन्न होते, तिचें नांव इच्छा, आणि दुसरा कोणता तरी विषय आपल्यास नको असला म्हणजे जो तिटकारा आपल्यास उत्पन्न होतो, त्याचें नांव द्वेष होय. आतां या इच्छाद्वेषापासूनच उत्पन्न होणारा जो मोह.—

**शिष्य—**भगवन्! हें नाहीं नीट समजलें.

**गुरु—**अरे! इच्छा म्हणजे तीव्र वासना आणि द्वेष ह्मणजे तीव्र तिटकारा हें तुला आतांच सांगितलें. इच्छा आणि द्वेष हे परस्पर विरुद्ध आहेत म्हणजे शीत आणि उष्ण हे जसे एकमेकांला विरोधी आहेत, तसेच इच्छा व द्वेष हे विकारही परस्परविरोधी आहेत. इच्छेचा विषय, सुख आणि सुख देणारे पदार्थ असतात व द्वेषाचा विषय दुःख आणि दुःख देणारे विषय असतात. आतां एकाच पदार्थाविषयीं सुखभावना व दुःखभावना एकदम असत नाहींत. तेव्हां इच्छा आणि द्वेष हे विकार निरनिराळ्या वेळीं प्रापंचिकांच्या मनावर स्वामित्व गाजवितात. यांपैकीं एकाचें म्हणजे इच्छेचें (सुखाची इच्छा व सुख देणारा पदार्थ प्राप्त करून घेण्याची इच्छा) किंवा द्वेषाचें (दुःखाची भीति व दुःख देणाऱ्या पदार्थांची भीति) स्वामित्व प्रस्थापित होऊन त्यांचा अवतार मनोभूमिकेवर होतो; सारांश जेव्हां आपलें मन इच्छेच्या अगर द्वेषाच्या स्वाधीन होतें, तेव्हां परमार्थतत्त्वाचा विषय जें ब्रह्म, त्याच्याविषयीं अगर परमपुरुषार्थ जी मुक्ति, तिच्याविषयीं ज्ञान उत्पन्न होत नाहीं. मन कलुषित झालें म्हणजे वास्तविक ज्ञान उत्पन्न होत नाहीं, हा अनुभव आहेच. याचें कारण इच्छा अगर द्वेष यामुळें उत्पन्न झालेला ज्ञानशत्रु जो मोह तो होय. तात्पर्य इच्छा आणि द्वेष हेंच तें द्वंद्व आणि या द्वंद्वापासूनच ज्ञानशत्रु, मोह, उत्पन्न होतो. हा मोह ज्ञानाचा शत्रु आहे. पहा कीं या बाह्यसृष्टींतील विषयांचें, उदाहरणार्थ ग्रहणाचें, विवेचन चालू केलें असतां व पुराणधर्मप्रीतीनें किंवा परधर्मद्वेषानें आपलें अंतःकरण मळीण झालें असेल तर ग्रहण कां लागतें, ग्रहण लागण्याची वेळ कोणती, ग्रहणाचें फल काय, इत्यादि विवेचन यथार्थ होत नाहीं व पदार्थाचें किंवा प्रसंगाचें वास्तविक स्वरूप आपल्यास

समजत नाहीं हा अनुभव आपल्यास प्रतिक्षणीं येत असतो. ही जर बाह्यवस्तुसंबंधें स्थिति आहे, इंद्रिय, मन किंवा बुद्धि यांपैकीं एकास गोचर असणाऱ्या पदार्थांची जर ही स्थिति आहे, तर आत्मविचारासारख्या अत्यंत गूढ, अत्यंत गहन, अत्यंत अडचणीच्या, विषयाचा विचार करितांना आपली बुद्धि इच्छा-द्वेषजन्य मोहानें पूर्ण कलुषित झाली असल्यास आत्मविचार मुळींच करितां येणार नाहीं; वास्तविक आत्मज्ञान मुळींच होणार नाहीं, हें काय सांगावें? असो; अशा बलिष्ठ इच्छा-द्वेष नामक द्वंद्वापासून किंवा द्वंद्वाप्रीत्यर्थ उत्पन्न झालेल्या मोहानें या सृष्टींतील प्रापंचिक प्राणी जन्मतःच ( स्थूल, देह, प्राप्त झाल्याबरोबर ) अज्ञानास सर्वथा वश होतात, अज्ञान नगरींत जाऊन राहतात व आपण सुखी आहोंत, असें दुःख भोगित असतांही मानितात! सारांश सर्व प्रापंचिक प्राणी पूर्वकर्मजन्य मोहानें जन्मापासून अज्ञानवश झालेले असतात. असें आहे म्हणून, पूर्वकर्मामुळें जन्मादारभ्य ते अज्ञानवश असतात म्हणून, त्यांची ज्ञानज्योति अत्यंत मंद झालेली असते; ज्ञान होण्यास अनेक अडचणी या मोहामुळें उत्पन्न होतात आणि प्रायः सर्व लोक इच्छा-द्वेषांनीं प्रेरित असल्यामुळें बाह्यविषयाकडे धांव घेतात. त्यांचा प्रत्यक्ष आत्मा जो मी, तो मी, त्यांस दिसत नाहीं, समजत नाहीं व बुद्धिगोचर होत नाहीं! माझें ज्ञान नसल्यामुळें हे अज्ञानी कामुक लोक माझें निष्काम भजन पूजन करित नाहींत. हें अर्थातच सिद्ध झालें. एवंच इच्छाद्वेष हे जबरदस्त ज्ञानशत्रु आहेत, व ते जन्मतःच उत्पन्न होतात; म्हणून प्राणी आत्मतत्त्वाचा विचार अगर पुरुषार्थ साधनाचा अभ्यास करित नाहींत.

**पर्वते**—प्रपंच मिथ्या असतां त्यावर सत्यबुद्धि आणि आत्मा सत्य असतां त्यावर मिथ्या बुद्धि असणें याचें नांव मोह. प्रपंचदृष्टि मिथ्या आहे. ब्रह्मदृष्टि सत्य आहे.

**रामानुज**—इच्छाद्वेष विषयासंबंधें मनुष्यांस असतात; परमेश्वराच्या संगमाची इच्छा व विषयांचा द्वेष हे विकार त्यांच्या ठायीं दिसत नाहींत.

**द्वैतवादी**—या श्लोकांत ‘ द्वंद्व ’=जीवेश्वर व त्यांचे धर्म हें होय. ह्यांचें जो ऐक्य मानितो तो मोहग्रस्त होय! वाहवा! एकूण सर्व

जगत् स्वभावतःच मोहग्रस्त आहे व म्हणूनच अद्वैतवादी आहे असा द्वैत वाद्यांचा अभिप्राय आहेना? पूर्णतत्त्ववादी आहे असा द्वैतवाद्यांचा अभिप्राय आहेना? द्वैतवाद सिद्ध करण्यासाठीं कोण तारंबळ ही!

**ज्ञानेश्वर**--तेच इच्छा हे कुमारी। मग ते कामाचिया तारुण्या आली। तेथ द्वेषेंसी मांडिली। वराडिक (लग्नसोहळा)! ॥ पुढील रूपकपूरक ओंव्या हृदयंगम आहेत.

**पंडित**—ईश्वर विद्योपाधि आहे; जीव अविद्योपाधि आहेत.॥२७॥

**के पुनरनेन द्वंद्वमोहेन निर्मुक्ताः सन्तस्त्वां विदित्वा यथाशास्त्रमात्मभावेन भजन्त इत्यपेक्षितमर्थं दर्शयितुमुच्यते--**

**गुरु**—आतां ह्या इच्छाद्वेषरूपी द्वंद्वमोहापासून कोण सुटतात व कोण परमेश्वरी तत्त्व ओळखून घेऊन शास्त्रविहित मार्गानें परमेश्वराचें -आत्मरूपानें-आराधन करितात हें मुमुक्षूंस समजावें ह्मणून सांगतात—

> येषां त्वन्तगतं पापं
> जनानां पुण्यकर्मणाम् ॥
> ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता
> भजन्ते मां दृढव्रताः ॥२८॥

**तु** (परंतु) **पुण्यकर्मणां येषां जनानां पापं अन्तगतं** (पुण्यकर्मेंच केल्यामुळें ज्या लोकांचें पाप लयास गेलें आहे, जे निर्मळ झाले आहेत) **ते द्वंद्वमोहनिर्मुक्ताः मां दृढव्रताः भजन्ते** ( ते पुण्यश्लोक पुरुष इच्छाद्वेषरूपी द्वंद्वाच्या तावडींतून मुक्त होऊन माझें भजनपूजन दृढनिश्चयानें श्रद्धापूर्वक करितात. )---इच्छा व द्वेष नष्ट होऊन जर शास्त्रपूर्वक दृढनिश्चयानें ईश्वरभजन केलें तरच पुरुषार्थसिद्धि होते.—

**येषां तु पुनरन्तगतं समाप्तप्रायं क्षीणं पापं जनानां पुण्यकर्मणां पुण्यं कर्म येषां सत्त्वशुद्धिकारणं विद्यते ते पुण्यकर्माणस्तेषां पुण्यकर्मणां, ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां**

**परमात्मानं दृढव्रता एवमेव परमार्थतत्त्वं नान्यथेत्येवं निश्चित-विज्ञाना दृढव्रता उच्यन्ते॥ २८॥**

**शिष्य**--जन्मापासूनच जर इच्छाद्वेषनामक राक्षसांनीं आपल्या स्वाधीन प्राणीमात्र करून घेतले तर परमतत्वज्ञान आणि मोक्ष हीं कोणासच मिळणार नाहींत ही शंका कोणी घेईल, तिच्या निरसनार्थ ह्या श्लोकाचा अवतार आहेना?

**गुरु**--होय. वत्सा! अनेक जन्मांमध्यें निष्काम आणि अभिमान-शून्य अशीं पुष्कळशीं कर्में झाल्यामुळें बुद्धीवर संस्कार होऊन ज्यांचें पाप प्रायः अस्तंगत झालें व पुण्यकर्में केल्यामुळें ज्यांचें अंतःकरण शुद्ध, निर्मळ आणि इच्छाद्वेषशून्य झालें, सारांश मागील श्लोकांत सांगितलेला ज्ञानप्रतिबंधक मोह ज्यांनीं शुद्ध मार्गानें नाहींसा केला, ते पुण्यश्लोक पुरुष-मी जो परमात्मा त्या-माझें निष्काम बुद्धीनें व मोहशून्य वृत्तीनें, प्रेमपुरःसर आणि ज्ञानपूर्वक भजन पूजन करितात. त्यांच्या बुद्धीचा असा निश्चय झाला असतो कीं निर्गुण, निरंजन, शुद्ध, मुक्त, बुद्ध आणि नित्य असें कल्पनातीत जें तत्त्व आहे व जें सर्वव्यापी व अनंत आहे, तोच परमात्मा, तोच परमेश्वर होय; दुसरा नाहीं. ह्या असल्या पुरुषास अचाल्यसंकल्प, दृढव्रत, ह्मणावें. कल्पना करितां येईल त्याच्याही पलीकडे असणारी संकटशतपरंपरा आली किंवा गेली तरी ज्यांचा निश्चय चळतच नाहीं ते अचाल्यसंकल्प होत. या प्रमाणें पुण्यश्लोक पुरुषांचा सतत अभ्यास श्रद्धायुक्त दृढनिश्च-यानें झाला ह्मणजे सर्व अज्ञान नष्ट होऊन ते मत्स्वरूपाप्रत पावतात.

**प्रपाकार**--'**नैनं पाप्मा तपति**' (बृहदा० ४।४।२३) अशीच उक्ति छांदोग्यामध्येंही आहे. (असल्या शुद्ध पुरुषापुढें पापाची मात्रा काय चालणार?

**चतरजी**--(पहा. एफीसीनियन्स अ० ३ श्लो० १७।१८।१९.)

**रामानुज**--'जरामरणमोक्ष' = प्रकृतिवियुक्त असें जें आत्म-स्वरूप त्याचे दर्शनासाठीं, व मोठें ऐश्वर्य मिळविण्यासाठीं माझें भजन एक निष्ठेनें करितात.

**ज्ञानेश्वर**--**ऐसे विकल्पाचे वायाणे** (व्यर्थ)। **कांटे देखोनि सीणाणे** (तीक्ष्ण)। **जे मतिभ्रमाचे पासावणे** (सन्निध होणें)। **घेतीचिना**॥

**उजू एकनिष्ठेच्या पाउलीं । रगडुनि विकल्पाचे भालीं** (भाल्यानें) । **महापातकांची सांडिली । अटवी ॥ मग पुण्याचे धावा** (मदतीनें) **घेतले । आणि माझी जवळीक पावले । किंबहुना; ते चुकले । वाटवधेया** ( वाटमाऱ्यांच्या हातून ते निसटले. ) ॥ २८ ॥

**ते किमर्थं भजन्त इत्युच्यते--**

**गुरु**--असे पुरुष माझें आराधन किंनिमित्त करितात तें पहाः--

**जरामरणमोक्षाय**
**मामाश्रित्य यतन्ति ये ॥**
**ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्न-**
**मध्यात्मं कर्म चाखिलम् ॥ २९ ॥**

**जरामरणमोक्षाय मां आश्रित्य ये यतन्ति** ( वृद्धदशा आणि मृत्यु यांच्या पासून सुटका करून घेण्यासाठीं माझा आश्रय करून जे अभ्यास करितात ) **ते ब्रह्म तत् विदुः** ( त्यांसच श्रेष्ठ असें जें परब्रह्म तें समजून उमजतें )-च (आणि) **कृत्स्नं अध्यात्मं, अखिलं कर्म** ( सर्व अध्यात्म आणि सर्व कर्म त्यांसच समजून उमजतें )--सारांश जरा व मरण टाळण्यासाठीं परमेश्वराचा आश्रय धरून जे अभ्यास करितात त्यांस ब्रह्मज्ञान, अध्यात्मज्ञान आणि कर्मज्ञान, सारांश मोक्षादि प्राप्त होतात. परमेश्वराचा आश्रय केल्याविना अन्य तरणोपाय नाहीं.

**जरामरणमोक्षाय जरामरणमोक्षार्थं मां परमेश्वरमाश्रित्य मत्समाहितचित्ताः सन्तो यतन्ति प्रयतन्ते ये ते यद्ब्रह्म परं तद्विदुः, कृत्स्नं समस्तमध्यात्मं प्रत्यगात्मविषयं वस्तु तद्विदुः, कर्म चाखिलं समस्तं विदुः ॥ २९ ॥**

संपूर्ण अज्ञान नष्ट झालेलें नसतें म्हणून 'जरा, वृद्धावस्था, व मरण हीं जीवांच्या पाठीमागें लागलीं आहेत' असा समजही नष्ट

झालेला नसतो. असो; तेव्हां अत्यंत दुःख देणाऱ्या या द्वयीच्या नाशार्थ हे पुण्यश्लोक भक्त माझें सगुण स्वरूप चित्तांत धरून त्याचें निष्काम बुद्धीनें ध्यान करितात व शेवटीं समाधिनिष्ठ होतात. असा त्यांनीं प्रयत्न दीर्घ कालपर्यंत, संपूर्ण अज्ञान नष्ट होईपर्यंत, केला, यज्ञयाग अगर लोककल्याण एकनिष्ठेनें व निष्काम मनानें करून नंतर श्रवण, मनन व योगाभ्यास केला म्हणजे जगाचें आदिकारण जें ब्रह्म तेंच सकळ अध्यात्म वस्तु आहे व सकल कर्मही तेंच आहे असें त्या पुरुषांस ज्ञान होतें. हें जाणलें म्हणजे जाणावयाचें असें दुसरें कांहीं राहत नाहीं. ( श्लो० २ पहा. ) संसारसागर तरण्याला हाच मार्ग आहे.

**शिष्य**—हा शेवटला भाग मला नीटसा समजला नाहीं.

**गुरु**—थोडा वेळ थांब: या व पुढील श्लोकांची मीमांसा आठव्या अध्यायांत स्पष्ट होणार आहे म्हणून येथें मी कांहीं सांगत नाहीं.

**शंकरानंद, चतरजी**—ही सगुणोपासना मंदबुद्धीकरितां आहे.

**द्वैतवादी**—एकांतभक्ति ही मोक्ष मिळविण्याप्रीत्यर्थ केलेल्या भक्तीपेक्षां श्रेष्ठ आहे. भक्तीसाठीं भक्ति ही अत्यंत श्रेष्ठ होय.

**ज्ञानेश्वरां**चा या व पुढील श्लोकांवरील भावार्थ अवश्य वाचावा. **पंडितांनीं** असें प्रतिपादिलें आहे कीं २९ वा श्लोक जिज्ञासुकरितां आहे.

**टामसन**—'**जन्ममरणमोक्षाय**' असा पाठ सुचवितात. 'जरा' शब्दांत जन्माचा अंतर्भाव होतो ना? ॥ २९ ॥

साधिभूताधिदैवं मां
साधियज्ञं च ये विदुः ॥
प्रयाणकालेऽपि च मां
ते विदुर्युक्तचेतसः ॥ ३० ॥

**इति श्रीमहाभारते श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः॥७॥**

[ येथें 'ज्ञानविज्ञानयोग' नामक सातव्या अध्यायाचें मूळ संपलें. ]

**साधिभूताधिदैवं च साधियज्ञं ये मां विदुः** ( अधिभूत, अधिदैव व अधियज्ञ यांच्यासह ज्यांस माझें खरें स्वरूप कळलें ) ते **युक्तचेतसः प्रयाणकाले अपि च मां विदुः** ( त्या समाधिनिष्ठ पुरुषांस माझें स्वरूप प्रयाणकाळाचे वेळीं, अंतकाळाचे वेळीं, सुद्धां कळतें. ) सारांश समाधिनिष्ठ भक्तांस माझें स्वरूप अंतकाळींही प्रकट होऊन ते मुक्त होतात.—

**साधीति । साधिभूताधिदैवमधिभूतं चाधिदैवं चाधिभूताधिदैवं सहाधिभूताधिदैवेन साधिभूताधिदैवं च मां ये विदुः साधियज्ञं च सहाधियज्ञेन साधियज्ञं ये विदुः प्रयाणकालेऽपि च मरणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः समाहितचित्ता इति ॥ ३० ॥**

**इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीमद्भगवद्गीताभाष्ये ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः ॥७॥**

अधिभूत, अधिदैव व अधियज्ञ यांच्यासह जे मला जाणतात, ते समाधिनिष्ठ पुरुष अंतकाळींसुद्धां युक्तचित्त राहून माझ्या प्रसादानें माझ्या दर्शनसुखाचा लाभ अनुभवितात; त्यांस मरणव्यथेचा स्पर्शही होत नाहीं.

**शिष्यः**—ह्याही श्लोकाचें स्पष्टीकरण पुढील अध्यायांत होणार आहे ह्मणून मी 'हा श्लोक मला समजला नाहीं,' असें ह्मणत नाहीं!

**[ येथें सप्तमाध्यायाचें गीताभाष्य संपलें. ]**

मपाकारः—तात्पर्यः—

चित्संविद्रूपतोऽन्तर्हृदयमनुगतो भासते प्रत्यगात्मा
बाह्यं भूम्यादिभूतेष्वतिशयितगुणैः संप्रविष्टो विभाति ।
वेदेष्वोंकाररूपः सवितरि महसा वीर्यवत्यूर्जितेन
प्राप्तस्तं वेत्ति योऽसौ मम तनुरिति तत्सप्तमेनोक्तमास्ते ।

( चिद्रूपानें प्रत्यगात्मा अंतःकरणाचे ठिकाणीं व पंचमहाभूतांचे ठिकाणीं व सूर्याचे, वेदांचे इत्यादि ठिकाणीं राहून त्यांचा नियामक झालेला आहे, हें ज्यास अनुभवपूर्वक समजलें तो माझा आत्माच होय. )

श्रीधरः—कृष्णभक्तैरयत्नेन ब्रह्मज्ञानमवाप्यते ।
इति विज्ञानयोगाख्यं सप्तमे संप्रकीर्तितम् ॥

( श्रीकृष्णभक्तांस लीलेनें ब्रम्हज्ञान मिळतें हा विज्ञानाख्य योग होय. )

**रामानुज**-सर्वांनीं नित्यनैमित्तिक अनुष्ठान केलेंच पाहिजे! सर्वांनीं हा शब्द नसता तर ठीक होतें.

**पंडित**--सगुण मोक्षपर अर्थ लावितात. अद्वैत मत असूनही श्रीवत्सांकास भजणें हा वामनांचा पंथ आहे.

**मधुसूदन, रंगनाथ**—या अध्यायांत उत्तमांनीं जाणावें, मध्यमांनीं ध्यान करावें असें सगुण व निर्गुण ब्रह्माचें निरूपण आहे. शब्दार्थानें सगुणब्रह्म व लक्षणार्थानें निर्गुणब्रह्म सांगितलें आहे ॥३०॥

येणेंप्रमाणें सातवा अध्याय संपला. आतां त्याचें रहस्य सांगून या अध्यायासंबंधानेंच थोडें सिंहावलोकन करावें आणि पुढें पुढील मार्गक्रमणास आरंभ करावा असा संकल्प करून रहस्य कथनाच्या मार्गाला लागतो.

# अध्याय सातवा.

## उपसंहार.

पहिल्या सहा अध्यायांत 'त्वं' पदार्थाचा शोध–म्हणजे जीव वस्तुतः कोण आहे याचा शोध–केला आणि जीवानें आपलें स्वस्वरूप समजून घेण्याचे क्रमशः कित्येक मार्गही अधिकारानुसार सांगितले; शिवाय सहाव्या अध्यायाच्या शेवटीं, 'माझा आश्रय करून जो श्रद्धापूर्वक योगाभ्यास करील तो मला अत्यंत प्रिय, तोच योगीश्रेष्ठ होय.' असें ही सांगितलें. तेव्हां साहजिकच 'मी' म्हणणाऱ्या परमेश्वराचें, परमात्म्याचें, ब्रह्माचें, स्वरूप कसें आहे, परब्रह्म म्हणजे काय आणि परब्रह्माचें प्रकटस्वरूप जो परमेश्वर त्याची 'भक्ति कशी करावयाची' इत्यादि प्रश्न उत्पन्न होतात. या प्रश्नांस सांप्रतच्या द्वितीय षट्कांत उत्तरें दिलीं आहेत.

२ अधिकाराप्रमाणें जीवाचें स्वरूप जसें भिन्न असतेंसें भासतें म्हणजे 'मीच देह, मीच प्राण, मीच मन, मीच बुद्धि किंवा विज्ञान, आणि मीच आनंद' अशीं स्वतःचीं निरनिराळीं स्वरूपें आहेत, असें जीवांस वाटत असतें, एकच ब्रह्ममय स्वरूप असतांही अज्ञानजन्यभेदबुद्धीनें 'आपण म्हणजे देहच' असें कोणी समजतो, 'आपण म्हणजे प्राणच' असें दुसरा समजतो, तसेंच कोणीं 'आपण मन, विज्ञान, किंवा आनंद आहों' असें समजतो; एवंच जसा अधिकार असेल, तसें आपलें स्वरूप आहे असा ज्याप्रमाणें आपण स्वस्वरूपावर अध्यास करित असतो, तसाच अध्यास परमेश्वरी स्वरूपावरही होत असतो. ब्रह्माचें स्वस्वरूप एकच आहे, ज्ञानी पुरुषास एकच दिसतें आणि मोक्षोन्मुख झालेल्या जीवाला त्या एकरस स्वरूपामध्येंच आनंद होऊन तो त्या आनंदामध्यें लीन होऊन तत्स्वरूपीं होणार असतो हें सर्व खरें आहे. पण प्रत्येक जीवाला हा मोठा अधिकार प्राप्त झालेला नसतो. जितका त्याचा अधिकार लहान मोठा असेल तितक्या प्रमाणानें त्या

जीवाची ईश्वरविषयक कल्पना लहान किंवा मोठी असते हें सहजच आहे. सूक्ष्मत्त्वदर्शक किंवा महत्त्वदर्शक कांच डोळयास लाविली असतां एकच पदार्थ जसा लहान किंवा मोठा दिसतो तसा प्रकार आपल्या विचारशक्तीचा आहे. श्रीकृष्णाचें एकच स्वरूप कंसास, चाणूरास, कुब्जेस व अक्रूरास निरनिराळें दिसलें हें प्रसिद्धच आहे. एवंच ज्याप्रमाणें आपलें मन शुद्ध किंवा मलीन असेल त्याप्रमाणें आपली ईश्वरविषयक कल्पना उदार किंवा संकुचित असेल, व असली पाहिजे. हा सयुक्तिक विचार न कळल्यामुळें मुसलमानी धर्माचे व ख्रिस्ती धर्माचे अनुयायी इतर धर्मांचा उपहास, किंवा छल करित असतात. अधिकारपरत्वें ईश्वरस्वरूप त्या त्या व्यक्तीस भिन्नत्वानें दिसतें हें तत्त्व या वरील ईशोपासकांस न समजल्यामुळें त्यांच्या हातून पूर्वकाळीं अत्याचार घडले व सद्यःकालींही घडतात. पण अधिकारपरत्वें उपदेश करावा हें तत्त्व आमच्या पूर्वकालीन धर्मसंस्थापकांस उत्तम कळलें असल्यामुळेंच सकाम पितृपूजेपासून तो निष्काम ब्रह्मोपासनेपर्यंत उपास्य दैवतें अस्तित्वांत आणून क्रमाक्रमानें मनाचा उद्धार करण्याचें साधन व त्याची सामग्री त्यांनीं निर्माण केली आहे; आणि म्हणूनच त्याला सनातनत्त्व प्राप्त झालें आहे आणि सर्वकालीं, सर्वस्थलीं व सर्वप्रसंगीं उपयोगी पडणारा धर्म त्यांच्या करवीं ईश्वरीप्रेरणेनें निघाला असें म्हणण्याचा स्पृहणीय अधिकार आम्हांस प्राप्त झाला आहे. ह्या अधिकाराचा दुरुपयोग न करितां जीवांचें ज्ञान दिवसेंदिवस ज्यास्त वृद्धिंगत होईल म्हणजे जीवांची ईश्वरविषयक कल्पना ज्यास्त उदात्त होत जाईल आणि शेवटीं जीवदृष्टीला अनंतत्त्व प्राप्त होऊन ते ब्रह्मपदाप्रत जातील असा क्रम धरणें व या क्रमाला एकनिष्ठ होऊन त्याच्या सिद्धीसाठीं सफल प्रयत्न करणें हें प्रत्येक धर्मनिष्ठ पुरुषाचें काम आहे.

३ या षट्कांत स्थूलमानानें तीन प्रकारच्या भक्तांचा विचार केला आहे. या तीन वर्गांतील प्रत्येकांत आणखी पोटभेद आहेतच; पण आपण केवळ तीन वर्गांचाच मात्र विचार करूं. ( १ ) पहिल्या वर्गांत योगारूढ ज्ञानी पुरुष येतात. या उत्तमोत्तम वर्गांतील लोकांस परमात्मस्वरूप जसें आहे तसेंच दिसतें व अनुभवास येतें. वेदांतप्रतिपादक ग्रंथ व ग्रंथांत सांगितलेली लक्ष्य वस्तु आपल्या स्वस्वरूपानें या पुरु-

षांस मात्र निःशेषत्वानें समजते. उपनिषदांतील शब्द उच्चारण्याचा मात्र अवकाश कीं यांच्या पूर्वसंस्कृत अंतःकरणांत सद्वस्तूचा पूर्णप्रकाश पडला असें समजावें. हेच खरे महात्मे होत. परब्रह्मावरील यांची अनुरक्ति पराकाष्ठेची भेदशून्य असते. सारांश यांची आत्मिक उन्नति संपूर्णतेस पोहोंचली असल्यामुळें हे परब्रह्माचे एकनिष्ठ भक्त असतात आणि परब्रह्माशीं यांचें नित्य साहचर्य असल्या कारणानें यांच्या वृत्तीस अखंड व एकरसात्मक, तादात्म्य येऊन ते सर्वथा ब्रह्ममय होऊन जातात. यांसच जीवन्मुक्त असें ह्मणावें. या भक्तांची जी 'परा' नामकभक्ति, तिचा विचार **सातव्या** अध्यायांत केला आहे. ( २ ) यांच्या बऱ्याच खालीं असणारा वर्ग ह्मणजे मुमुक्षु भक्तांचा होय. ह्यांच्या वृत्तीमधील राजसता व प्रपंचप्रीति सर्वथा नाहींशा झालेल्या नसतात; ह्यामुळें चित्ताला जें अखंड स्थैर्य यावयाला हवें असतें, सुखदुःखांमध्यें समबुद्धी ठेवण्याचें सामर्थ्य हवें असतें तें या दुसऱ्या वर्गांतील भक्तांस प्राप्त झालेलें नसतें. तथापि चित्ताचें संशोधन करणारे संस्कारांचें बरेंच कार्य झालें असल्यामुळें वेदांतप्रणीत धर्मावर व धर्मग्रंथांवर यांचीं निःसीम प्रामाण्यबुद्धि असते व सात्विक गुणांचा पुष्कळसा प्रादुर्भाव झालेला असल्या कारणानें राजस वृत्तीचा व प्रापंचिक प्रीतीचा ओघ परोपकार व सामाजिक कल्याण अथवा लोकसंग्रह करण्याची बळकट प्रेरणा इकडे वळतो. 'परब्रह्मस्वरूप व आत्मस्वरूप हीं दोन्हीं शुद्ध, बुद्ध, नित्य व मुक्त आहेत' हें शास्त्रीयज्ञान त्यांस झालेलें असून त्या ज्ञानावर यांचा दृढ विश्वासही असतो. परंतु यांस अद्यापि साक्षात्कार झालेला नसतो. 'ईश्वरामध्यें आणि माझ्यामध्यें वस्तुतः अभेदच आहे' हें विज्ञान यांस झालेलें नसतें. एवंच या शास्त्रपारंगत सात्विक मुमुक्षूंस साक्षात्कार होण्याची कायती अपेक्षा असते. पहिल्या वर्गांतील भक्तांनीं ती आशा ही समूळ विनष्ट केलेली असते. ह्या भक्तांविषयींचें व तद्गत ब्रह्माचें वर्णन **८ व्या अध्यायांत** आहे. ( ३ ) तिसऱ्या वर्गांतील लोकांच्या वैषयिक इच्छा शांत झाल्या नसल्या कारणानें त्यांचें चित्त समाधिस्थ होत नाहीं. त्यांचें ईशचरणीं प्रेम असते; व त्यांचें हें प्रेम ह्मणजे ईश्वर हा सर्वांतर्यामी आहे असा प्रत्यय होय. जलस्थलादि सर्व स्थावर जंगम पदार्थ आणि सचेतन अथवा जीववंत प्राणी यांमध्यें अवघा

नारायणच भरला आहे असें समजून ते सर्वत्र नारायणाचा शोध करित असतात. ( पहा अ० १० श्लोक ८, ९, १० व ११; ) वासनासंन्यास आणि अहंकारत्याग हीं दोन साधनें त्यांस वश झालेलीं असतात. या प्रतीचे लोकांचा व तद्गत परमेश्वराचा ऊहापोह नऊ पासून बारा अध्यायापर्यंत केला आहे. हे सर्वही निर्वाणमुक्तीचे अधिकारी होतात. जीवेश्वराच्या ऐक्याचा साक्षात्कार झाला कीं पहिले भक्त मुक्त होतात. दुसरे भक्त पहिल्या वर्गांत जाऊन पुढें जीवेश्वराचे ऐक्यास अनुभवी होतात आणि तिसऱ्या वर्गांतील लोक दुसऱ्यांतून पहिल्या वर्गांत जाऊन नंतर साक्षात्कार अनुभवितात. असो; ज्यांस ज्ञानविज्ञान होऊन मुक्तदशा प्राप्त झाली आहे ते परब्रह्मच होत. ते सर्व वर्गांच्यावर, सर्वश्रेष्ठ, सर्वव्यापी, ब्रह्मच होत ( पहा अ० ७ श्लोक १८ ).

४ याप्रमाणें श्रीमद्भगवद्गीतेंत जें परब्रह्मवर्णन आहे त्यावरून उपास्यउपासकांचे स्थूल मानानें जे सामान्य भेद होतात, त्यांचें वर्गीकरण झालें. आतां उपास्यपर ह्मणजे ' तत् ' शब्दलक्ष्य जें ब्रह्म तें कोणतें याचा पहिल्या वर्गांतील लोकांच्या दृष्टीनें विचार करायाचा. सातव्या अध्यायाचे पहिले तीन श्लोक प्रस्तावनापर आहेत. ब्रह्माचें ज्ञान होणें व साक्षात्कार होणें यागोष्टी प्रायः अशक्यच आहेत. परब्रह्माचें ज्ञान क्वचित् एखाद्यासच होतें. हें ज्ञान दुर्मिळ आहे म्हणून व मानवी शक्तीकडून शोधून निघून निघणें अतिकठिण आहे म्हणूनच परमेश्वरमुखानें ही ज्ञानामृतवृष्टि या भूलोकांवर झाली आहे. श्रीष्ण-परमात्मा हें परब्रह्माचें प्रकटस्वरूप होय. या ईश्वरावतारी महापुरुषानें गीताशास्त्राचा अवतार केला आहे व श्रीमद्व्यासांवर परमेश्वरी अनुग्रह म्हणून तन्मुखानें हें अखंड सत्यशास्त्र जगांत प्रकट झालें आहे म्हणूनच या शास्त्राला अबाधित्व येऊन तें सर्ववंद्य झालें आहे. या शास्त्राचें पठन, मनन व अनुध्यान नित्य होऊन तदाकारवृत्ति झाली, तेथील ज्ञानविज्ञान समग्र व निःसंशय समजून उमजलें म्हणजे जाणावयाचें असें कांहीं एक राहत नाहीं. असो; श्रोतृवृंदास अभिमुख करणारा, श्रोत्यांचें लक्ष्य याप्रमाणें सर्वस्वी आकर्षण करणारा, असा हा प्रस्ताव झाल्यानंतर भगवान प्रथमतः

**अपरा व परा प्रकृतींचें स्वरूप**

वर्णितात. परा आणि अपरा असे प्रकृतीचे दोन भाग होतात. पराप्रकृति म्हणजे ज्ञातृत्वशक्ति आणि अपरा प्रकृति म्हणजे विषय होय. विषय आणि विषयज्ञता, अथवा परा आणि अपरा प्रकृति, मिळून ईश्वराचें ऐश्वर्य होतें. गेल्या शतकांत **हेगेल** म्हणून जो महातत्ववेत्ता यूरोपखंडांत होऊन गेला त्यानें असें प्रतिपादिलें कीं 'ज्ञाता व ज्ञेय' यांच्या पलीकडे असणारें, परंतु दोहोंचाही अंतर्भाव करणारें जें एक तत्व आहे तेंच सत्य होय. हें सत्य म्हणजेच आमचें परब्रह्म आहे हें आमच्या लोकांस कित्येक शतकें अगोदर समजून चुकलें होतें. असो; तेंव्हां पृथ्वी नामक अत्यंत स्थूल पदार्थापासून तों थेट अहंकार नामक 'मूळ प्रकृत्ति, अव्यक्त' या अत्यंत सूक्ष्मापर्यंत जे जे म्हणून ज्ञेय पदार्थ आहेत त्यांचा अंतर्भाव '**अपरा**' प्रकृतींत होतो. ही प्रकृति स्वभावतः **जड** आहे, समजण्याचा **विषय** आहे म्हणून हिला 'अपरा' (गौण प्रतीची) असें नांव मिळालें. या शब्दांत सर्व दृश्यादृश्य ज्ञेय वस्तूंचा समावेश होतो हें आतांच सांगितलें आहे. आतां समजण्याची शक्ति असणारें 'जीव' नामक जें तत्त्व आहे त्याला **परा प्रकृति** असें म्हणावयाचें. हा जीव, हा प्राण, ही चेतनाशक्ति, आहे म्हणूनच जगाचें अस्तित्व कायम राहत आहे. जेथें म्हणून समजण्याचें सामर्थ्य आहे, तेथें 'परा' नामक प्रकृति प्रकट झाली आहे असें समजावें. तात्पर्य हें आहे कीं समजण्याच्या सर्व वस्तु आणि चलनवलनास प्रारंभ करून समजण्याचें पर्यवसान होईपर्यंतची व पुढें, जीवदशा येईपर्यंतची ज्ञातृत्वशक्ती या दोन मिळून हें विश्व निर्माण झालें आहे. सारांश कोणताही प्राणी किंवा कोणताही पदार्थ आपण घेतला असतां तेथें आपल्यास जडचैतन्याचें मिश्रण कमी अधिक प्रमाणानें सांपडेल. नुसतें चैतन्य किंवा केवळ जडवस्तु आपल्या अनुभवास येणें शक्यच नाहीं. दगडांतील चैतन्य लुप्तपणानें वास करितें पण बाह्य शक्तीच्या योगानें तें प्रकट स्थितींतही येतें. विराट स्वरूपालाही देह, जडसंयोग, आहेच! एवंच हें विश्व चराचरात्मक, जडचैतन्यात्मक आहे.

आणि या विश्वाच्या अंतर्यामीं राहून विश्वाचें नियमन करणारा, सर्वव्यापी, शुद्ध, निर्विषय असा जो परमात्मा तो विश्व होऊन आपणच त्याचा

स्वामी झाला आहे.—( जीवशिवांचें ऐक्य पूर्णपणें उमजल्यानंतर विश्व आणि स्वामित्व यांचा लय होऊन एक ब्रह्म मात्र उरतें, दुसरें कांहीं नाहीं ही स्थिति याच अध्यायांतील १८ व्या श्लोकांत वर्णिलेल्या ज्ञानी पुरुषांची आहे. ही गोष्ट निराळी. हिचा विचार आपल्यास सध्यां कर्तव्य नाहीं. )—असो; ज्ञातृत्व व विषय यांचा स्वामी होऊन त्यांचें नियमन करणारा, प्राण्यांच्या व विश्वांच्या कर्मानुसार त्यांची उत्पत्ति, त्यांची स्थिति व त्यांचा लय करणारा जो परमात्मा तो सर्वश्रेष्ठच आहे. त्याच्या पलीकडे कांहीं श्रेष्ठतर असणें शक्यच नाहीं. अखंड व निर्विकार, सर्वद्रष्टृ व सर्वनियामक असें ' एकच ' सिद्ध झाल्यावर त्याच्या पलीकडे दुसरें आणखी एक ' एक ' असेल अशी कल्पना करणें म्हणजे साखरेची साल काढणाऱ्या न्यायाचें अवलंबन करणें होय. असो; तेव्हां हा जो सर्वनियामक, सर्वांतर्भावी, परमात्मा आहे त्याच्या आधारावर, त्याच्या सत्तेनें, ही विश्वमाला अबाधितपणें चाललेली आहे. सांख्यांच्या तात्विक शोधाचा ओघ ' परा आणि अपरा ' प्रकृतीपर्यंत येऊन थांबला. एकरसात्मक समुद्रास जाऊन मिळेपर्यंत नदीचा ओघ ज्याप्रमाणें थांबू शकत नाहीं, त्याचप्रमाणें, ' परा आणि अपरा ' नामक दोन परस्पर विरुद्ध तत्वांस ज्याच्या योगानें **अस्तित्व** आलें, ज्याच्या योगानें उभयतांचा संबंध होतो व ज्याच्या योगानें परस्परविरोध **नष्ट** होऊन एकवाक्यता सिद्ध होतें, असें कांहींतरी तत्व घेतल्याशिवाय विचाराचा ओघ थांबणार नाहीं. हें ( एकं एव अद्वितीयं ) तत्व वैदिक मतांत आहे म्हणून सांख्यमताहून वैदिक सिद्धांताला सर्वमान्यत्व आलें आहे. परब्रह्मांत ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय हे संबंध व श्रेष्ठता, कनिष्ठता हें तारतम्य संपतें. सारांश काळ, स्थळ, प्रसंग इत्यादि उपाधि संपतात. आणि शुद्ध चैतन्य मात्र अवशिष्ट राहतें. असो. पदार्थाला **अस्तित्व, भातित्व व प्रियत्व** जें प्राप्त होतें तें सच्चिदानंदघन जो परमात्मा त्यापासूनच होय. पदार्थाचें **नाम** आणि त्याचें **रूप** हीं दोन मात्र भेदस्थितींत उत्पन्न होतात; कारण नाम व रूप हीं अबाधित नाहींत. एवंच नामरूप नित्य नव्हे. हा विवेक सांख्यांनीं केला नाहीं म्हणून त्यांचें मत तात्त्विक दृष्टीला अग्राह्य झालें. याप्रमाणें परा व अपरा प्रकृतींचें उपांगत्व व ब्रह्माचें श्रेष्ठत्व स्थापित झालें. आतां परमात्म्यामध्यें सर्व

'सर्वविश्व कसें गोविलें आहे' व परमेश्वराव्यतिरिक्त पदार्थच नाहीं, त्यांचा विस्तार ८ तें १२ श्लोकांमध्यें करितात. ( मॉलिन्यांचीचें तत्व-विचार पहा. )

९ आठ ते बारा या श्लोकावलींत काय सांगितलें आहे बरें? येथें हें सांगितलें आहे कीं पृथ्वीत्यादि जीं पंचमहाभूतें आहेत त्यांस भूतत्व देणारा, त्यांचें अस्तित्व स्थापन करणारा जो गुण आहे तो परब्रह्म-स्वरूपीं आहे. जलाचें रसत्व, पृथ्वीचें गंधत्व, इत्यादि गुण ह्मणजे हीं एकाच परमेश्वराचीं उपाध्यनुसार निरनिराळीं स्वरूपें भासमान होत आहेत. ह्याचप्रमाणें जीवदशेंत बुद्धिपूर्वक आणि सहेतुक कार्यें होत असतात त्या त्या कार्यांचें रहस्यही परमेश्वरी स्वरूपच होय. देवांचें तेज आणि वेदांतील प्रणव हीं महेश्वरी रूपें होत. सर्व भूतमात्राचें चिरंतन बीज, बुद्धिवंतांची बुद्धि, तेजस्वी लोकांचे ओज, धार्मिक बळवंताचें वीर्य, सात्विक काम, सात्विक प्रेम, व सात्विक अनुकंपा इत्यादि उद्धारक गुण परमेश्वरी आहेत. फार तर काय पण सात्विक, राजस व तामस इत्यादि गुण हे परमेश्वरकृत असून प्राणिमात्राच्या कर्मानुसार त्या त्या जीवास प्राप्त होणारे आहेत. परमेश्वरामध्यें मात्र हे गुण नाहींत. हेंच सांख्य मताचें निराकारण होय. हें सर्व वाचून गेल्यावर गीतावाच-कांच्या अनेक शंका नाहींशा होतील असें वाटतें. "ईश्वरानें 'कांहीं नाहीं' पासून जगत् उत्पन्न केलें" असें कांहीं धर्मांत सांगितलें आहे. 'कांहीं नाहीं' पासून, अभावापासून, जगत् उत्पन्न करणें हें अयुक्त, अचिंतनीय आणि असमंजस आहे; असा अनुभव जीवास कधींही येत नाहीं म्हणून प्रत्यक्ष सर्वशक्ति परमेश्वरासही तसें करणें त्या जीवाच्या मतें अश-क्यच होय! (पहा श्लोक १६ अध्याय २). जीव आणि जीवन, पुरुष आणि प्रकृति हीं ईश्वराचींच दोन अंगें असून हीं परस्पर विद्वेषी अशीं बालकें परमात्म्याचीं भिन्न, आभासिक व परस्परावलंबी स्वरूपें आहेत. आपण प्राकृत लोक आहोंत; तेव्हां आपल्यास समजेल अशा भाषेंत बोलावयाचें असल्यास हें विश्व प्रकृतीचा **परिणाम** आहे, प्रकृति पर-मेश्वराचें एक अव्यक्त अंग आहे आणि या अव्यक्त प्रकृतीपासून ह्या व्यक्त विश्वाचा उद्भव झाला आहे व परमेश्वर या विश्वाचा निया-मक आहे असें ह्मणावें. ज्यांस **तत्त्वज्ञान** प्राप्त झालें आहे त्यांनीं ह्या

आभासिक विश्वाकडे पाहिल्यास विचारदृष्टीनें त्यांस हें विश्व **विवर्त** आहे, भासमात्र आहे असें दिसेल; आणि तात्त्विक अनुभवाचें खरें तत्त्व पाहूं गेल्यास त्यांना ब्रह्माव्यतिरिक्त कांहींच दिसणार नाहीं. येथें ' पाहूं गेल्यास ' व ' दिसणार नाहीं ' हे शब्द सुद्धां कष्टानेंच वापरावयाचे! कारण ' सर्व ब्रह्ममय झाल्यावर पाहणें कसचें ? आणि पाहणारा तरी कोण ? ' असा वास्तविक प्रसंग येतो! असो; तेव्हां प्राकृत भाषेनुसार व प्राकृत कल्पनेनुसार विश्वाचें उपादान कारण परमेश्वरच आहे असें ठरतें. आणि श्रीकृष्ण परमात्म्यानें हेंच तत्त्व ८–१२ श्लोकांमध्यें ज्ञानविज्ञानी लोकांस ब्रह्मानुभवाचा दृढ परिचय व्हावा म्हणून कथिलें आहे. सामान्य लोकांस

## हें तत्त्व कां समजत नाहीं ?

६ परमेश्वराकडून मिळालेलें किंवा जडापासून चैतन्याकडे उत्क्रांति होत असतां परमेश्वरी अनुग्रहानें संपादित झालेलें जें इच्छास्वातंत्र्य त्याचा दुरुपयोग केलेला असतो म्हणून सर्वत्र ब्रह्म पसरलें आहे, तें अज आहे, अक्षर ( अविनाशी व अविकार्य ) आहे, हें समजत नाहीं, समजलें तरी आचरणांत उमटत नाहीं. अधिकारमदानें उन्मत्त झाल्यामुळें प्राप्त झालेल्या इच्छास्वातंत्र्याचा दुरुपयोग करावयाचा, पूर्ण, अनंत, शुद्ध, निर्विकार्य, असें जें आपलें मूळस्वरूप अगर जो मुख्य पुरुषार्थ, तो साध्य होईल अशा साधनाचें संपादन करण्याकडे या आपल्या इच्छा-स्वातंत्र्याचा उपयोग करावयाचा हा देवमान्य मार्ग सोडून देऊन किंवा याचा शोध न करितां प्राणी ज्या वेळीं अपूर्ण, सांत, विकारपूर्ण व मळीण अशा भासमान विषयाचा आश्रय करितो, प्राप्त झालेल्या अधि-कारानें आपल्या योग्यतेहून नीचतर अशा पुरुषार्थापाठीमागें लागतो त्या वेळीं तो अशुद्ध सात्विक, राजस अगर तामस यांपैकीं एकाच्या किंवा या तीनही गुणांच्या स्वाधीन होऊन मूढ होतो. विवेकशून्य झाल्यामुळें त्यास ज्ञानाभत्व येतें आणि मग अर्थातच परमात्म्यासारखें तेजःपुंज, अपरोक्ष असणारें सर्वव्यापी तत्त्वही त्यास समजेनासें होतें !

केवळ जडापासून शुद्धचैतन्याकडे जाण्याचा विश्वाच्या उत्क्रांतीचा क्रम आहे असें अलीकडील तत्त्वज्ञानावरून दिसतें. या उत्क्रांतिवा-दाचा वेदांतसिद्धांताशीं मुळींच विरोध येत नाहीं. केवळ तामसी

स्थितींतून जर आपण शुद्धसात्विक किंबहुना, त्याच्याही पलीकडच्या आत्मिक स्थितीकडे समाजतः चाललों आहों, तर पूर्ण तामस गुणाच्या राक्षसी तावडींतून सुटून आपण शुद्धसात्विक व आत्मिक स्थितींच्या सौम्य स्वराज्याकडे जात आहों असें स्पष्ट होईल. पण मध्यंतरी तामस व राजस आणि तामसमिश्रित सात्विक व राजसमिश्रित सात्विक गुणांच्या आधिन आपण असतों असें ठरतें. आतां शुद्ध तामस स्थितींत ज्ञानच नाहीं; राजस स्थितीमध्यें ' आपण ' या शब्दाचा फारच संकोच असतो आणि शुद्धसात्विक स्थितींत ' आपण ' हा शब्द सर्वव्यापी होतो. एवंच परमात्म्याचें शुद्ध निर्विकार्य, सर्वव्यापी, एकरसात्मक स्वरूप पाहणें असल्यास आपली ज्ञानवृत्ति वासनाशून्य व अहंकारविरहित, असली पाहिजे आणि शमदमादि साधनसंपत्ति, दया, क्षमा, औदार्य इत्यादि सद्विकार जागृत होऊन आपलेपणा अभेदवृत्तीचा झाला पाहिजे. हा जेथें नाहीं तेथें भेदमूलक ज्ञान, भेदमूलक मनोवृत्ति आणि भेदमूलक आचरण आहे. अशा लोकांस आकाशाहून जास्त स्थिर, वायूहून शीघ्रगामी, अनंतकोटी सूर्याहून जास्त तेजस्वी, क्षीरसागराच्या अनंतपटीनें मधूर, असलें सर्वव्यापी, शुद्ध, निर्लेप ब्रह्मतत्व कोठून समजणार ? हें समजून घेणें ज्यास इष्ट वाटेल त्यानें देवनिर्मित मायेचा ईशप्रणीत इच्छास्वातंत्र्याच्या योगानें क्रमशः नाश करून प्रत्यक्ष परमेश्वरास शरण गेलें पाहिजे. परमेश्वरास शरण गेलें असतां अलंघ्य असा ' भरला पूर, मायेचा वाहून नेणारा लोंढा ' ओलांडितां येतो व हा ओलांडिला म्हणजे परमेश्वरस्वरूप स्पष्टतर होतें. सारांश, जीवरूपी जें आपलें अविद्येंत पडलेलें प्रतिबिंब आहे, तें सोडून ईशरूपी जें मूळ बिंब तिकडे आपली मनःप्रवृत्ति वळविली तरच दैविक मायेला तरून जातां येईल. परंतु

## दुष्टलोक व अधम नरपशु

७ परमेशाला शरणच जात नाहींत. हे लोक अत्यंत अभिमानी असतात; म्हणजे ऐहिक प्रपंच हेंच आपलें जीवितसर्वस्व आहे; देह, कांता, पुत्र, धन हीं तरी प्रिय वाटतात याचें कारणही तीं आपल्यास सुख ( मग तें दुःखमूलक व दुःखपरिणामी कां असेना ! ) देतात, तेव्हां हींच माझीं आहेत असा ह्या क्षणिकसुखदायक जडवस्तूंचा या जीवांस अभिनिवेश ( अभिमान ) दृढ झाला आहे; आणि ह्यामुळें संकु-

चित दृष्टि होऊन अज्ञान माजलें आहे; अविवेक उत्पन्न झाला आहे; अशी वैषेयिक स्थिति झाल्यामुळें अर्थातच प्राणरक्षक व उपभोगाच्या उपयोगी, क्षणिक वस्तु असतात तेवढ्यानेंच पुरुषार्थ साधेल असें मानणाऱ्या कामक्रोधपूर्ण राक्षसांस ईश्वराकडे जातां येत नाहीं हें स्पष्टच झालें. या संकुचित दृष्टीच्या, अतएव कामक्रोधास वश झालेल्या पुरुषांस कुटुंबाचें खरें कल्याण म्हणजे खरा उद्धार, समाजाचा खरा उद्धार, विश्वाचा खरा उद्धार इत्यादि कामक्रोधादिनाशक अथवा दया, क्षमा, शांति इत्यादि सद्विवेकांचे पोषकवृत्तींचा गंधही नसतो. एवंच ते ' पापी, पापकर्मे, पापात्मे, पापसंभव, ' असे होतात आणि उत्तरोत्तर–खऱ्या पुरुषार्थ सिद्धीच्या प्रयत्नाभावामुळें–जडावस्थेप्रत प्राप्त होतात अथवा नरकस्थितींत जाऊन पडतात! असो; भगवान म्हणतात; हे तामसी वृत्तींचे प्रापंचिक नराधम सोडून दिल्यानंतर बाकी

## चार प्रकारचे भक्त

८ उरतात. हे भक्त परमेश्वराचें चिंतन करितात. परमेश्वराचे भक्त ह्मणजे संकुचित स्वोपभोगाची इच्छा टाकून देऊन प्रापंचिक सुखाचा होम करणारे लोक होत. आतां आर्त म्हणजे दुःखानें पोळलेले व आपलें नुकसान झालेलें आहे, तें भरून काढण्याची इच्छा करणारे लोक होत. हे लोक एक प्रकारचे कामुक भक्त आहेत; म्हणजे आपल्या वैषेयिक इच्छा सात्विक मार्गानें पूर्ण व्हाव्या अशी इच्छा करणारे भक्त आणि म्हणून ईशभजन करणारे हे लोक आहेत. (२) अर्थार्थी म्हणजे सात्विक कामाकडे लावतां येईल अशा साठीं द्रव्यसंचय, विषयसंचय, करावा व तो संचय होण्यासाठीं परमेशभजन करावें अशी यांची वृत्ति आहे. हेही कामुकच भक्त होत. तथापि पूर्वसंचित चांगलें असल्या कारणानें परमेशपूजा करावी असें त्यांस अंतःकरणपूर्वक वाटून ते कोणत्या तरी स्वरूपानें भगवद्भजनास लागतात. (३) जिज्ञासु हाही एक भक्तांचा वर्गच आहे. हे वास्तविक कामुकच खरे; पण यांची इच्छा आपल्यास ब्रह्मानुभव व्हावा, मुक्ति मिळावी अशी असते. वेदांतशास्त्राचे श्रवणमननादिकांनीं विश्वरहस्य यांस कळलेलें असते व शमदमादि साधनषट्काच्या साहाय्यानें चित्तशुद्धि उत्तम झालेली असते. आतां केवळ शास्त्रप्रणीत

सिद्धांतांचा, उपनिषदांतील महावाक्यांचा, साक्षात् अनुभव आपणांस यावा अशी मात्र एक इच्छा यांस असते व या इच्छेच्या तृप्तीसाठीं हे **मुमुक्षु** परमेश्वराचें शुद्ध मनानें, विषयशून्य मनानें चिंतत, भजन, पूजन, करित असतात. वरील दोन्ही वर्गापेक्षां यांचा वर्ग उच्चतर आहे. हे मुक्तीच्या मार्गाला लागलेले असतात. (४) ज्ञानी भक्त हे मात्र सर्वश्रेष्ठ होत. **'अहं ब्रह्माऽस्मि' 'एक मेवाऽद्वितीयम्'** इत्यादि महावाक्यांचा साक्षात् परिचय झाल्याकारणानें, अपरोक्ष अनुभव आल्यामुळें, यांची मोक्षमूलक इच्छा ही भस्म होऊन गेलेली असते. यांची भक्ति अर्थातच पूर्णत्वानें निष्काम असते. हेंच **खरे आत्मनिष्ठ पुरुष होत.** हे भक्त आत्मरति, आत्मक्रीड, आत्मसंतुष्ट, सारांश आत्मनिष्ठ असे भक्त असतात. परमात्मस्वरूपी भगवंतांस हे अत्यंत प्रिय असतात, याचें खरें कारण म्हणजे हे परमात्म्याशीं तादात्म्यवृत्तीनेंच राहतात; प्रत्यक्ष आत्मस्वरूपीच होतात. यांची समाधि सदैव जागृत असते; ह्या भक्तांस उत्तम गति मिळते हें सांगावयास तरी कशाला हवें? हे मुक्तच झाले. जीवन्मुक्त यांसच म्हणावयाचें. सातव्या अध्यायांत जें ब्रह्मस्वरूप सांगितलें आहे, तें यांच्या करितांच आहे. यांची शरीरयात्रा, यांचें आचरण, केवळ **'भवोऽहि लोकाभ्युदयाय तादृशां'** (यांचा अवतार लोकसंग्रहासाठींच असतो) या न्यायाचेंच असतें. भगवान म्हणतातः अशा पूर्णसात्विक व पूर्ण आत्मिक स्थितींमध्यें जन्म प्राप्त व्हावयाला अनेक जन्मांचे पूर्वसुकृताची अपेक्षा आहे. 'सर्वत्र, सर्वकाळीं वासुदेवच भरला आहे' असा अंतःकरणांत सर्वथा रूढ झालेला अपरोक्षानुभव येण्याला अनेक जन्मांतील निष्काम सात्विक आचरणाची तयारी असावी लागते. असो; यावरून **'ब्रह्मज्ञान नोहे लेकुराच्या गोष्टी। तेथें व्हावा पोटीं अनुताप॥'** ही साधुमुकुटमणी तुकोबामहाराजांची उक्ति किती सार्थ आहे, याचा प्रत्यय वाचकांस येण्यासारखा आहे. अशी वैष्णववीरांची मंडळी फारशी असणें कोणत्याही–विशेषतः हल्लींच्या मनूंत तरी--शक्य नाहीं. भगवंतांनीं या अध्यायांतील तिसऱ्या श्लोकांत व एकोणिसाव्या श्लोकांत हेंच सांगितलें आहे. आतां सत्कर्माचा कधीं नाश होत नाहीं (पहा अ० २ श्लोक ४० व अ० ६ श्लोक ४०!) ही त्या सर्वज्ञ व सर्वद्रष्टा

प्रभूची अमोघवाणी अनंत वेळां प्रगल्भपणें प्रकट झाली आहे म्हणून आपण पूर्णश्रद्धेनें प्रापंचिकज्ञान व परमार्थज्ञान करून घेऊन, श्रवण मनन निदिध्यासानें व ईश्वराच्या ऐकांतिकभक्तीनें आत्मसाक्षात्कार होईल असा अभ्यास करून स्वतःच्या उद्धाराचा व अज्ञानीजनांच्या उद्धाराचा प्रयत्न अहर्निश करावा हें योग्य होय. जर 'ब्रह्मच मी आहें' अशी पदवी पटकावयाची आहे, तर त्यासाठीं आपणास प्रयत्नही पुष्कळच केला पाहिजे. असो; ही ज्ञाननिष्ठ ब्रह्मभक्ति हीच अस्सल प्रीतीची शुद्ध भक्ति होय. ही भक्ति सर झाली म्हणजे मोक्षाचा बालेकिल्ला आपल्या ताब्यांतच येतो. असो; बाकीचे जे भक्तीचे प्रकार आहेत ते संकुचित दृष्टीचे असल्यामुळें

## कामुकभक्तीचें पर्यवसान

९. अंतवंत फल देण्यामध्यें होतें. तथापि भगवान म्हणतात. सकामवृत्तीनें अन्य देवतांचें, क्षुद्रदेवतांचें जें नियमपुरःसर आराधन होत असतें तें वस्तुतःच माझेंच आराधन होत असतें म्हणून व प्रत्येक गौण किंवा प्रधान देवता माझ्याच स्वाधीन असतें म्हणून वरील कामुकभक्तांच्या अंतःकरणात वास करीत असलेली श्रद्धा मी दृढ करितों व त्यांचे कामुक मनोरथ मीच पूर्ण करितों. परंतु त्यांस प्राप्त झालेलें फल मात्र चिरकालिक नसतें. क्षुद्र देवतांची कामुक भक्ति केल्यामुळें त्यास फळ मिळतें तें जन्ममरण चुकविणारें नसतें. त्यांस स्वर्गप्राप्ति झाली तरी ती चिरकालिक नसते. 'भाव तसें बळ, व भक्ति तसें फळ' हा न्याय येथेंही लागू पडतो. सारांश ह्या भक्तांची कामुक सत्कृत्यें मर्यादित असल्यामुळें त्यांस स्वर्गसुखाचा भोगही मर्यादित कालपर्यंतच मिळतो. सारांश त्यांस मोक्ष मिळत नाहीं. तथापि हे लोक सत्कृत्यें करणारे असतात, उदार मनाचे असतात म्हणून त्यांस माझा आश्रय परोक्षतः मिळतो व पुढें त्यांनीं आपले इच्छास्वातंत्र्याचा सदुपयोग केल्यास त्यांचें मोक्षमार्गाकडे जाणें सुकर असतें. पराकाष्ठेच्या स्वार्थांतून निघून ते सन्मार्गाला लागलेले असतात. अतएव तेही उदारच होत. एवंच पूर्ण अज्ञानाच्या स्थितींतील विषयोपभोगाची इच्छा जीवांचे हित करणारी असते. इच्छेमुळें कर्म होऊन जसजशी ती सात्विक मार्गाकडे जाऊं लागते तसतसें आत्मस्वरूप प्रकट

होते. पुढें परमेशाचें भजन पूजन सात्विक मार्गानें होऊं लागलें म्हणजे हीच इच्छा नकोशी होते. हा असा इच्छात्याग करण्यास जो मानव तयार होतो तो अर्थातच उदार होय.

असला उत्साहकारक उपदेश इतरत्र आढळणें शक्य आहे काय?

## परमात्म्याचें ज्ञान कां होत नाहीं!

१०. चोवीस श्लोकापासून सत्तावीस श्लोकापर्यंत वरील प्रश्नाचा विचार केला आहे. एकरसात्मक जो परमात्मा आहे, जेथें कोणत्याही प्रकारची भेदवृत्ति नाहीं, केवळ ज्ञानस्वरूपच जेथें आहे, अशा जन्म-शून्य, अविकार्य व सर्व श्रेष्ठ ब्रह्माला सामान्य लोक मूर्त स्वरूपानें, जन्ममरणादि उपाधींसहित व सविकार्यतः ओळखतात; म्हणजे परमेश्वर हा मर्यादित स्वरूपाचा, जन्म पावणारा, मरणारा, सुखदुःखादि विकार पावणारा, एक मोठा प्राणी आहे, असें समजतात; सर्वव्यापी स्वरूपाच्या परमात्म्याला एका ठिकाणीं कोंडून ठेवितात! याचें कारण माया होय. ही अज्ञानापासून, मोहापासून उत्पन्न होते. आपल्या उपभोगासाठीं जास्त विषय असावे ही इच्छा, व त्या उपभोग्य पदार्थांत दुसरा वांटेकरी उत्पन्न झाला, तर त्याविषयीं द्वेष, ही इच्छाद्वेषाची जोडी 'आपण अपूर्ण आहों, व विषयभोगासाठींच आपला जन्म आहे, कर्तव्य करण्यासाठीं, ज्ञान संपादनासाठीं, नाहीं,' असा मोह प्रकट झाला असतां, उत्पन्न होते. हा मोह जन्माबरोबरच जन्मास येतो. पूर्वजन्मार्जित पापपुण्यसंचयानुसार मोहाचें प्रमाण जास्त कमी असतें. हा मोह कमी करणें व आपणच ब्रह्म आहोंत हे ज्ञानविज्ञान करून घेणें हें येथील जन्माचें कर्तव्य आहे. असो; जीवांस खरें ज्ञान होत नाहीं, याचें कारण त्यांचा मोह आहे. मोह हा पूर्वकर्माचा परिणाम आहे. कर्म सात्विक असेल तर मोह कमी असेल; पण हेंच सात्विक कर्म निष्काम होईल तर मोह बिलकुल उत्पन्न व्हावयाचा नाहीं. मोहशून्य लोक मात्र श्रेष्ठ भक्तीचे असतात. श्रीकृष्ण परमात्म्यानें या अध्यायांत जें ब्रह्मस्वरूप प्रकट केलें आहे, ते या थोर विभूतीसाठींच आहे. असो; राजस व तामस गुणांच्या कर्मानें मोह उत्पन्न होतो; 'देह मी व विषय माझे' असा अभिमान व वासना उत्पन्न होतात. आणि अहंकारासह वासना प्रबल झाली म्हणजे ज्ञान होत नाहीं.

यामुळें परमात्मचिंतन, परमात्मपूजा इत्यादिकडे चित्ताचें वळण न जातां मायेचें, क्षणभंगुर व कालभंगुर विषयांचें, भजनपूजन होतें; सारांश जन्ममरणाचा ताबा चुकत नाहीं. आतां एका शंकेचें निराकरण करून हा अज्ञानाचा प्रस्ताव आटपूं.

## ब्रह्माला झांकणारी माया ब्रह्मापेक्षां मोठी आहे काय?

११ ही शंका सर्वकाळ येत असते. "अज्ञान नसते तर सर्व प्राणी संसार-मुक्त होऊन सर्वत्र एकच परब्रह्मस्थिति असती; परंतु अज्ञान जोरदार आहे म्हणून ब्रह्माचें सामर्थ्य लुप्त होतें." अशा अर्थाचे अनेक प्रश्न अनेक वेळीं उत्पन्न होतात. याला मुख्य उत्तर हें आहे कीं ही माया आपणच, जीवांनीं, उत्पन्न केलेली आहे; परमेश्वराकडून जें इच्छास्वातंत्र्य आपल्यास मिळालें आहे व केवळ जडावस्थेंतून शुद्ध चैतन्यावस्थेकडे जीवदृष्टीनें मार्गक्रमण करित असतां या इच्छास्वातंत्र्याचा जो आपण दुष्ट उपयोग करितो, त्या इच्छास्वातंत्र्यापासून व त्या दुष्ट उपयोगापासून मायेचा उद्भव होतो म्हणजे मुक्त होण्यासाठीं जें स्वातंत्र्य आपल्या जडावस्थेंत आपल्यास मिळालें त्याचा दुरुपयोग करून आपण असलेल्या नीच अवस्थेंतच आपल्यास ठेवणारीं कर्में किंवा खालीं ढकलणारीं कर्में जेव्हां करितों, करण्याचें संकल्पितों, तेव्हां मायेचें आवरण आपल्या भोंवतीं जमतें. आपल्यास उच्चतर अवस्थेस नेणारीं कर्में आपण बुद्धिपूर्वक व अधिकारानुसार करूं लागलों व ज्ञान संपादन केलें म्हणजे मायेचें आवरण पातळ पातळ होत जाऊन तें पारदर्शक होतें व शेवटीं नष्टही होतें; आणि सर्वत्र प्रकाश पडून ब्रह्मस्थितीचा अनुभव येतो. सारांश इच्छास्वातंत्र्याच्या दुरुपयोगानें मायेचा उद्भव होतो. आतां जडावस्थाच केव्हां व कशी उत्पन्न होते हा प्रश्न मोठा आहे; पण याचा विचार येथें करणें इष्ट नाहीं. वस्तुस्थिति मात्र अशी आहे कीं जडावस्थेंतून प्राणी चैतन्यावस्थेंत प्राणीदृष्टीनें जात आहेत. हे मार्गक्रमण चाललें असतां उच्चतर स्थितीकडे बुद्धिपूर्वक प्रगति झाली म्हणजे जीवाची योग्यता वाढते व मायेचें आवरण कमी होतें. उच्चतर स्थितीकडे जात असतां मध्येंच थांबण्याची स्फूर्ति झाली कीं मायेच्या लोंढयांत आपण सांपडलों व खालीं जाऊं लागलों, असें समजावें. यावरून हें स्पष्ट आहे कीं ब्रह्माला माया आवरिते, झांकून टाकिते, याचा अर्थ आपण

स्वतः आंधळे असतों, हा होय. ब्रह्मापेक्षां माया श्रेष्ठशक्तीची नाहीं, तर जीवापेक्षां तिची शक्ति मोठी आहे हा अर्थ होय. आतां जीवांमध्यें असें आणखी एक सामर्थ्य आहे कीं ज्याच्या योगानें मायेचा पडदा नाहींसा होऊं शकतो. बोलून चालून ही जीवाच्या अज्ञानानें उत्पन्न झालेली! आणि म्हणूनच तें अज्ञान नष्ट झाल्याबरोबर मायाही नष्ट होते. आतां ही माया बाल्यावस्थेंत जीवाच्या अत्यंत उपयोगी पडते. जीवास जडावस्थेंतून राजसी अवस्थेमध्यें नेण्याला हीच कारण आहे. तेव्हां अज्ञानजन्य परंतु कांहीं कालपर्यंत उपयोगी पडणारी ही माया ब्रह्मज्ञान होण्यासाठींच निर्माण झाली आहे! ब्रह्मसत्तेनें, ज्ञानसत्तेनेंच, हिला अस्तित्व येतें; पण माया म्हणजे कांय असा शोध करूं लागलें तर तिचें स्वरूप समजत नाहीं! 'ब्रह्म सर्वव्यापी आहे' असें ज्ञान होईपर्यंत ही जिवंत राहते. सर्वत्र ब्रह्मदृष्टि झाली म्हणजे आपोआप नष्ट होते. बीजगणितांतील उदाहरण सोडवितांना जसा 'क्ष' म्हणून एक अज्ञात पदार्थ धरून आपण तें उदाहरण सोडवितों, व सुटल्यावर 'क्ष' ला झुगारून देतों, तद्वतच ब्रह्माची समजूत करून घेण्यासाठीं मायेचा अवतार असून तें ब्रह्म समजलें म्हणजे माया समूळ संपते. एवंच माया म्हणजे संकुचित दृष्टि होय. हा संकोच सूक्ष्म होऊन नामशेष झाला, दृष्टि अनंत, अमर्याद झाली कीं, दृष्टिसंकोच, वासना व अहंकार हे सर्व नाहींसे होऊन जीव मुक्त होतो. यावरून मायेची शक्ति किती आहे याचा निश्चय सहजच झाला.

१२ निष्काम कर्माचरणानें चित्त शुद्धि होऊन ज्ञानोदय होऊं लागला कीं ज्ञानस्वरूपी स्वच्छ आरशावरील पापरूपी मळ उडून जातो, जीव स्वरूपाचा विकास होऊन सर्व विकार नष्ट होतात आणि परमात्मस्वरूपाची ओळख, त्याची निःसीम भक्ति, त्याच्याशीं तादात्म्य इत्यादि गोष्टी क्रमाक्रमानें घडून येतात. ज्ञानशुद्धि होऊन इच्छा मेली कीं जन्ममरण संपतें! असो; अशा भक्तांस ( हे दुसऱ्या वर्गांतील भक्त होत ) ब्रह्म, अध्यात्म आणि कर्म हे भिन्न नसून एकच आहेत असा दृढ अभ्यासानें परिचय होतो व त्यांचें ब्रह्मानुसंधान केव्हांही सुटत नाहीं.

याप्रमाणें परब्रह्म हें परा व अपरा प्रकृतीचें अधिष्ठान असून त्यांचें नियामक आहे; त्याच्या सत्तेनें सर्व पदार्थमात्र अस्तित्वांत आले

आहेत असें जाणून सर्वत्र, ब्रह्मरसच भरलेला आहे असें अनुसंधान ठेवावयाचें आणि सदा सर्वदा इच्छाद्वेषशून्य होऊन ब्रह्मध्यानामध्यें निमग्न असावयाचें असा बोध श्रेष्ठ भक्तांस येथें केला व ब्रम्ह हें अज, अव्यय, अनुत्तम, पर, सर्वज्ञ, त्रिकालज्ञ, सर्वाधिष्ठान, सर्वरहस्य, सर्वव्यापी, सर्वनियामक व सर्वबीज आहे असें सविज्ञान ज्ञान सांगितलें. असो; हा ज्ञानविज्ञान नामक ज्ञानी पुरुषांसाठीं सांगितलेला सातव्या अध्यायाचा सारांश आहे. 'सर्वत्र ब्रह्म दृष्टि ठेवणें हें ज्ञानी भक्तांसच साध्य आहे' हें या अध्यायाचें सार आहे.



# अथाष्टमोऽध्यायः ।

ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमित्यादिना भगवताऽर्जुनस्य प्रश्नबीजान्युपदिष्टान्यतस्तत्प्रश्नार्थम्—

शिष्य—या अध्यायांत ब्रह्म, अध्यात्म, कर्म इत्यादि शब्दांचे अर्थ व वस्तूंचें स्वरूप सांगणारना?

गुरु—होय. मागील अध्यायांत जीं प्रश्नबीजें सांगितलीं आहेत त्यांचें स्पष्टीकरण होण्यासाठीं—

अर्जुन उवाच—

किं तद्ब्रह्म किमध्यात्मं
किं कर्म पुरुषोत्तम ॥
अधिभूतं च किं प्रोक्त-
मधिदैवं किमुच्यते ॥१॥
अधियज्ञः कथं कोऽत्र
देहेऽस्मिन्मधुसूदन ॥
प्रयाणकाले च कथं
ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥२॥

अर्जुन ह्मणालाः—

पुरुषोत्तम ( हे पुरुषोत्तमा! ) तत् ब्रह्म किं, अध्यात्मं किं, कर्म किं च, अधिभूतं किं प्रोक्तं, अधिदैवं किं उच्यते ( तें ब्रह्म म्हणजे

काय? अध्यात्म तें काय, कर्म शब्दानें काय समजावें, अधिभूत कशाला म्हणतात आणि अधिदैव तें काय?)

**मधुसूदन** ( मधुराक्षसास मारणाऱ्या भगवंता! ) **अस्मिन् देहे कः कथं अधियज्ञः** ( या देहांमध्यें अधियज्ञ असतो तो कोण व कसा? ) **च** ( आणि ) **नियतात्मभिः प्रयाणकाले कथं ज्ञेयः असि** ( मनःसंयमी पुरुषांनीं मरणाचे वेळीं तुला कसें जाणावें? ).

सारांश हे सर्वज्ञ व सर्वश्रेष्ठ पुरुषोत्तमा ! तें ब्रह्म सोपाधिक आहे, किंवा निरुपाधिक आहे, अध्यात्म म्हणजे इंद्रियें किंवा प्रत्यगात्मा, कर्म म्हणजे विज्ञानरूपी कर्म किंवा यज्ञयागादि कर्म, अधिभूतांत पृथ्वीत्यादि सर्व भूतें कार्यरूपानें ध्यावयाचीं किंवा ज्याच्या सत्तेनें हीं भूतें चालतात तो परमात्मा ध्यावयाचा इत्यादि विषय व विशेषतः समाधिनिष्ठ पुरुषांनीं तुझें कसें ध्यान करावें म्हणजे अंतकालीं तुझें अनुसंधान राहील, हा विषय मला समजला नाहीं, तेव्हां कृपा करून हें सर्व सांगावें. ॥ १, २ ॥

**एषां प्रश्नानां यथाक्रमं निर्णयाय—**

या प्रश्नांचा निर्णय यथाक्रम व्हावा म्हणून—

**श्रीभगवानुवाच—**

**अक्षरं ब्रह्म परमं**
**स्वभावोऽध्यात्ममुच्यते ॥**
**भूतभावोद्भवकरो**
**विसर्गः कर्मसंज्ञितः ॥ ३ ॥**

श्रीभगवान उत्तर देतात—

**ब्रह्म परमं अक्षरं** ( ब्रह्म हें अत्यंत अविनाशि आहे ) **स्वभावः अध्यात्मं उच्यते** ( स्वतःसिद्धत्वाला अध्यात्म म्हणतात ) **भूतभावोद्भवकरः विसर्गः कर्मसंज्ञितः** ( भूतांच्या अस्तित्वाची उत्पत्ति करणारा जो विसर्ग आहे त्यास कर्म म्हणावें )—सारांश ज्याचा

केव्हांही, कोणत्याही प्रकारानें नाश होत नाहीं त्यास ब्रह्म म्हणावें, ज्याचें अस्तित्व स्वतःसिद्ध, स्वयंभू आहे त्यास अध्यात्म म्हणावें; तसेंच ज्याच्या योगानें भूतमात्राची उत्पत्ति सिद्ध होते त्या यज्ञाला ( विसर्गाला ) कर्म म्हणावें.—

**अक्षरं न क्षरतीति पर आत्मा "एतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि" इति श्रुतेः । ओंकारस्य चोमित्येकाक्षरं ब्रह्मेति परेण विशेषणादग्रहणम् । परमिति च निरतिशये ब्रह्मण्यक्षर उपपन्नतरं विशेषणम् । तस्यैव परस्य ब्रह्मणः प्रतिदेहं प्रत्यगात्मभावः स्वभावः । स्वभावोऽध्यात्ममुच्यते, आत्मानं देहमधिकृत्य प्रत्यगात्मतया प्रवृत्तं परमार्थब्रह्मावसानं वस्तु स्वभावोऽध्यात्ममुच्यतेऽध्यात्मशब्देनाभिधीयते । भूतभावोद्भवकरो भूतानां भावो भूतभावस्तस्योद्भवो भूतभावोद्भवस्तं करोतीति भूतभावोद्भवकरो भूतवस्तूत्पत्तिकर इत्यर्थः । विसर्गो विसर्जनं 'देवतोद्देशेन चरुपुरोडाशादेर्द्रव्यस्य परित्यागः स एष विसर्गलक्षणो यज्ञः कर्मसंज्ञितः कर्मशब्दित इत्येतत् । एतस्माद्धि बीजभूताद्वृष्ट्यादिक्रमेण स्थावरजङ्गमानि भूतान्युद्भवन्ति ॥ ३ ॥**

**शिष्य**—भगवन्! अर्जुनास भगवंतांचा आशय समजला असेल; पण मला सर्वत्र अंधेर पडल्यासारखा झाला आहे तेव्हां त्याच्या निरसनार्थ, उजेड पडावा ह्मणून, मी एक एक प्रश्न निरानिराळा घेऊन त्याचें उत्तर समजूं इच्छितों. आतां प्रथम ब्रह्म ह्मणजे काय तें सांगावें.

**गुरु**—ज्याला केव्हांही कसलाही विकार नाहीं, ज्याचा कधींही कोणत्याही रीतीनें विनाश होत नाहीं, जें सर्वव्यापी व नित्य आहे, जें सर्वांपेक्षांही आत्मस्वरूपानें श्रेष्ठ आहे तें अक्षर म्हणजे ब्रह्म होय.

**शिष्य**—असा अर्थ घेण्याला आधार ?

**गुरु**—बृहदारण्यकांत याचा अर्थ ठरविला आहे. पृथ्वी, आप्, आकाश इत्यादि पंचमहाभूतांवर निरंकुशत्वानें नित्य सत्ता चालविणारें याशिवाय दुसरें कांहीं नाहींच म्हणून ब्रह्मास अक्षर अशी संज्ञा प्राप्त होते. तें स्थूल नाहीं, सूक्ष्म नाहीं इत्यादि अनेक प्रकारानें समजून घ्यावें. समजलें? विनाश हा शब्दच त्याला लागत नाहीं व तें सर्वांचें नियामक आहे म्हणून विशेषत्वानें अक्षर हा शब्द ब्रह्मास लावितात.

**शिष्य**--'ओंकाराला' 'ॐ' यालाही अक्षर म्हणण्याची रूढी आहे. शास्त्रापेक्षां रूढीची सत्ता बलवत्तर म्हणून अक्षर शब्दानें ओंकार घेतां यावा.

**गुरु**--नाहीं. कारण 'परम' (श्रेष्ठ) असें विशेषण आहे. श्रेष्ठ अक्षर (अविनाशी तें) ब्रह्मच असलें पाहिजे. ॐकाराला परम हें विशेषण लावीत नाहींत. सारांश ज्याच्यापेक्षां श्रेष्ठतर वस्तुच नाहीं अशा अविनाशी ब्रह्मालाच 'श्रेष्ठ' हें उपपद शोभतें. एवंच ब्रह्म म्हणजे अत्यंत अविनाशी व सर्वव्यापी आणि सर्वनियामक वस्तु होय.

**शिष्य**---बरें; आतां अध्यात्म म्हणजे काय तें सांगावें.

**गुरु**—अध्यात्म म्हणजे स्वभाव, स्वतःसिद्धता, स्वकारणता होय.

**शिष्य**—म्हणजे प्रत्येक पदार्थाला सत्ता देणारें (अस्तित्वांत आणणारें) व त्याचें नियमन करणारें जें तत्त्व आहे तें त्या श्रेष्ठ ब्रह्माचेंच प्रकट स्वरूप आहे; सारांश ज्याचेयोगानें 'हे माझे डोळे, माझे कान' असें आपण म्हणतों व म्हणूनच देह, डोळे, कान, बुद्धि इत्यादि 'मी' नसून तो मी दुसराच कोणी तरी एक, नित्य, स्वयंभू व अविनाशी आहे' असें समजतों, तें अध्यात्म होय. एवंच अध्यात्म म्हणजे वस्तूचें अस्तित्व ठरवून नियामक असणारी जी स्वयंभू सत्ता, जो प्रत्यगात्मा, त्याचें नांव अध्यात्म; असेंचना? यालाच सामान्य लोक जीव म्हणतात.

**गुरु**--शाबास! उत्तम समजलास! प्रत्येक व्यक्तीमध्यें सत्तास्वरूपानें असणारें जें श्रेष्ठ तत्व तें परब्रह्मच असतें. तें स्वतः सिद्ध आहे. त्यालाच अध्यात्म म्हणतात. '**तत्सृष्ट्वा तदेवानुप्रा**-

**विशत्** ’ ( जगत उत्पन्न करून त्या जगामध्यें अध्यात्म रूपानें परब्रह्म शिरतें झालें.) एवंच अध्यात्म म्हणजे स्वकारण असणारी स्वतः-सिद्ध सत्ता होय. प्रत्यगात्मा तो हा. यालाच जीव असें सामान्य लोक म्हणतात. हा मुक्त असतांही अज्ञानानें मी बद्ध आहें, असें समजतों.

**शिष्य**—याप्रमाणें ब्रह्म म्हणजे अविनाशी व सर्वव्यापी असें निरुपाधिक व सर्वनियामक ब्रह्म आणि अध्यात्म म्हणजे सर्वनियामक व सर्वव्यापी ब्रह्म असें मला समजलें. आतां ‘ कर्म ’ तें काय, तें सांगावें.

**गुरु**—कर्म याचा येथें वैदिक अर्थ घ्यावयाचा बरें कां? कर्म म्हणजे विसर्ग, स्वार्थत्याग, देवताप्रीत्यर्थ ‘ चरु ’ ‘ पुरोडाश ’ इत्यादि स्वरूपानें यज्ञयागादिकांमध्यें आपण ज्या आहुति टाकितो त्या; सारांश लोककल्याणासाठीं व पंचमहाभूतांच्या तृप्तीसाठीं आपण ज्या इष्टापूर्ती किंवा यज्ञयागादिक करित असतों व ज्यांच्या योगानें भूतांचें, पदार्थमात्राचें, अस्तित्व स्थापित होतें, उत्पत्ति होते,—एवंच उत्पत्ति, स्थिति व लय हे व्यवहार चालतात,—त्यास कर्म म्हणावें. लोककल्याणकारी व पंचमहाभूतांस तृप्ति देणारीं कर्में जगताचा व्यवहार सुरळीत कसा चालवितात हें तिसऱ्या व चवथ्या अध्यायांत स्पष्ट केलेंच आहे. यज्ञयाग केले म्हणजे पर्जन्यवृष्टि इत्यादि होऊन सर्व स्थावरजंगम पदार्थ अस्तित्वांत येतात हें ‘ **ते वा एते आहुती** ’ या श्रुतीवरून व ‘ **अग्नौ प्रास्ताहुतिः** ’ ह्या स्मृतीवरून तुला विदित झालेंच आहे.

**प्रपाकार, श्रीधर, मधुसूदन**—शातपथी श्रुति देतात; ह्या श्रुतींत ब्रह्माचें अक्षरत्व व विषयविलक्षणत्व हीं सिद्ध केलीं आहेत. ‘अध्यात्म’ = स्वभाव = ब्रह्म; हें स्वतःच जीवरूपानें भोगासाठीं देहामध्यें प्रवेश करितेसें दिसतें; तें हें अध्यात्म = जीव.

**शंकरानंद व पर्वतेः**—‘ **परम** ’ विशेषणानें निष्क्रियत्व, निरवयवत्व, नित्यत्व, निःसंगत्व, निरतिशयत्व, एकरसत्व, सच्चिदानंदघनत्व इत्यादि अनंत गुणांचा समावेश होऊन अक्षर हें पद ब्रह्मासच लागतें, जीवास किंवा इतरांस लागत नाहीं; असें ठरवितात. निरुपाधि-

कता सिद्ध झाली ह्मणजे जीव व ब्रह्म एकच असें पर्वते ह्मणतात तें खरेंच आहे. परब्रह्म, प्रत्यगात्मा आणि सत्कर्म यांचा या श्लोकांत विचार आहे.

**चतरजी**--निर्गुणब्रह्म = परब्रह्म. विश्व, विश्वकर्तृत्व, विश्वनियामकत्व इत्यादि विशिष्ट गुण आहेत तें सगुणब्रह्म = नारायण = Logos. अध्यामा = प्रत्यगात्मा, मायेनें ज्यास जीव म्हणतात पण वस्तुतः जो ब्रह्म असतो. कर्म = वेदोक्त व व्यावहारिक कृत्यें. पुरुषोत्तम = सर्वज्ञ ईश्वर.

**रामानुज**—" समष्टिरूप चैतन्य = जगद्भिन्न ईश्वर = परब्रह्म होय. जगत् आणि ईश्वर भिन्नस्वरूपी आहेत असें मानणें म्हणजे द्वैत आलेंच ! स्वभाव = प्रकृति = अनात्मक वस्तु ( सूक्ष्म व स्थूल भूतें-आणि वासना ) (ह्यांलाच आपण आत्म्याशीं संबंद्ध करितों)-भूतभाव = मनुष्यभाव; ह्याला उत्पन्न करणारा योषित्संबंधि विसर्ग तें कर्म होय." हे सर्व अर्थ संकुचित आहेत. श्रीमद्रामानुजमतें जगत्कर्ता ईश्वर, प्रकृति आणि मनुष्यकर्म अशीं पहिल्या तीन प्रश्नांचीं उत्तरें आहेत.

**द्वैतवादी**—स्वभाव = ईश्वरभिन्न जीव ( हा सर्वदा एक रूपानें असतो. अंतःकरणादि इंद्रियें विकारी आहेत. जीव नाहीं.) विसर्ग = ईश्वरीक्रिया; ब्रह्म = विष्णु ( वेद नव्हे ). ह्या श्लोकांत परमेश्वर ( विष्णु ), जीव आणि परमेश्वरव्यापार अशी पहिल्या तीन प्रश्नांचीं उत्तरें आहेत.

**ज्ञानेश्वरः**---अक्षर व अध्यात्म यांचा आचार्यांसारखाच अर्थ करितात. कर्म = **ऐसा करितेनवीण गोचर । अव्यक्तीं हा आकार । निपजे जो व्यापार । त्या नांव कर्म ॥**

**पंडित**—' अक्षर = ब्रह्म, हा व्यतिरेक; परम अक्षर हा अन्वयबोध. एवंच सर्व ब्रह्म आहे हा अद्वैत बोध ( अध्यात्म = स्वभाव होय ) यानें होतो. कार्यांत कारण दिसणें हा अन्वय बोध आणि कार्य हें कारण नव्हे हा व्यतिरेक्त बोध होय. कर्म = सर्व कर्म ( जीव, काळ व ईश्वर यांचें आभासरूप कर्तृत्व, )

**टॉमसन** = अध्यात्म = जीवेश; अधिभूत=जडेश; अधिदैव = देवेश;

अधियज्ञ = यज्ञेश. 'मी स्वभावतःच चैतन्याचा स्वामी आहे;' सृष्टीची उत्पत्ति, स्थिति, लय, हें कर्म. ॥ ३ ॥

**अधिभूतं क्षरो भावः**
**पुरुषश्चाधिदैवतम् ॥**
**अधियज्ञोऽहमेवात्र**
**देहे देहभृतां वर ॥४॥**

**अधिभूतं क्षरः भावः** ( नाशवंत ज्या वस्तु त्यांस अधिभूत म्हणावें ) **च** ( आणि ) **अधिदैवतं पुरुषः** ( पुरुष = चिच्छक्ति तें अधिदैवत होय. ) **देहभृतां वर** ( देह धारण करणारांमध्यें श्रेष्ठ असणाऱ्या अर्जुना ! विचार सामर्थ्यानें प्रवृत्ति निवृत्तींची मीमांसा सौकर्यानें करण्याचें रहस्य समजणाऱ्या ! ) **अधियज्ञः अत्र देहे अहं एव** ( ह्या देहामध्यें राहणारा जो मी तोच अधियज्ञ आहे ).—नाशवंत तें अधिभूत, चिच्छक्ति तें अधिदैवत आणि देहामध्यें नियामकपणानें असणारा ईश्वर तो अधियज्ञ आहे.—

अधिभूतमिति । अधिभूतं प्राणिजातमधिकृत्य भवतीति, कोऽसौ क्षरः क्षरतीति क्षरो विनाशी भावो यत्किंचिज्जनिमद्वस्त्वित्यर्थः । पुरुषः पूर्णमनेन सर्वमिति पुरि शयनाद्वा पुरुष आदित्यान्तर्गतो हिरण्यगर्भः सर्वप्राणिकरणानामनुग्राहकः सोऽधिदैवतम् । अधियज्ञः सर्वयज्ञाभिमानिनी देवता विष्णवाख्या "यज्ञो वै विष्णुः" इति श्रुतेः । स हि विष्णुरहमेवात्रास्मिन्देहे यो यज्ञस्तस्याहमधियज्ञो यज्ञो हि देहनिर्वर्त्यत्वेन देहसमवायीति देहादिकरणो भवति देहभृतां वर॥४॥

सर्व प्राणिमात्राच्या ठिकाणीं राहतें तें अधिभूत आहे. तें काय तर ऐकः—ज्याला विनाश आहे ( अव्यक्त, माया, प्रकृति, जड इत्यादि ) तें क्षर; आतां जन्मास आलेली प्रत्येक वस्तु क्षरवंत म्हणजे नाश-

वंत असते; तेव्हां त्या प्रत्येक व सर्व वस्तूंमध्यें जें नाशवंत असतें व नाशवंत फल देतें तें अधिभूत होय. सर्व उत्पादित वस्तु म्हणजे अधिभूत होय.

**शिष्य**--तर मग अधिदैवत म्हणजे पुरुष अथवा चैतन्यशक्ति असली पाहिजे. हा पुरुष नऊ दरवाजांचें जें पुर ( देहनगरी ) त्यांत राहत असतो.

**गुरु**—किंवा या पुरुषाच्या योगें सर्वांस पूर्णत्व येतें. हाच हिरण्यगर्भ आहे. सूर्यादि देवतांच्या अंतर्यामीं राहून त्यांचें नियमन हाच करितो; शिवाय प्राणीमात्रांच्या इंद्रियांचा चालकही हाच पुरुष आहे. याला अधिदैवत म्हणावें.

**शिष्य**--गुरुजी! 'यज्ञ हाच विष्णु' असें आपण मला एकदां श्रुतिवाक्य सांगितलें आहे त्यावरून माझा तर्क धांवतो कीं अधियज्ञ म्हणजे यज्ञाभिमानिनी विष्णु नामक श्रेष्ठ देवता असावी. विष्णु म्हणजे सर्व व्यापणारा. तेव्हां अधियज्ञ म्हणजे यज्ञाभिमानी, सर्व व्यापी, विष्णु होय.

**गुरु**—ठीक आहे. अमळ सूक्ष्म विचार केलास म्हणजे तुला कळेल कीं अर्जुनास गीतामृत पाजणारे श्रीभगवान हे विष्णुच होते. ते आपल्या शरीराकडे दाखवून म्हणतातः 'या देहामध्येंच जो यज्ञ आहे त्याचा मी अध्यक्ष आहें.'

**शिष्य**—देहांत यज्ञ कसला ?

**गुरु**—अरे! देहाकडूनच, देहामध्यें अंतर्भूत होणाऱ्या अहंकारापासून स्थूलदेहापर्यंतच्या सर्व इंद्रियांकडूनच, ब्रह्मप्राप्तीसाठीं यज्ञ करावयाचा तो यज्ञ बरें ! टिप्पणिकांमध्यें म्हटलें आहे : '**अध्यात्मादित्रयाभिज्ञः व्यवहारं करोति यः । शारीरं स च यज्ञोऽस्य तं यज्ञं पुरुषं विदुः ॥ इति**' छांदोग्यामध्यें या यज्ञाचें उत्तम वर्णन आहे. नारायण उपनिषदांत व बृहदारण्यकांत हा विषय आहे. या यज्ञाचा देहाशीं अतिनिकट संबंध आहे; सारांश देह हेंच या यज्ञाचें राहण्याचें ठिकाण आहे. एवंच या देहाकडून जो यज्ञ, जो स्वार्थत्याग, होत असतो त्याचें अध्यक्षत्व व कर्तृत्वही भगवंताकडे आहे म्हणून अधियज्ञ

म्हणजे सर्वव्यापी परमेश्वर होय. हें सगुणरूप आहे. याप्रमाणें सहा प्रश्नांचीं उत्तरें झालीं.

**प्रपाकार**—अधियज्ञ = यज्ञप्रवर्तक व यज्ञफलदाता. अध्यात्म हें निर्गुण परब्रह्म आहे आणि अधियज्ञ हें सगुण आहे. '**द्वा- सुपर्णा सयुजा सखाया**' ही जीवात्म्याचें ऐक्यत्व दाखविणारी श्रुति प्रसिद्धच आहे. वर गुरूच्या भाषणांत जे आधार दाखविले आहेत ते प्रपाकारांच्या जोरावरच होत.

**शंकरानंद**--तात्पर्य हें कीं हें सर्वात्मक ब्रह्म मीच आहें असें समजून नित्य उपासना करावी.

**पर्वते**--जीवरूपानें परमेश्वर कर्ता व भोक्ता असतो आणि ईश्वर- रूपानें नियामक असा अंतर्यामी राहणारा असतो. अंतर्यामीचे स्वाधीन नियामकत्व आहे असें जाणून ज्ञात्यानें उपासना करावी.

**द्विवेदी**--हा विचार सांख्यमतानुसार आहे असें म्हणतात.

**चतरजी**—पुरुष = चिच्छक्ति.

**रामानुज**—या श्लोकावरून नित्यनैमित्तिक अनुष्ठानांचे वेळीं क्षरभाव, दैवीभाव व यज्ञभाव याचें अनुसंधान करावें म्हणतात!

**द्वैतवादी**--पुरुष = संकर्षण किंवा ब्रह्मा. देह = सर्व प्राण्यांचे देह ( ईश्वराचा देह नव्हे ) "**अधिभूतं जडं प्रोक्तमध्यात्मं जीव उ- च्यते। हिरण्यगर्भोऽधिदैवं देवः संकर्षणोऽपि वा। ब्रह्म नारा- यणो देवः सर्वदेवेश्वरेश्वरः**" ॥ अर्थ स्पष्ट आहे. '**प्राणिनां देह- गो विष्णुरधियज्ञ इतीरितः ॥**'

**ज्ञानेश्वर**—अधिभूत = पांचभौतिक सृष्टि; अधिदैवत = मायावश जीव. अधिभूत व अधिदैवत हे अज्ञानानें उत्पन्न झाले आहेत; अज्ञान नष्ट झालें म्हणजे सर्व ब्रह्मच उरतें. हें जेथें उरते तेथील यज्ञाचा स्वामी मी आहें ( अधियज्ञ आहे ).

**पंडित**—अधिभूत = जड. अधिदैवत = जीवनकळा. '**अत्र देहे**' = भगवद्भक्तांच्या शरीरामध्यें.

**मधुसूदन व रंगनाथ**–'**हिरण्यगर्भः समवर्तताऽग्रे। भूतस्य जातः**

पतिरेक आसीत्' 'आदिकर्ता स भूतानां ब्रह्मणे समवर्तत ॥'
(सर्व भूतांचा पति हिरण्यगर्भ पहिल्यापासूनच होता.)

डाक्टर लारिंझर म्हणतातः 'कृष्ण हा सर्व मनुष्यांपैकीं अत्युत्तम आहुति (बलि) होता, असा अर्थ करावा. असा अर्थ केला म्हणजे कृष्ण आणि क्राइस्ट एक होतील.' पण अधि म्हणजे श्रेष्ठ असणारा, नियामक असणारा असा अर्थ असल्यामुळें डा० लारिंझरचा अर्थ क्राइस्टभक्तांस ही व्याकरणरीत्या घेतां येणार नाहीं. ॥ ४ ॥

अन्तकालीं ज्ञान कसें होईल त्याचा उपाय सांगतात--

**अन्तकाले च मामेव**
**स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ॥**
**यः प्रयाति स मद्भावं**
**याति नास्त्यत्र संशयः ॥ ५ ॥**

**च** (आणि) **अन्तकाले मां एव स्मरन्** (प्राणांताच्या, देहत्यागाच्या, समयीं माझें, सर्व नियामकाचें, मात्र स्मरण करित असतो) **कलेवरं मुक्त्वा** (देह सोडून) **यः प्रयाति** (जो हा मृत्युलोक सोडून जातो) **सः मद्भावं याति** (तो माझ्याच स्वरूपाला जाऊन मिळतो) **अत्र संशयः न अस्ति** (येथें कोणत्याही प्रकारचा संशय नाहीं).–सारांश माझें, सच्चिदानंद स्वरूपाचें, स्मरण करित करित जो देहत्याग करितो, तो ईश्वरस्वरूपाला, ईश्वरतादात्म्याला जाऊन मिळतो, ईश्वराशीं तादात्म्य पावतो, मुक्त होतो; यांत संशय नाहीं.–

अन्तकाल इति । अन्तकाले च मरणकाले मामेव परमेश्वरं विष्णुं स्मरन्मुक्त्वा परित्यज्य कलेवरं शरीरं यः प्रयाति गच्छति स मद्भावं वैष्णवं तत्त्वं याति नास्ति न विद्यतेऽत्रास्मिन्नर्थे संशयो याति वा न वेति ॥ ५ ॥

आतां पूर्वीचे सर्व प्रश्न अर्जुनास सोपपत्तिक समजले असें पाहून शेवटच्या प्रश्नाचें उत्तर सांगतात :—प्रयाणकाल, मरणसमय, प्राप्त

झाला असतां माझें मात्र ( देह, अंतःकरण, विश्व इत्यादिकांव्यतिरिक्त, अभिमान व वासना व्यतिरिक्त, केवळ सच्चिदानंदघन, निष्क्रिय, निर्विकार, शांत, एकरस, नित्य, शुद्ध, आणि मुक्त अशा परमात्म्याचें मात्र ) स्मरण होऊन, परमात्म्याकडे एकनिष्ठेनें अनुसंधान लावून, जो या मृत्युलोकचा त्याग करितो,–( पुढें सांगितलेल्या अर्चि मार्गानें जातो–) तो मुक्त होतो, परमात्मस्वरूप होतो; यात संशय नाहीं. **'ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति'** ( विज्ञानासहित ब्रह्मज्ञान झालेल्या पुरुषास ब्रह्मत्व प्राप्त होतें ) अशी श्रुति ही आहे व ती श्रुति ' पुरुष मुक्त होतो कीं नाहीं ' या संशयाचा निरास करिते.

**मधुसूदन व रंगनाथ**—**'ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति'** अर्थ स्पष्ट आहे. **' न तस्य प्राणा उत्क्रामन्ति '** (त्याचे प्राण उत्क्रमण करित नाहींत, येथें लोकदृष्टीनें प्राण जातात, असें म्हटलें ). असो; देह सोडतो या शब्दांनीं जड विषयापासून भिन्नता आणि माझ्याकडे येतो या शब्दांनीं भगवदेकरूपता सांगितली. सगुण किंवा निर्गुण कोणतेंही ध्यान असो, हरकत नाहीं.

**शंकरानंद**—' ब्रह्मानुचिंतनाची सदैव अपेक्षा आहे. त्या शिवाय मुक्ति नाहीं'

**पर्वते**--उपासकांपुरतेच हे श्लोक आहेत. येथें शंकरानंद व पर्वते यांचा आभासिक विरोध आहे,

**द्वैतवादी**—' **मद्भाव** = निर्दुःख व निरतिशयानंद देणारी माझी सत्ता. ' देहत्याग आणि परमेश्वरस्मरण एककालीं असावें ह्मणून अंते ( शेवटीं ) हा शब्द उपयोजिला आहे, असें मोठ्या आग्रहानें द्वैतवादी सांगतात.

**ज्ञानेश्वर**—**ऐसें सबाह्य** ( आंत बाहेर ) **ऐक्य संचलें । मीचि होऊनि असतां रचिलें । बाहेरी भूतांचीं** ( पृथ्वी, आप, इ० ) **पांच खवळें** ( कवचें ) । **नेणताचि पडिलीं** ॥ पण.... **प्रतीतीचिये प्रोटचें । पाणी न हालें ॥ ते ऐक्याची आहे ओतली । कीं नित्यतेचिया हृदयीं घातली । जैसी समरससमुद्रीं** ( पूर्णा-

नंदैक्यांत ) धुतली। रुळेचिना ( मळत नाहीं )॥ पै अर्थावीं ( खोल पाण्यांत ) घट बुडाला। तो आंत बाहेरी उदकें भरला। पाठीं दैवगत्या जरी फुटला!। तरी उदक काय फुटे? ॥ नातरी सर्पें कवच सांडिलें। कां उभारेनें ( उष्णतेमुळें ) वस्त्र फेडिलें। तरी सांगपा! काय मोडिलें। अवेवामाजीं ( अवयवामध्यें? ) ॥ ऐक्य दृढ करावयास किती उत्कृष्ट दृष्टांत आहेत हे? ॥ ५ ॥

**न मद्विषय एवायं नियमः किं तर्हि—**

**शिष्य**—हा नियम परमात्मसंबंधानेंच आहे कीं काय?

**गुरु**—नाहीं, एक सर्वसाधारणच नियम सांगतात.

> **यं यं वाऽपि स्मरन्भावं**
> **त्यजत्यन्ते कलेवरम् ॥**
> **तं तमेवैति कौन्तेय**
> **सदा तद्भावभावितः ॥ ६ ॥**

**वा** ( अथवा ) **यं यं आपि भावं अन्ते स्मरन् कलेवरं त्यजति** (अन्तकाळाचे वेळीं, प्रमाणसमयीं, ज्या ज्या भावाचें, ज्या ज्या स्वरूपाचें, स्मरण होत असेल–जे देवतास्वरूप त्याच्या एकनिष्ठ स्मरणांत येत असेल ) **तं तं एव एति कौन्तेय** ( हे अर्जुना! त्या त्या स्वरूपाला मात्र तो देवताभक्त जाऊन मिळतो ). **सदा तद्भावभावितः** (–कारण–सर्वदा त्याला त्याच स्वरूपाचा आश्रय धरण्याची, त्याच स्वरूपाचें स्मरण करण्याची संवय–त्याच्या चिताला–झालेली असते ). --सारांश ज्याचें आपण एकनिष्ठेनें ध्यान करून सर्वस्वी आश्रित होतो, तेंच स्वरूप एकनिष्ठतावशतेनें आपल्या मरणकालीं स्मरणांत येतें व त्याच स्वरूपाला आपण जाऊन मिळतो.

**यं यं वाऽपि यं यं भावं देवताविशेषं स्मरंश्चिन्तयं-स्त्यजति परित्यजत्यन्ते प्राणवियोगकाले कलेवरं तं तमेव**

**स्मृतं भावमेवैति नान्यं कौन्तेय सदा सर्वदा तद्भाव-भावितस्तस्मिन्भावस्तद्भावः स भावितः स्मर्यमाणतयाऽभ्यस्तो येन स तद्भावभावितः सन् ॥ ६ ॥**

अर्जुना! असा सर्वसाधारण नियम आहे कीं प्राणवियोगाच्या-वेळीं ज्याकोणा देवतेचें एकनिष्ट स्मरण जीवांस होतें, त्याच देवतेच्या स्वरूपाला तो भक्त जाऊन मिळतो. कारण उघडच आहे. पहाः रात्रंदिवस ज्या विषयाचा किंवा देवतास्वरूपाचा निदिध्यास लागलेला असतो, ज्या विषयावर अगर देवतेवर श्रद्धा बसून चिंतनाचा दृढ अभ्यास झालेला असतो, तोच विषय, किंवा तीच देवता, यांचें दृढाभ्यासानें अंतकाळीं स्मरण होतें. एवंच जी वासना असते त्या वासनेनुरूप देहत्यागानंतर फल मिळतें. दिवसभर ज्या विषयाचें आपण चिंतन करितों तोच विषय आपण स्वप्नकालीं पहातों हा अनुभव आहेच.–॥६॥

**यस्मादेवमन्त्या भावना देहान्तरप्राप्तौ कारणम्—**

याप्रमाणें नित्यस्मरणाची भावना अंतकालीं सहज प्राप्त होते आणि अंतकाळीची जशी भावना असते, तसा पुढील काळांत देह प्राप्त होत असतो म्हणून—

**तस्मात्सर्वेषु कालेषु**
**मामनुस्मर युध्य च ॥**
**मय्यर्पितमनोबुद्धि-**
**र्मामेवैष्यस्यसंशयः ॥ ७ ॥**

**तस्मात्** (म्हणून) **सर्वेषु कालेषु मां अनुस्मर, च युध्य** (सर्वकाळीं नित्य, प्रत्येकक्षणीं, सुखदुःख असतां, माझें दृढस्मरण कर आणि लढाई कर.) **मयि अर्पितमनोबुद्धिः असंशयः मां एव एष्यसि** (माझ्या ठिकाणीं मन आणि बुद्धि अर्पण केलेला असा जर तूं निःसंशय असशील तर तूं मत्स्वरूपाला पावशील यांत शंका नाहीं). सारांश परमेश्वरस्मरणपूर्वक आपलें कर्तव्य केलें असतां कर्मशून्यता प्राप्त होऊन ज्ञानप्राप्तीनंतर मुक्ति मिळते यांत शंका नाहीं.

**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर यथाशास्त्रं युध्य च युद्धं च स्वधर्मं कुरु मयि वासुदेवेऽर्पिते मनोबुद्धी यस्य तव स त्वं मय्यर्पितमनोबुद्धिः सन्मामेव यथास्मृतमेष्यस्यागमिष्यस्यसंशयो न संशयोऽत्र विद्यते ॥ ७ ॥**

म्हणून सदा सर्वदा माझें आदरपूर्वक दृढ अनुचिंतन करित जा आणि क्षत्रियास योग्य असा जो तुझा स्वधर्म तो कर म्हणजे युद्ध कर. शास्त्रविहित मार्गानें आपल्या धर्माचें आचरण कर.

**शिष्य**—एवंच भगवज्ज्ञान आणि उपासनामूलक कर्म यांचा, ज्ञानकर्मांचा, समुच्चय भगवंतांनीं येथें सांगितला सरतेशेवटीं!

**गुरु**—नाहीं. भगवान म्हणतात कीं मन व बुद्धि मला अर्पण कर, ह्मणजे मनानें व बुद्धीनें संकल्पित व निश्चित होणाऱ्या सर्व कार्यकारणरूपी विषयांचा त्याग करून, सारांश, कर्तव्याचरणानें शुद्ध चित्त झाल्यावर, सर्व एकरसात्मक ब्रह्म आहे असा निश्चय करून निष्काम बुद्धीनें स्वकर्तव्याचरण केलें असतां तें कर्म बद्धक होत नाहीं. एवंच ज्ञानकर्मांचा समुच्चय नाहीं. असो; याप्रमाणें स्वरूपाचें दृढानुसंधान झालें म्हणजे अंतकालींही तें अनुसंधान सहजच कायम राहून तो अंतकालींही सावध असणारा ब्रह्मज्ञ पुरुष भगवत्स्वरूपाला जातो, मुक्त होतो.

**प्रपाकार**—परिसस्पर्शानें लोहास सुवर्णत्व येतें, सूर्यकान्तमणि सूर्यकिरणस्पर्शानें द्रवूं लागतो, विषसंयोगानें सर्व अन्न विषवंत होतें, असा जर वस्तुप्रभाव सिद्ध आहे तर मोक्षद भगवच्चिंतन सर्वदा केल्यास मुक्ति मिळेल हें सांगावयास पाहिजे काय?

**मधुसूदन**—उपासकदृष्टीनें हा श्लोक आहे. ज्ञानविज्ञान झालेला पुरुष मुक्तच असतो. सगुणोपासकाला अंतकालीं भगवत्स्मरण होऊन ते ज्ञान झाल्यावर मुक्त होतात.

**शंकरानंद, चतरजी**—सर्वत्र ब्रह्मभावच समजून कर्तव्यही ब्रह्मदृष्टीनेंच करावें.

**द्विवेदी**—'या व मागील श्लोकांत धर्मासहिष्णुतेचें खंडन केलें आहे. वासनाक्षय हें मोक्षाचें साधन आहे. वासनाक्षय व अभिमानक्षय

झाला म्हणजे ज्ञान होऊन योगाभ्यासानें दृढ चिंतन झाल्यावर साक्षात्कार होतो व मोक्ष मिळतो. हा मार्ग कोणीही कोठेंही अवलंबिला तरी हरकत नाहीं. हा धर्म सर्व जीवांकरितां आहे.' हें उत्तम व्याख्यान सर्वांनीं अवश्य वाचावें.

**रामानुजाचार्य**—चित्तशुद्धि होण्यासाठीं निष्काम बुद्धीनें कर्तव्य करणें अवश्य आहे ही अद्वैत्यांची विचारपद्धति या आचार्यांस संमत नाहीं. प्रसंग सांपडेल तेथें ज्ञान व कर्म यांचें साहचर्य ठरविण्याचा यांचा उद्योग असतो. चित्तशुद्धि झाल्यावर कर्म करण्याची अवश्यकताच आहे असें नाहीं हें तत्व यांस भीतिप्रद वाटतें. कदाचित् कांहीं शाब्दिक अद्वैत्यांचें अशिष्टाचरण व दुष्ट जल्पना या भीतीस कारण असतील. तथापि 'वेदविहित आचरणमार्ग बुडेल' असें यांत वाटत असेल तर ती भीति निरर्थक होय.

**ज्ञानेश्वर**—ऐक्यवृत्ति झाल्यावर....**मग न मरिजे देह गेलीया। मा ( मग ) संग्राम केलीया। काय भय तुज? ॥**

**पंडित**—'सगुणाचें निर्व्याज ( निष्कपट ) आणि अखंड ध्यान निर्गुणात्मकज्ञानाव्यतिरिक्त होत नाहीं' हें ध्यानांत ठेवावें. ॥ ७ ॥

**किंच**—

आणखी—

**अभ्यासयोगयुक्तेन**
**चेतसा नान्यगामिना ॥**
**परमं पुरुषं दिव्यं**
**याति पार्थानुचिन्तयन् ॥ ८ ॥**

**पार्थ** ( अर्जुना! ) **न अन्यगामिना अभ्यासयुक्तेन चेतसा** ( दुसरीकडे कोठेंही न जाणारें, अन्य विषयाचें चिंतन न करणारें, व दृढाभ्यासानें, नित्य अनुचिंतनानें, अभ्यासयोगानें, एकनिष्ठ झालें आहे अंतःकरण अशा अंतःकरणानें ) **अनुचिन्तयन्** ( सदैव ध्यान

करणारा पुरुष ) **परमं दिव्यं पुरुषं याति** ( अत्यंत श्रेष्ठ जो स्वयंप्रकाशमान् परमात्मा त्याप्रत जातो )–सारांश एकनिष्ठचित्तानें योगाभ्यास करून परमात्मचिंतन करणारा पुरुष सर्वश्रेष्ठ व सर्वप्रकाशक अशा परमात्मपदाला जाऊन मिळतो.––

**अभ्यासयोगयुक्तेन मयि चित्तसमर्पणविषयभूत एकस्मिंस्तुल्यप्रत्ययावृत्तिलक्षणो विलक्षणप्रत्ययानन्तरितोऽभ्यासः स चाभ्यासो योगस्तेन युक्तं तत्रैव व्यापृतं योगिनश्चेतस्तेन चेतसा नान्यगामिना नान्यत्र विषयान्तरे गन्तुं शीलमस्येति नान्यगामि तेन नान्यगामिना परमं निरतिशयं पुरुषं दिव्यं दिवि सूर्यमण्डले भवं याति गच्छति हे पार्थ, अनुचिन्तयञ्शास्त्राचार्योपदेशमनुध्यायन्नित्येतत् ॥ ८ ॥**

अभ्यास नामक जो योग आहे––

**शिष्य**––अभ्यासयोग तो काय?

**गुरु**––परमेश्वराचे ठिकाणीं मात्र चित्तसर्वस्व एकाग्रतेनें समर्पण करून सदैव परमेश्वरस्वरूपध्यानाची मात्र एकाकार आवृत्ति जेथें होत आहे, ज्या योगामध्यें परमेश्वरव्यतिरिक्त अन्य विषयाचें भानच नष्ट होऊन राहिलें आहे, सारांश एका परमेश्वराचे सादर, व एकनिष्ठ अनुचिंतनाशिवाय चित्ताला दुसरा विषयच नाहींसा जेथें होतो, तो अभ्यासयोग होय. एकाच विषयाचें भान असतें त्याला अभ्यासयोग म्हणावें. असो; असा एकाच चिंतनविषयाचा, परमेश्वरानुचिंतनाचा, अनुभव घेणारा जो अभ्यासयोगी आहे, त्याचें चित्त सर्वदा परमेश्वरध्यानानें परिपूर्ण झालेलें असतें. अन्य विषयाकडे जाण्याचें त्या चित्ताचें ब्रीदच नसतें, त्या चित्ताला ठाऊकच नसतें. अशी ज्याची चित्तवृत्ति झाली तो योगी वेदांत शास्त्रें, गुरूपदेश इत्यादिकांन्वयें एकनिष्ठ भक्तीनें ध्यान करित राहतो. भगवान सांगतात, अर्जुना! असा एकनिष्ठ अभ्यासयोगी परमश्रेष्ठ जो परमात्मा–

**शिष्य**—महाराज! सूर्यमंडळांत जें अपरंपार तेज ओतप्रोत भरलेलें आहे, ते या परमात्म्याचें एक अरूपसें प्रकट स्वरूप असेल

नाहीं बरें? 'जो आदित्यांत राहून त्याचें नियमन करितो..' अशी श्रुतिच आहे.

**गुरु**—होय. परमात्मतेज अनंतच आहे. असो; अशा पूर्ण, तेजोमूर्ति व सर्वश्रेष्ठ परमात्मस्वरूपाप्रत जाऊन तो पुरुष तादात्म्यवृत्ति पावतो.

**प्पाकार**—स्त्रीपुत्रादि विषयांपासून अंतःकरणाचा प्रत्याहार करणें, अंतःकरण परावृत्त करणें, यास अभ्यास म्हणावें. या अभ्यासानें समाधिनिष्ठ ज्याचें अंतःकरण झालें तो प्रकाशस्वरूपी परमेश्वराप्रत जातो.

**श्रीधर**—अभ्यास हें अंतरंग साधन आहे.

**शंकरानंद**—वैराग्ययुक्त अभ्यासयोगानें निर्विकल्प समाधि लागते.

**चतरजी**—विक्षेपशून्य व आवरणरहित जें परमेश्वराचें एकाग्र अनुचिंतन त्यास अभ्यास म्हणावें.

**पर्वते**—उपास्य वस्तूचे ठिकाणीं चित्तस्थिरता करण्याचा प्रयत्न तो अभ्यास.

**रामानुज**—' अभ्यास = नित्यनैमित्तिकांशीं अविरुद्ध असणाऱ्या कालांत होणारें अनुचिंतन. ' हा ऐश्वर्यार्थी उपासकांचा प्रकार आहे असें म्हणतात !

**द्वैतवादी**—दिव्य = लीला करणारा. 'पुरुष = पूर्ण, सर्वव्यापी. **नैतेन किंचनाऽऽवृतं, नैतेन किंचनासंऽऽवृतं**' (सर्वांच्या अंतर्यामीं राहून व बाहेरून नियमन करणारा.)

**ज्ञानेश्वर—येणेंचि अभ्यासेसीं याग। चित्तासी करी पां चांगु !। अगा! उपायबळें पंगु। पहाड ठाकी** ( यत्न केला असतां पांगळाही गिरीचें लंघन करितो! ) ह्या असल्या उत्साहकारी मानवी शक्तीचें वर्णन दुसरीकडे क्वचितच सांपडेल.

**पंडित—ज्ञानी जाणोनि निर्गुण। ध्यातीं भक्तियोगें सगुण। ऐसें ध्यावें हें खुण। या श्लोकीं श्रीकृष्ण बोलिला॥**

**किंविशिष्टं च पुरुषं यातीत्युच्यते—**

**शिष्य**—त्या परमात्मस्वरूपाचें कांहीं लक्षण सांगावें.

गुरु—अरे! विलक्षणाचें लक्षण काय सांगावें? तथापि भगवान सांगत आहेत; ऐक :—

कविं पुराणमनुशासितार-
मणोरणीयांसमनुस्मरेद्यः ॥
सर्वस्य धातारमचिन्त्यरूप-
मादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥९॥

कविं, पुराणं, अनुशासितारं, अणोः अणीयांसं, सर्वस्य धातारं, अचिन्त्यरूपं, आदित्यरूपं, तमसः परस्तात् यः अनुस्मरेत् ( सर्वद्रष्टा, सनातन, सर्वशास्ता, लघूत्तम, सर्वाधार, बुद्धीस व मनास अगोचर, सूर्यासारखा तेजस्वी, आणि अंधकारातीत अशा परमात्म्याचें जो अनुचिंतन करितो )-तो परमपदाला जाऊन मिळतो.—( अर्थ स्पष्टच आहे ).—

कविं क्रान्तदर्शिनं सर्वज्ञं पुराणं चिरंतनमनुशासितारं सर्वस्य जगतः प्रशासितारमणोः सूक्ष्मादप्यणीयांसं सूक्ष्मतरमनुस्मरेदनुचिन्तयेद्यः कश्चित्सर्वस्य कर्मफलजातस्य धातारं विचित्रतया प्राणिभ्यो विभक्तारं विभज्य दातारमचिन्त्यरूपं नास्य रूपं नियतं विद्यमानमपि केनचिच्चिन्तयितुं शक्यत इत्यचिन्त्यरूपस्तमादित्यवर्णमादित्यस्येव नित्यचैतन्यप्रकाशो वर्णो यस्य तमादित्यवर्णं तमसः परस्तादज्ञानलक्षणान्मोहान्धकारात्परं तमनुचिन्तयन्यातीति पूर्वेणैव संबन्धः ॥ ९ ॥

त्रिकालज्ञान असल्यामुळें जो सर्वज्ञ आहे; जो अनादिसिद्ध सनातन आहे, ( सर्वांचें आदिकारण आहे ); जो सर्व जगांच्या अंतर्यामीं राहून त्यांचा नियंता आहे; तसेंच आकाश काल दिगादिक जीं अतिसूक्ष्म द्रव्यें आहेत, त्यांच्याहीपेक्षां जो लघु, जो सूक्ष्म असून प्रत्येक सूक्ष्म पदार्थांचें उपादानकारण आहे; जो सर्वांस, स्थूलसूक्ष्मांस आधार

आहे, म्हणजे ज्याच्या सत्तेनें प्राणीमात्रांस आपआपल्या कर्माप्रमाणें फलें मिळतात; ज्याचें स्वरूप मनास अगर बुद्धीस गोचर होत नाहीं, जो कल्पनातीत आहे म्हणजे ज्याचें अस्तित्व नित्य व निश्चित स्वरूपाचे असतांही कोणा एकाला सुद्धां ज्याचें रूप व महात्म्य कल्पना-विषय करितां येत नाहीं; ज्याचा चैतन्यप्रकाश, ज्याचा नित्य ज्ञान-प्रकाश स्वतःसिद्ध असून सूर्याच्या आधिभौतिक प्रकाशाप्रमाणें जग-त्प्रकाशक आहे; आणि तसेंच जो अंधकाराच्या म्हणजे अज्ञानाच्या मोहानें उत्पन्न होणारा जो अंधकार त्याच्याही पलीकडे आहे, सारांश जेथें अज्ञानाचा किंवा मोहाचा स्पर्शही नाहीं, त्या परमश्रेष्ठ परमात्म्याचें जो दृढ अनुचिंतन करितो, तो त्याच परमपदाला जातो हें मागच्या श्लोकांत सांगितलेंच आहे.

**श्रीधर**—कवि = सर्वविद्या निर्माण करणारा. धाता = पोषक. सूर्याप्रमाणें जो स्वप्रकाश आणि परप्रकाशक आहेः ‘ **वेदाहमेतं पुरुषं महांतमादित्यवर्णं तमसः परस्तात्** ’ अशी श्वेता० श्रुतिच आहे.

**द्विवेदी**—कठोपनिषदस्थ श्रुति पहाः **सर्वे ‘ वेदा यत्पदमामनन्ति’** इत्यादि ‘ अणूपेक्षां अणु ’ = सर्वोपाधिशून्य; केवळ अदृश्यरूप पण सर्वव्यापी आणि सर्वकारण.’--जो अभेदबुद्धि झाला त्याच्या मात्र हस्तगत मुक्ति होते.

**रामानुज**—जीवापेक्षां सूक्ष्म म्हणजे अत्यंत लघु. ‘ धाता=स्रष्ट । ‘ अचिंत्यरूप = सकलेतरविसजातीयस्वरूप ’ ( आपल्याहून अन्य पदार्थासारखें व पदार्थाहून विलक्षण स्वरूप आहे ज्याचें ! ). ईश्वरास स्वरूपवंत ठरविण्याचीही युक्ति आहे.

**द्वैतवादी**--‘ धाता = धारण व पोषण कर्ता ’ ‘ तम = मृत्यु ’ ‘ **मृत्युर्वै तमः, जोतिरमृतम्** ’ ‘ मृत्यूच्या पलीकडचा तो अमर होय. ’

**ज्ञानेश्वर**—अस्तमानाचें जयाशीं । आडनांव नाहीं !॥

**पंडित**--‘ **स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च** ’ ‘ **यो ब्रह्माणं विदधाति पूर्णं यो वै वेदाश्च प्रहिणोति तस्मै ॥ तं ह देवमात्म-बुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये** ॥ ’ ( जो ब्रह्मदेवास उत्पन्न करून आश्रय देतो, ज्यानें ब्रह्मदेवास वेद ज्ञान दिलें त्या

आत्मप्रकाशक देवाला मी मुमुक्षु शरण जातों). '**अणोरणीयान्महतो महीयान्। आत्मा गुहायां निहितोऽस्य जन्तोः॥**' (सूक्ष्माहून सूक्ष्मतर आणि थोराहून अति थोर असा निःस्वरूप आत्मा प्राणीमात्राच्या अहंकारापलीकडे राहत असतो.

**डेव्हिस**—'**अनुशासितारं**' = नियंता. या साहेबांस परमेश्वराचें (ब्रह्माचें) सत्तानियामकत्व समजत नाहीं, याचें कारण सगुण व निर्गुण यांतील विशेष सरहस्यानें कळला नाहीं हें आहे.

**किंच**—

आणखी:—

**प्रयाणकाले मनसाऽचलेन**
**भक्त्या युक्तो योगबलेन चैव॥**
**भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्य-**
**क्स तं परं पुरुषमुपैति दिव्यम्॥१०॥**

**प्रयाणकाले अचलेन मनसा** (अंतकालाचे वेळीं निश्चल अंतःकरणानें) **भक्त्या योगबलेन च युक्तः** (भक्तियुक्त आणि समाधिसामर्थ्यानें) **भ्रुवोः मध्ये प्राणं सम्यक् आवेश्य** (आपल्या भिवयांच्यामध्यें प्राणवायु योग्य रीतीनें व पूर्णत्वानें आणून ठेवून असतो) **सः** (तो योगी) **तं परं दिव्यं पुरुषं उपैति** (त्या श्रेष्ठ आणि तेजस्वी पुरुषाप्रत जातो).--सारांश भक्तीनें आणि योगबलानें आपलें मन मरणसमयीं स्थिर आणि एकाग्र करितो व आपल्या प्राणवायूस योगबलानें भिवयांच्या मधील मध्यबिंदूवर आणून ठेवितो, तो योगी त्या श्रेष्ठ आणि तेजस्वी परम पुरुषाप्रत जातो; परमेश्वराशीं तादात्म्य पावतो.—

**प्रयाणकाले मरणकाले मनसाऽचलेन चलनवर्जितेन भक्त्या युक्तो भजनं भक्तिस्तया युक्तो योगबलेन चैव योगस्य बलं योगबलं तेन समाधिजसंस्कारप्रचयजनितचित्तस्थैर्य-**

**लक्षणं योगबलं तेन च युक्त इत्यर्थः । पूर्वं हृदयपुण्डरीके वशीकृत्य चित्तं तत ऊर्ध्वगामिन्या नाड्या भूमिजयक्रमेण भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य स्थापयित्वा सम्यगप्रमत्तः सन्स एवं बुद्धिमान्योगी कविं पुराणमित्यादिलक्षणं तं परं पुरुषमुपैति प्रतिपद्यते दिव्यं द्योतनात्मकम् ॥ १० ॥**

मरणसमयीं सहस्र विंचु चावण्या इतक्या वेदना होत असल्या तरी त्या वेदनांस न जुमानितां अभ्यासामुळें स्थिर झालेल्या मनानें—

**शिष्य**—पण महाराज! हें मन परमेश्वराची अनन्यभक्ति आणि योगबळ यांच्या साहाय्यानेंच स्थिर केलें पाहिजे नव्हे?

**गुरु**—होय तर! अरे! समाधि सिद्ध झाल्यानंतर जे उत्तम संस्कार होतात, त्यांच्या संग्रहानें चित्ताला उत्तम प्रकारचें स्थैर्य येत असतें. असो, तेव्हां भक्तियोग आणि आत्मयोग यांनीं प्राप्त झालेल्या अचंचल मनाचा प्रयाणकालींही आत्मसंयोग एकाग्रतेनें साध्य होतो. याचा क्रम असा; प्रथमतः विषयगामी चित्ताला हृदयकमलाचे ठिकाणीं असतांनाच वश करावें, ह्मणजे विषयविन्मुख करावें. तदनंतर वर मस्तकाकडे, ब्रह्मरंध्राकडे जाणारी जी सुषुम्णा नाडी तिच्या साहाय्यानें भूमिआदि पंचमहाभूतांचा क्रमाक्रमानें पराभव करून आपला प्राणवायु भोंवयाच्यामध्यें स्थापावा आणि सावध राहावें; निष्काळजी असूं नये. याप्रमाणें जो बुद्धिवंत योगी आहे त्यानें अभ्यासबलानें प्राणस्थापना करून परमेश्वराधना केली ह्मणजे तो पुरुष सर्वद्रष्टा व सनातन, सारांश पुराणपुरुष जो स्वयंप्रकाश परमात्मा त्याच्या तादात्म्याप्रत जाऊन पोहोंचतो.

**श्रीधर**—मन चंचल आहे तें स्थिर करून, विक्षेपशून्य करून.

**मधुसूदनीकार**—भोंवयामध्यें आज्ञाचक्र आहे. तेथें प्रथम प्राणस्थापना करून जो ब्रह्मरंध्रांतून प्राणास बाहेर नेतो तो परमपद पावतो.

**शंकरानंद—"शतं चैका हृदयस्य नाड्यस्तासां मूर्धानमभिनिःसृतैका । तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति"** (हृदयपुंडरीकांत १०१ नाड्या आहेत त्यांतील एक ( सुषुम्ना ) शिराकडे जाते, तिच्या द्वारानें

प्राणवायु नेला असतां मोक्ष मिळतो.)—सारांश कुंभकानें प्राणापान एकत्र करून स्थिर करावें, नंतर इडापिंगला स्थिर करून एकत्र कराव्या, पुढें भोंवयांच्यामध्यें सुषुम्नाद्वारानें प्राण आणून ब्रह्मरंध्र फोडावें व भूम्यादिक पंचमहाभूतांचा महत्, अव्यक्त व अक्षर याचा, पराभव करावा. हें झालें म्हणजे परमपदप्राप्ति होते. सगुणोपासकास हा उपदेश आहे.

**पर्वते**—आज्ञाचक्रांतच प्राण ठेविला म्हणजे मनाला मूर्छा येत नाहीं; तें सावध राहून भक्तिपुरःसर परमेशस्मरण करितें. असो; हा उपासक अर्चिरादिमार्गानें हिरण्यलोकास जातो.

**चतरजी**—ज्या परमेश्वराची ज्ञानशक्ति आणि क्रियाशक्ति निश्चल आहेत त्याचें ध्यान एकाग्रतेनें अत्यंत दृढ करून, तत्स्वरूपाकार होऊन.

**रामानुज**—आज्ञाचक्रामध्यें दिव्य पुरुषाचें स्मरण केलें असतां दिव्य ऐश्वर्य प्राप्त होतें.

**द्वैतवादी** म्हणतात कीं वायुजयाचा, प्राणापानाचा, मार्ग कठिण आहे. ज्ञान, भक्ति आणि वैराग्य असलें म्हणजे मुक्ति मिळते.

**पंडित**—सहा चक्रें सांगतातः (१) गुह्यद्वारावर मूलाधारचक्र आहे. येथें पृथ्वी तत्त्व आहेः (२) स्वाधिष्ठानचक्र हें जलतत्त्वाचें स्थानः (३) नाभिस्थळावर मणिपूरचक्र आहे तें अग्नीचें स्थान आहेः (४) हृदयांत अनाहतचक्र वायूचें स्थानः (५) कंठस्थानीं विशुद्धचक्र हें आकाशतत्त्वाचें स्थान आहे (६) भोंवयामध्यें आज्ञाचक्र आहे. हें मनतत्त्वाचें स्थान आहे येथें प्राण ठेवावयाचा आहे. ॥ १० ॥

**वेदमार्गानुगमनेनैव ब्रह्मविद्यामन्तरेणाऽपि ब्रह्म प्राप्यत इत्येवं प्राप्त इदमुच्यते। पुनरपि वक्ष्यमाणेनोपायेन प्रतिपित्सितस्य ब्रह्मणो वेदविद्वदनादिविशेषणविशेष्यस्याभिधानं करोति भगवान्—**

ब्रह्मविद्या, आत्मज्ञान झाल्याशिवाय ही केवळ वेदमार्गानें, कर्ममार्गानें गेलें असतां, सारांश ज्ञानविज्ञान प्राप्ति झाली नाहीं तरी केवळ वेदमार्गाचें अनुसरण केल्यास ब्रह्मप्राप्ति होते असें मागील श्लोकांवरून

कोणी प्रतिपादन केल्यास तें प्रतिपादन खरें नाहीं, असें सांगण्यासाठीं इतका वेळ व्याख्यान केलें. हिरण्यगर्भप्राप्ति झाली तरी ब्रह्मज्ञानाविना मोक्ष नाहीं हें ठरविलें. आणखी ही पुनः पुढील उपाय सांगतात.—

**शिष्य**—कशाला?

**गुरु**—अरे! जें ब्रह्म आपल्यास प्राप्त करून घ्यावयाचें आहे, त्याचीं जीं आणखीं विशेषणें आहेत, 'वेदवेत्ते लोक त्यास जाणतात' इत्यादि विशेषणें आहेत तीं सांगतात, अशासाठीं कीं ब्रह्म मार्गीचें आणखी एक साधन उपलब्ध व्हावें.

**यदक्षरं वेदविदो वदन्ति**
**विशन्ति यद्यतयो वीतरागाः ॥**
**यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति**
**तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥ ११ ॥**

**वेदविदः यत् अक्षरं वदन्ति** (वेदवेत्ते ज्याला 'अविनाशी' असें म्हणतात) **वीतरागाः यतयः यत् विशन्ति** (निरिच्छ झालेले सन्यासी ज्यामध्यें आत्माकार होऊन प्रवेश करितात) **यत् इच्छन्तः ब्रह्मचर्यं चरन्ति** (ज्याची इच्छा करणारे ब्रह्मचर्य धारण करितात) **तत् पदं ते संग्रहेण प्रवक्ष्ये** (तें पद तुला संक्षेपानें सांगतों).

यदक्षरं न क्षरतीत्यक्षरमविनाशि वेदविदो वेदार्थज्ञा वदन्ति "तद्वा एतदक्षरं गार्गि ब्राह्मणा अभिवदन्ति" इति श्रुतेः । सर्वविशेषनिवर्तकत्वेनाभिवदन्त्यस्थूलमनण्वित्यादि । किंच विशन्ति प्रविशन्ति सम्यग्दर्शनप्राप्तौ सत्यां यद्यतयो यतनशीलाः संन्यासिनो वीतरागा विगतो रागो येभ्यस्ते वीतरागाः । यच्चाक्षरमिच्छन्तो ज्ञातुमिति वाक्यशेषः । ब्रह्मचर्यं गुरौ चरन्ति तत्ते पदं तदक्षराख्यं पदं पदनीयं ते तुभ्यं संग्रहेण संग्रहः संक्षेपस्तेन संक्षेपेण प्रवक्ष्ये कथयिष्यामि ॥ ११ ॥

अक्षर म्हणजे अविनाशी हा अर्थ तुला मागें सांगितला आहे; असो; तेव्हां ज्या ब्रह्माला वेद जाणणारे व इतरांस अगोचर अशा विषयाचा प्रत्यक्ष अनुभव घेणारे याज्ञवल्क्यादि ब्राह्मण ' अक्षर, अविनाशी ' असें नांव देतात.

**शिष्य**---म्हणजे उपनिषदांसारखे प्रामाणिक ग्रंथ केवळ ईशप्रेरणेनें निर्माण करणारे, मंत्र द्रष्टेच कीं नाहीं? बृहदारण्यकामध्येंही म्हटलेंच आहे कीं हे गार्गी! ' ज्याला ब्रह्मवेत्ते ब्राह्मण ' अक्षर ' या नांवानें ओळखितात ते ब्रह्म बरें! ' सारांश ज्याला ' तें स्थूल नाहीं. सूक्ष्म नाहीं ' अशीं विकारशून्यत्वाचीं अनेक, अनंत, विशेषणें देतात तेंच हें ब्रह्म ना?

**गुरु**---होय. आणखी; जे खरोखर निस्पृह, निरिच्छ, आशाशून्य होऊन पूर्ण वैराग्यशील झाले ते ज्ञानी व साक्षात्कारसंपन्न संन्यासी जेथें मिळून जातात, जेथें मोक्ष पावतात, तें हें ब्रह्म होय. आणखी एकदा; अविनाशी ब्रह्म जाणण्याची इच्छा अत्यंत तीव्र असल्याकारणानें अनेक मोक्षेच्छु लोक ब्रह्मचर्यव्रताचें कडकडित पालन करून दयाळू व ब्रह्मज्ञ गुरूंची उपासना करितात; त्या ह्या ब्रह्माचें ' अविनाशी असें जें स्वरूप आहे व जें ' ॐ ' या प्रतीकानें साध्य आहे तें स्वरूप तुला आतां संक्षेपानें सांगतों. हें समजलें असतां अर्थातच तुझी ब्रह्मज्ञानाची आतुर आकुलता नाहींशी होईल.

**शंकरानंद**---ज्या नित्य, कूटस्थ, अभंग, चिदेकरस आणि अद्वितीय ब्रह्माला वेदवेत्ते लोक आपआपल्या उपनिषदाच्या आधारें ' हें निष्कल, निष्क्रिय, शांत, अनंत असें आहे ' असा उपदेश स्वशिष्यांस करित असतात. ब्रह्मचर्य = दृष्टादृष्ट सुखाविषयीं वैराग्य, आहारविहारादिकाचें नियमन आणि धर्मपुरःसर श्रद्धेनें व भक्तीनें गुरुचरणाजवळ वेदांत श्रवण.

**रामानुज**—मत्स्वरूप जो ओंकार त्याची कशी उपासना करावी तें तुला थोडक्यांत सांगतों.

**पंडित**—**संग्रह** = संक्षेप नव्हे; तर प्राणांचा संग्रह करून देह-

त्याग करावयाचा, त्याला संग्रह म्हणतात. पंडितांस अपूर्व कल्पना काढण्याची हौस फार!

**टामसन**:—अनंत व अनिश्चित अशा ब्रह्मस्थानाला हिंदु लोक 'पद' ह्मणतात, याचें आश्चर्य साहेबमहसुफांस वाटत आहे. 'पद' ही जागा नाहीं! जिकडे जावयाचें, जें समजून घ्यावयाचें, तें हें पद होय. ॥ ११ ॥

"स यो ह वै तद्भगवन्मनुष्येषु प्रायणान्तमोंकारमभिध्यायीत कतमं वाव स तेन लोकं जयतीति तस्मै स होवाच, एतद्वै सत्यकाम परं चापरं च ब्रह्म यदोंकारः" इत्युपक्रम्य "यः पुनरेतं त्रिमात्रेणोमित्येतेनैवाक्षरेण परं पुरुषमभिध्यायीत" इत्यादिना वचनेन "अन्यत्र धर्मादन्यत्राधर्मात्" इति चोपक्रम्य "सर्वे वेदा यत्पदमामनन्ति तपांसि सर्वाणि च यद्वदन्ति। यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण ब्रवीम्योमित्येतत्" इत्यादिभिश्च वचनैः परस्य ब्रह्मणो वाचकरूपेण प्रतिमावत्प्रतीकरूपेण च परब्रह्मप्रतिपत्तिसाधनत्वेन मन्दमध्यमबुद्धीनां विवक्षितस्योंकारस्योपासनं कालान्तरे मुक्तिफलमुक्तं यत्तदेवेहापि "कविं पुराणमनुशासितारम्" "यदक्षरं वेदविदो वदन्ति" इति चोपन्यस्तस्य परस्य ब्रह्मणः पूर्वोक्तरूपेण प्रतिपत्त्युपायभूतस्योंकारस्य कालान्तरमुक्तिफलमुपासनं योगधारणासहितं वक्तव्यं प्रसक्तानुप्रसक्तं च यत्किंचिदित्येवमर्थ उत्तरो ग्रन्थ आरभ्यते—

**शिष्यः**—भगवन्! हा पुढें सांगावयाचा उपाय म्हणजे ॐकाराची, प्रणवाची, उपासनाच ना? बरें; मला आतां असें विचारावयाचें, कीं मनुष्यजातींतील जे लोक मरणकालापर्यंत व मरणाच्या क्षणीं सुद्धां ओंकाराची उपासना करितात ते कोणत्या लोकांस जिंकितात? कोणत्या लोकास जातात बरें?

**गुरु**—प्रश्नोपनिषदांत असाच प्रश्न शिष्यानें केला आहे. त्याला उत्तर देतांना गुरुजींनीं कसा आरंभ केला म्हणशील तर पहाः—'हे सत्य-

प्रिय! सत्य मात्र जाणण्याची इच्छा करणाऱ्या शिष्या! सत्यसंकल्पा पिप्पलादा! ओंकार हेंच पर आणि अपर ब्रह्म आहे.

**शिष्य**—परब्रह्म समजेल; पण अपरब्रह्म म्हणजे काय?

**गुरु**---अपर म्हणजे कनिष्ठः; आतां कनिष्ठ ब्रह्म म्हणजे गुणविशिष्ट ब्रह्म होय. जें ध्यानामध्यें आणितां येतें, जें वर्णितां येतें, सारांश ज्याला गुण म्हणून कांहीं आहेत तें सगुण अगर कनिष्ठ अथवा अपर ब्रह्म होय. असो; तेव्हां या सगुण ब्रह्माच्या ज्ञानानेंच निर्गुण, निर्विशेष, परब्रह्माची ओळख अधिकारपरत्वें करून घेण्याची आहे. समजलें? आतां गुरुजींनीं ॐ हें परब्रह्म आहे व अपरब्रह्म ही आहे असा विषयाचा उपक्रम केला. ह्याचप्रमाणें 'त्रिमात्रक जो ॐ-'

**शिष्य**---त्रिमात्रक म्हणजे अ, उ, म्, या ज्याच्या मात्रा म्हणजे घटकावयव आहेत तोच ओंकार ना?

**गुरु**—ठीक समजलास. 'तेव्हां जो कोणी या त्रिमात्रकस्वरूपी ओंकारानें, ॐ या अक्षरस्वरूपानें, परपुरुष जो हिरण्यगर्भ त्याचें ध्यान करितो' इत्यादि कठोपनिषत्कारांनीं वचनें घेऊन वरील प्रश्नाचा ऊहापोह सुरू केला आणि 'धर्माहून भिन्न, अधर्माहून भिन्न' असा उपक्रम केला;—

**शिष्य**---पण भगवन्! कठोपनिषदांतच असा एक मंत्र नाहीं काय कीं ज्यांत प्रस्तुत श्लोकार्थाचाच केवळ अनुवाद केला आहे? 'सर्व श्रुतींनीं प्रमंडन केलें आहे, सर्व तपस्वी ऋषी ज्याचा पवित्र उच्चार श्रद्धेनें करितात, ज्याच्या ज्ञानाची इच्छा धरून लोक ब्रह्मचर्य व्रताचें अनुपालन गुरुगृहीं करितात व गुरुसेवा करितात, तें पद, तें अक्षर तुला थोडक्यांत सांगतों' हा मंत्र व भगवतांचा श्लोक केवळ समान अर्थाचेच आहेत, असेंच नव्हे तर यांत शब्दसाम्यही अत्यंत आहे!

**गुरु**---मग यांत आश्चर्य तें काय? एकाच परमेश्वराची प्रेरणा होऊन उपनिषदें व गीता निर्माण झालीं आहेत. असो; हीं जीं वचनें आहेत, हीं सर्व एककंठानें ॐकाराचें ध्यान व उपासना हीं कालांतरानें म्हणजे क्रममुक्तीच्या द्वारें मुक्ति देणारीं आहेत, असें सांगतात. ॐकार

हा परब्रह्माचा वाचक शब्द आहे व ॐकार हा परब्रह्माची एक स्मारक अशी मूर्तवस्तु आहे. ह्या वस्तूच्या म्हणजे ओंकाराच्या अनन्यजपानें व ॐकाराच्या अनन्य उपासनेनें परब्रह्मप्राप्ति कालांतरानें होते. सारांश ब्रह्मप्राप्तीचें हें एक साधन आहे. ज्याची बुद्धि अत्यंत मंद आहे, निदान फारशी तीव्र नाहीं, त्यास ओंकारजप व ओंकारोपासना हा मार्ग अत्यंत सोईचा आहे. मात्र ह्या जपानें व उपासनेनें तात्काळ मुक्ति मिळावयाची नाहीं. ह्या जपतपानें चित्तशुद्धि होऊन ज्ञानप्राप्तीची योग्यता येईल व पुढें ज्ञानासह विज्ञान झालें म्हणजे मुक्ति मिळेल. सारांश तीव्र बुद्धीच्या ज्ञानी लोकांसाठीं ही उपासना सांगितली नाहीं; ज्ञानास अनधिकारी लोकांसाठीं सांगितली आहे. असो; हा प्रकार श्रुतींत सांगितला आहे, त्याचप्रमाणें या गीताशास्त्रांतही " सर्वद्रष्टा, सनातन व सर्वशास्ता याचें स्मरण करणारा " " ज्या अविनाशी पदाचें वर्णन श्रुतिनिष्णात पंडित करितात " अशा रीतीनें विषयप्रवेश करून वर्णन केलेल्या श्रेष्ठ ब्रह्माची प्राप्ति होण्यास ॐकार हें उत्तम साधन आहे, म्हणून पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ओंकाराची दृढ उपासना योगधारणेसहित करावी असा विषय आणिला आहे. ही उपासना कालांतरानेंच फलप्रद व्हावयाची. हा ओंकारोपासनेचा विषय व त्याचें फल ( कालांतरानें मुक्ति मिळणार हें फल ) ह्याचा कांहीं ऊहापोह करावा या हेतूनें पुढील व्याख्यान केलें आहे.

**सर्वद्वाराणि संयम्य**
**मनो हृदि निरुध्य च ॥**
**मूर्ध्न्याधायाऽऽत्मनः प्राण-**
**मास्थितो योगधारणाम् ॥ १२ ॥**

**सर्वद्वाराणि संयम्य** ( सर्व ज्ञानसाधनें, ज्ञानप्रवेशाची द्वारें, इंद्रियें संयमित करून ) **च** ( आणि ) **हृदि मनः निरुध्य** ( मनाला हृदयामध्येंच कोंडून ठेऊन )-तसेंच-**आत्मनः प्राणं मूर्ध्नि आधाय** ( आपला प्राणवायु आहे त्यास मस्तकांत आणून ) **योगधारणां**

**आस्थितः** ( धारणेमध्यें, एकाग्रधारणेमध्यें गढून गेलेला– )–पुढील श्लोकांत अन्वय पुरा होईल.—

**सर्वद्वाराणि सर्वाणि तानि द्वाराणि च सर्वद्वाराण्युपलब्धौ तानि सर्वाणि संयम्य संयमनं कृत्वा मनो हृदि हृदयपुण्डरीके निरुध्य निरोधं कृत्वा निष्प्रचारमापाद्य तत्र वशीकृतेन मनसा हृदयादूर्ध्वगामिन्या नाड्योर्ध्वमारुह्य मूर्धन्याधायाऽऽत्मनः प्राणमास्थितः प्रवृत्तो योगधारणां धारयितुम् ॥१२॥**

बाह्यविषयांचें ज्ञान करून देणारीं जीं आंतील व बाहेरील ज्ञानेंद्रियें आहेत, त्यांतील एकूणएक इंद्रियांस बद्ध करून, विषयांपासून परावृत्त करून व आपलें अनिचंचल जें मन त्यास हृदयकमलामध्यें कोंडून ठेवून—

**शिष्य**—म्हणजे त्याची गति सर्वतोप्रकारें नाहींशी करून, त्यास सर्वथा वश करून, विषयविस्मरण करवून, त्याच्या साहाय्यानें; मूलाधारापासून निघून हृदयकोशांतून वर जाणारी सुषुम्नानाडी तिच्यायोगें प्राणवायूस वर मस्तकापर्यंत चढवावयाचें–हाच हेतु ना ?

**गुरु**—बरोबर ! पण हा आपला प्राणवायु, ही क्रियाशक्ति, मस्तकामध्यें निश्चल करून ठेवावयाची; अशा करितां कीं येथें मनानें एकाग्र होऊन दृढप्रयत्नानें नित्य व निरंतर ध्यान करण्याचा अभ्यास जोरानें करितां यावा. जिव्हेनें जप आणि मनानें धारणापूर्वक ध्यान हीं कार्यें साधावयाचीं आहेत.

**शिष्य**—योगधारणेचा संबंध ‘ आत्मनः ’ या शब्दाकडे घेऊन ( ‘ आत्मस्वरूपाचें ध्यान करण्यांत गढून गेलेला ’ ) असा अर्थ केला तर?

**गुरु**—ठीक आहे. कांहीं वावगें नाहीं. पण अजून ॐकारस्वरूप किंवा त्याचा जप सांगितला नाहीं म्हणून आम्हीं केला आहे तोच अर्थ ठीक आहे.

**शिष्य**—पण पुढें काय ? उत्क्रमणाचीही शारीरिक तयारी सर्व झाली. पुढें काय करावयाचें ?

**गुरु**—याचा विचार पुढील श्लोकांतच सांगितला आहे.

**मपाकार**—ऋक्शाखेतील श्रुति व ब्राह्मण देतात: "**युवा सुवासाः परिवीत आगात्स उ श्रेयान् भवति जायमानः । तं धीरासः कवय उन्नयंति स्वाध्यो मनसा देवयन्तः**" (सत्वांतःकरणाचें प्रतिबिंब पडलें असा शरीरी, मुख्यप्राण, जीवदशेप्रत प्राप्त होतो आणि सत्कर्मनिरत होतो. त्याला दूरदर्शी, दृढव्रताचे, मुनी उत्तम गतीला (देवलोकाला) मनासह घेऊन जातात).

**शंकरानंद, पंडित, तेलंग**—'वायूचे मार्ग बंद करून' असा 'द्वारां' च्या संयमनाचा अर्थ करितात. **शंकरानंद व द्विवेदी**—हृदयामध्यें असणारे अनाहत चक्रामध्यें मन स्थिर करून व तेथून धीरानें विशुद्धिचक्र, आज्ञाचक्र व सहस्रारचक्र यांमध्यें खेंचून ठेवणें हा गुरूपदिष्ट मार्ग आहे.

**रामानुज**—'**योगधारणां आस्थितः**' = मांझेच अखंड सादर स्मरण करणारा.

**द्वैतवादी**—'हृदि' = विष्णूचे ठिकाणीं. (जगाचें हरण करणारा तो हृद् (विष्णु) त्याचे ठिकाणीं.) ब्रह्मरंध्रांत प्राण असल्यावर मनही तेथेंच असतें हा सामान्य नियम आहे. 'जेथें प्राण तेथें मन' ही उक्ति प्रसिद्धच आहे.

**ज्ञानेश्वर**—**परि हें तरीच घडे । जरी संयमाचीं अखंडें । सर्वद्वारीं कवाडे । कळासतीं** (खिळून जातील) ॥....**प्राणांचा प्रणवचि करावा । मग अनुवृत्तिपंथें आणावा । मूर्ध्निवरी ॥ तेथ आकाशीं मिळे न मिळे । तैसा धरावा धारणाबळें । जंव मात्रात्रय** (अकार, उकार, मकार) **मावळे । अर्ध बिंबीं** (अर्धमात्रेंत) ॥ **तंववरी तो समीरू । निराळीं** (आकाशांत) **कीजे स्थीरू । मग लग्नीं** (ऐक्यावस्थेंत) **जेवीं ओंकारू । बिंबींचि विलसे** ॥

**पंडित**—येथें हठयोगाचा प्रकार वर्णन करितात.

**टॉमसन, डेव्हिड**—मन = ज्ञानसाधन. हृद् = शारीरिक इंद्रियें.

**मनो हृदि निरुध्य** ( हृदयांतरीं सर्व विकार शून्यवत् ठेवून ). **मन** = कामक्रोधादि विकार.

**तेलंग**—शरीराचीं नऊ द्वारें असा पंडितांप्रमाणें अर्थ सुचवितात. तेलंगांचा '**ब्रह्मविषयमकुर्वन्**' हा अर्थ चुकला आहे असें वाटतें. 'ब्रह्म' च्या ठिकाणीं 'बाह्य' हा शब्द आहे व असावा.॥१२॥

**तत्रैव च धारयन्**—

तेथेंच म्हणजे मस्तकांतच तो प्राण ठेवून—

> **ओमित्येकाक्षरं ब्रह्म**
> **व्याहरन्मामनुस्मरन् ॥**
> **यः प्रयाति त्यजन्देहं**
> **स याति परमां गतिम् ॥१३॥**

**ओम् इति एकाक्षरं ब्रह्म व्याहरन्** ('ओं' हेंच जें एकाक्षरी परब्रह्माचें नांव त्याचा जप करित असतां)—व—**मां अनुस्मरन्** (माझें, सर्वव्यापी परमेश्वराचें चिंतन करित असतां) **त्यजन् देहं** (देह सोडणारा) **यः प्रयाति** (जो जातो, जो मरतो) **स याति परमां गतिं** (तो अतिश्रेष्ठ पदाला जाऊन पोहोंचतो) सारांश ॐ-काराचा जप, परमेश्वराचें स्मरण, सुखानें देहत्याग, इत्यादि ज्यास साध्य झालीं तो पुरुष (—व्यावहारिक भाषेनें-'मेल्यावर') उत्तम गतीस जातो.—

ओमित्येकाक्षरं ब्रह्म ब्रह्मणोऽभिधानभूतमोंकारं व्याहरन्नुच्चारयंस्तदर्थभूतं मामीश्वरमनुस्मरन्ननुचिन्तयन्यः प्रयाति म्रियते स त्यजन्परित्यजन्देहं शरीरं त्यजन्देहमिति प्रयाणविशेषणार्थं देहत्यागेन प्रयाणमात्मनो न स्वरूपनाशेनेत्यर्थः। स एवं त्यजन्याति गच्छति परमां प्रकृष्टां गतिम् ॥ १३॥

स्मरण व्हावें या हेतूनें मात्र जें ब्रह्माचें-प्रतीकरूपानें—नांव झालें

आहे ( वस्तुतः ब्रह्मास नांव नाहींच ) अशा एकाक्षरी ओंकाराचा सोच्चार जप करित असतां व त्या ओंकार शब्दाचा जो अर्थ म्हणून ठरविलेला आहे त्या अर्थाचें म्हणजे ( मी जो परमेश्वर त्याचें ) दृढ-चिंतन करित असतां जो मरतो--

शिष्य--गुरुराज! आत्मा मरत नाहीं असें आपण मला अनेक वेळीं सांगितलें आहे; तेव्हां येथें 'मरणें' याचा अर्थ देहत्याग करणें इतकाच घ्यावयाचा असेल. सारांश, 'देहाचा त्याग करून जो चालता होतो,' असें आपल्यास सांगावयाचें आहे. आपण बोललां, तें केवळ प्रापंचिक मनुष्यांस समजेल अशा अर्थानें बोललां, असें मला वाटतें. शिवाय मरण काळीं ॐ या एकाक्षराचा जपही सोपाच असेल.

**गुरु**--शाबास! बरोबर समजलास. देहत्याग करणें म्हणजे मरणें नव्हे. देह टाकून देऊन तो चालता होतो. येथें आत्मस्वरूपाचा नाश होत नाहीं हेंच खरें. प्रापंचिक लोक अज्ञानानें या देहत्यागास 'मरण' अशी संज्ञा देतात. असो; स्थूल, सूक्ष्म व कारण देहांचा याप्रमाणें सुखानें त्याग करून तो क्रमाक्रमानें उत्कृष्ट असें जें मोक्षपद तिकडे जातो.

**प्रपाकार**—'ॐ' हा मात्रत्रयात्मक वेद. ॐ हेंच ब्रह्म आहे, त्याचा जप करावा.

**रामानुज**—परम गतीचें लक्षण २०, २१ श्लोकांत सांगितलें, आहे याप्रमाणें ऐश्वर्य व कैवल्य मागणाऱ्या भक्तांविषयीं झालें. आतां ज्ञानाची भगवदुपासना सांगतात.—

**द्वैतवादी**--'अक्षर' शब्दावर पांडित्य केलें आहे तें व्याकरज्ञांनीं अवश्य वाचावें.

**ज्ञानेश्वरानीं** अर्जुनाकरवी शंका घेतली आहे: **इंद्रियां अवघड पडिलिया। जीविताचें सुख बुडालिया। आंत बाहेरीं उघडलिया। मृत्यु चिन्हें॥ ते वेळीं बैसावेंची कवणें?। मग कवण निरोधी करणें** ( इंद्रियें )?। **तेथें काह्याचेनि** ( कशाच्या योगानें ) **अंतःकरणें। योग स्मरावा?॥ तरी गा ऐशीया हा ध्वनी। जाणें**

**थारा देशी गा मनीं । पै नित्य सेविला मी निदानीं । सेवक होय ॥** हे आश्वासन किती तरी उत्साहजनक आहे?

**पंडित**--येथे ॐ स्मरणानें ( पूरक, कुंभक, रेचक, सहित ) प्राणायम करणें हा अर्थ समजतात. मस्तकांत प्राण कोंडून ठेविला, ब्रह्मांडीं प्राण नेला, म्हणजे तो दशमद्वार ( टाळू ) फोडून अर्चिरादि मार्गानें चालता होतो. ॥ १३ ॥

**किंच**—

आणखी—

**अनन्यचेताः सततं**
**यो मां स्मरति नित्यशः ॥**
**तस्याहं सुलभः पार्थ**
**नित्ययुक्तस्य योगिनः ॥ १४ ॥**

**यः मां नित्यशः अनन्यचेताः सततं स्मरति** ( जो माझें प्रति दिवशीं अनन्यभावानें व अखंडत्वानें स्मरण करितो ) **तस्य नित्ययुक्तस्य योगिनः** (त्या नित्य समाधिनिष्ठ होणाऱ्या भक्ताला ) **पार्थ** ( हे अर्जुना ! ) **अहं सुलभः** ( मी अत्यंत सुलभत्वानें, सौकर्यानें, प्राप्त होतो )--एकाग्रचितानें नित्यशः स्मरण करणाऱ्या भक्ताला परमेश्वरप्राप्ति फार सुलभ आहे.—

अनन्यचेता नान्यविषये चेतो यस्य सोऽयमनन्यचेता योगी सततं सर्वदा यो मां परमेश्वरं स्मरति नित्यशः । सततमिति नैरन्तर्यमुच्यते । नित्यश इति दीर्घकालत्वमुच्यते । न षण्मासं संवत्सरं वा किं तर्हि, यावज्जीवं नैरन्तर्येण यो मां स्मरतीत्यर्थः । तस्य योगिनोऽहं सुलभः सुखेन लभ्यः पार्थ नित्ययुक्तस्य सदा समाहितस्य योगिनः । यत एवमतोऽनन्यचेताः सन्मयि सदा समाहितो भवेत् ॥ १४॥

अर्जुना! मी जो षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवान परमेश्वर त्याचें, परब्रह्माच्या प्रकट स्वरूपाचें, जो एकनिष्ठचित्तानें---

**शिष्य**---म्हणजे परमेश्वराशिवाय सादर भक्तीचा दुसरा विषयच नाहीं ज्याच्या अंतःकरणाला, अशा पुरुषाविषयींच आपण बोलत आहांतना?

**गुरु**---होय. अशा एकाग्रचित्तानें जो स्मरण करतो, सारांश ज्याचें स्मरण अखंड आहे व नित्यही आहे---

**शिष्य**---नित्य म्हणजे?

**गुरु**---दीर्घकालपर्यंत. सहामहिने किंवा वर्षभर असें नव्हे, तर जोंपर्यंत जीवमान आहे तोंपर्यंत ज्याचें स्मरण अखंड आहे, एवंच परमेश्वराचें ध्यान करितांना ज्याची समाधि अखंड असते, सर्वत्र परमेश्वरस्वरूप दिसूं लागून ज्याचें आचरण निष्काम आणि निर्मळ असतें, त्या योग्याला मी फार सौकर्यानें प्राप्त होतों. तात्पर्य, ज्याला अखंडसुखाची प्राप्ति व्हावी त्यानें माझें स्मरण अनन्यभावानें सतत आमरण, करावें.

**प्रभाकार, श्रीधर, शंकरानंद**---एकनिष्ठभक्ताला पुढें पुढें ध्यानादिक क्लेश करावे लागत नाहींत; कारण परमेश्वर, परब्रह्म, सर्वत्र आहे अशीच त्याची दृष्टि होते. म्हणून देहत्यागाचे वेळीं ह्या पुरुषाला माझें स्मरण अखंडच असतें. हठ योग्यांप्रमाणें त्याला आयास करावे लागत नाहींत.

**मधुसूदन**—ज्याला प्राणायाम साध्य झाला नाहीं आणि म्हणून स्वाधीनमरण हीं जो झाला नाहीं त्या एकनिष्ठभक्ताची व्यवस्था या श्लोकांत लाविली आहे असें म्हणतात. दीर्घकाल एकनिष्ठेनें अखंड परमेश्वरचिंतन निष्कामबुद्धीनें करणें हाही योगच आहे.

**शंकरानंद**--- ‘परमेश्वरस्मरण = मीच ब्रह्म आहें, असें अखंड अनुसंधान.’

**रामानुज**---प्रीतिपूर्वक ईश्वरस्मरण अखंड करणारास मीच प्राप्त होतों. माझें ऐश्वर्यादि स्वरूप तेंच त्यास मिळतें असें नाहीं, तर माझी प्राप्तिही त्यास होते.

**द्वैतवादी**—'सतत = व्याप्तिसहित! सर्वव्यापी परमेश्वर आहे या ज्ञानासह. योगी = संपूर्ण योग साध्य झाला आहे असा.

**ज्ञानेश्वर**—जे विषयासी तिलांजुली देऊनी। .... ॥ हें रूपक व पुढील वर्णन अवश्य वाचावें..... **पै एक रंक आडलेपणें** (निरुपायानें)। **काकुळती धांवगा धांव म्हणे। तरी तयाचेही ग्लानी धांवणें। काय न घडे मज? ॥ .... तो आभार** (ओझें) **ही जीवा। साहवेचिना!** ॥ परमेश्वर भक्तांची सेवा करितो त्याचें वर्णन ही उत्तम आहे.

**पंडित**—अनन्य चित्तानें व्यतिरेक सांगून मत्स्मरण म्हणजे अन्वय सांगितला. ॥ १४ ॥

**तव सौलभ्येन किं स्यादित्युच्यते शृणु तन्मम सौलभ्येन यद्भवात्ति—**

शिष्य—परमेश्वर सुलभ झाला तर काय होतें बरें?

गुरु—काय होतें तेंच प्रत्यक्ष भगवान सांगतात. ऐकः—

**मामुपेत्य पुनर्जन्म**
**दुःखालयमशाश्वतम् ॥**
**नाऽऽप्नुवन्ति महात्मानः**
**संसिद्धिं परमां गताः ॥ १५ ॥**

**महात्मानः मां उपेत्य** (ज्यांचें अंतःकरण मोठें झालें, उदार झालें, भेदशून्य झालें, ते माझे भक्त माझ्याकडे येऊन) **परमां संसिद्धिं गताः** (त्यांना अतिश्रेष्ठ अशी सिद्धि प्राप्त होते–आणि–) **पुनः** (पुनरपि) **अशाश्वतं दुःखालयं** जन्म न आप्नुवन्ति) अनित्य व दुःखाचें आगर,–घर–जो जन्म, संसार तो या लोकांस प्राप्त होत नाहीं. )–सारांश परमेश्वराशीं एकत्व पावलेल्या लोकांस पुनः पुनः संसाराचीं अनंत दुःखें भोगावीं लागत नाहींत.

**मामुपेत्य मामीश्वरमुपेत्य मद्भावमापद्य पुनर्जन्म पुनरुत्पत्तिं न प्राप्नुवन्ति किं विशिष्टं पुनर्जन्म न प्राप्नुवन्तीति तद्विशेषणमाह दुःखालयं दुःखानामाध्यात्मिकादीनामालयमाश्रयमालीयन्ते यस्मिन्दुःखानीति दुःखालयं जन्म । न केवलं दुःखालयमशाश्वतमनवस्थितस्वरूपं च नाऽऽप्नुवन्तीदृशं पुनर्जन्म महात्मानो यतयः संसिद्धिं मोक्षाख्यां परमां प्रकृष्टां गताः प्राप्ताः । ये पुनर्मां न प्राप्नुवन्ति ते पुनरावर्तन्ते ॥१५॥**

अर्जुना! याप्रमाणें एकनिष्ठ भक्तीनें ज्ञानवंत होऊन जे मत्स्वरूपाप्रत प्राप्त होतात त्यांना पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं. संसारचक्रापासून ते सुटतात. आतां जन्म म्हणजे काय, जन्ममरणरूपी संसारांत त्रिविध प्रकारचे ताप देणारीं दुःखें रात्रंदिवस कशीं जागृत असतात, संसार हें या दुःखांचें कसें माहेरघर असतें, हा संसार व यांतील दुःख देणारे किंवा दुःखमूलक सुख देणारे विषय किती चंचल आहेत हें तुला सांगाव्यास नकोच आहे.

**शिष्य**—त्रिविध म्हणजे अध्यात्मिक, आधिभौतिक इत्यादि मघाशीं, अध्यायाच्या प्रारंभीं, सांगितले तेच ताप ना?

**गुरु**—होय. अशा प्रकारचा दुःखमूलक संसारसागर ओलांडून जातात. एवंच ज्याला ज्ञानपूर्वक एकनिष्ठ भक्तीनें विज्ञान प्राप्त होऊन मोक्षप्राप्ति झाली, ते निर्मळ चित्ताचे, ब्रह्मैकदृष्टि झालेले, तीव्र वैराग्यसुखाचा अनुभव घेणारे, लोक जन्ममरणाच्या फेऱ्यांमधून सुटतात. पण जे लोक माझें एकाग्र भजन करित नाहींत, अतएव मोक्ष मिळवित नाहींत, ते लोक जन्ममरणाच्या माळेंत सांपडतात.

**शंकरानंद, चतरजी**—सच्चिदानंदैकरस ब्रह्माशीं तादात्म्य पावलेले शुद्ध सात्विक भावाचे भक्त, प्रसन्नमनाचे ब्रह्मज्ञपुरुष, विदेहमुक्ति पावतात. सर्वत्र व सर्वदा ब्रह्मदृष्टि झाल्यामुळें सुखदुःखविरहित जी अखंड आनंदाची स्थिति तिचा अखंड उपभोग घेतात. '**न च पुनरावर्तते**' (पुनः जन्ममरण नाहीं) अशी श्रुतिच आहे. 'जन्ममरण अतिचंचल आहे म्हणून त्यांत होणाऱ्या दुःखपर्यवसायी

सुखाचें स्वरूप बरोबर कळत नाहीं.' चतरजीची ही व्याख्या स्मरणीय आहे. संसारांत एकामागून एक अशी अखंड दुःखपरंपराच असते.

**द्वैतवादी**--'**पानेन ते देव कथासुधायाः प्रवृद्धभक्त्या विशदाशया ये ॥ वैराग्यसारं प्रतिलभ्य बोधं यथांजसा त्वापुरकुंठधिष्ण्यं ॥**'-( परमेश्वरा ! जे निर्मळ चित्ताचे लोक तुझ्या कथांचें अमृत-वाढत जाणाऱ्या-भक्तीनें पीत राहतात, त्यांस विषयांचें वैराग्य प्राप्त होऊन ज्ञान होतें आणि लीनेनें ते त्वत्स्वरूपाला प्राप्त होतात. )

**ज्ञानेश्वर**—दुःखदायक जन्म पहा !....**मग क्लेशतरूची वाडी** ( बाग ) । **जे तापत्रयाची सगडी** ( शेगडी ) । **जे मृत्युकाकासी** ( मृत्युरूपी कावळ्यास ) **कुरोंडी** ( ओवाळणी )। **सांडिली आहे !॥** ....**जें दुर्मतीचें मूळ । जें कुकर्माचें फळ । जें व्यामोहाचें केवळ । स्वरूपचीं ॥** ....इत्यादि काव्यकौतुहलाचें भांडारगृह जिज्ञासूंनीं अवश्य उघडावें.

**पंडित**—माझ्या जवळ येऊन म्हणजे सगुणस्वरूपी ऐकात्म्य पावून ( समीपता, सलोकता व सरूपता पावून ) ॥ १९ ॥

**किं पुनस्त्वत्तोऽन्यत्प्राप्ताः पुनरावर्तन्त इत्युच्यते**—

**शिष्य**---परमात्मा व्यतिरिक्त जे अन्याश्रयी झाले, अन्याश्रय ज्यांनीं स्वीकारला, ते परत येतात, संसारांत पडतात, याचें कारण काय ?

**गुरु**--ऐक काय तें—

**आब्रह्मभुवनाल्लोकाः**
**पुनरावर्तिनोऽर्जुन ॥**
**मामुपेत्य तु कौन्तेय**
**पुनर्जन्म न विद्यते ॥ १६ ॥**

**अर्जुन** ( अर्जुना ! ) **आब्रह्मभुवनात् लोकाः पुनरावर्तिनः** ( ब्रह्मलोकापर्यंत जे सात लोक आहेत ते पुनः पुनः जन्ममरण घेणारे

आहेत. ) तु (पण) **कौन्तेय** (कुंतीपुत्रा अर्जुना!) **मां उपेत्य पुनर्जन्म न विद्यते** (माझ्याकडे आलें असतां पुनर्जन्माचें अस्तित्व नष्ट होतें. )–ईश्वरसाक्षात्कार होऊन तादात्म्यवृत्ति झाली म्हणजे पुनर्जन्म नाहीं.–**भूः, भुवः, स्वः, महः, जनः, तपः, सत्यं**–हे सात लोक व मोक्षलोक हा आठवा लोक होय. हा लोक सर्वव्यापी आहे.

**आब्रह्मभुवनाद्भवन्ति यस्मिन्भूतानीति भुवनं ब्रह्मभुवनं ब्रह्मलोक इत्यर्थः। आब्रह्मभुवनात्सह ब्रह्मभुवनेन लोकाः सर्वे पुनरावर्तिनः पुनरावर्तनस्वभावा हेऽर्जुन। मामेकमुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म पुनरुत्पत्तिर्न विद्यते॥ १६॥**

जेथें चराचर वस्तु असतात तें भुवन होय. ब्रह्मदेव राहतात त्या लोकास ब्रह्मलोक म्हणतात. हा सर्व लोकांत श्रेष्ठ आहे. असो; तेव्हां या लोकापर्यंतचे सर्व लोक, सर्व भुवनें, जन्ममरणाच्या चक्रांत सांपडलीं आहेत. ह्या सर्वांचें स्वरूपच जन्ममरणात्मक आहे. म्हणून तेथें राहणारे अज्ञानी लोकही संसारांतच गुरफटून राहतात. पण माझ्यास्वरूपाप्रत जे आले, सर्वव्यापी, सर्वदयावन, आदिकारण, नित्य असा जो षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवान् त्याला, एकनिष्ठभक्तीच्या अखंड चिंतनानें ज्या पापपुण्यशून्य पुरुषांनीं निष्कामबुद्धीनें आमरण आळविलें, ते मात्र पुनः परत येत नाहींत; त्यांचें मात्र जन्ममरण तुटतें; त्यांचा सुखदुःखात्मक संसार नष्ट होतो.

**प्रपाकार—शातपथी "योवा एतदक्षरमविदित्वा गार्गि। अस्मिल्लोके जुहोति, ददाति, तपस्यति। अपि बहूनि वर्षाण्यन्तवानेवास्य स लोके भविष्यति"** (गर्गकन्ये! हा जो अविनाशी परमात्मा यातें न जाणतां ह्या लोकामध्येंच यज्ञयाग, दान, तप इत्यादि वेदविहित आचरण सकामत्वानें जो करितो, तो अनेक हजार वर्षें जगतो खरा, पण शेवटीं त्याला मृत्यु येतोच येतो ) एवंच साम्राज्य, भौज्य, स्वाराज्य, वैराज्य, पारमेष्ठ्य इत्यादि पुण्योपभोगाचे लोक हे सर्व मृत्यूस वश आहेत; म्हणून तेथील राहिवासीही मर्त्यच आहेत.

**मधुसूदन, रंगनाथ, श्रीधर**—कर्मद्वारानें मुक्ति मिळत नाहीं. पूर्ण वैराग्य, ब्रह्मज्ञान, योग आणि निष्कामभक्ति आणि विज्ञानसहित ज्ञान, यांनीं मोक्ष मिळतो. कोणतीही निष्काम उपासना अनन्यभावानें केली म्हणजे मोक्षप्राप्ति होते.

**चतरजी**—परमात्म्याशीं तादात्म्य पावल्याशिवाय 'विश्रांति' नाहीं. आपलें शरीरच आपण आहोंत असें जें आपलें अज्ञान असतें त्याच अज्ञानानें हें विश्व व त्यांतील अनेक विषय यांस, सारांश विश्वाला, आत्मत्व देऊन आपण संसारांत पडतो. सारांश आपला हृदयस्थ आत्मा आणि परमात्मा हे वस्तुतः एकच असें ज्याला अनुभव पुरःसर निश्चयानें समजलें तो देहास व विश्वास आत्मत्वानें समजत नाहीं व त्यांस वशही होत नाहीं. तोच, परमात्मभक्तच, अमर होतो ( पहा जानकृत शु० अ० ३ श्लोक १९ ).

**रामानुज**—'मी सत्यसंकल्प, सर्व विश्वाची उत्पत्ति, स्थिति लय, लीलामात्रें करणारा परम कारुणिक व एकरूप आहे.' हें परमेश्वरस्वरूप आहे.

**द्वैतवादी**—वैकुंठवासी झाल्यावर जन्ममरण नाहीं. कांहीं स्मृति वाक्यें घेऊन ऊहापोह करितात, पण तो अप्रस्तुत म्हणून घेतला नाहीं.

**ज्ञानेश्वर**—ना तरी चेइलिया नंतरें । न बुडिजे स्वप्नींचेनि महापुरें । तेवीं मातें पावले ते संसारें । लिंपतीच ना ।॥

**पंडित**—वैकुंठ माझें स्वरूप । तेथें जे असती पाऊनी मद्रूप । तितकेही मजसमीप........सारांश सगुणभक्ति करून अद्वैतमार्ग सिद्ध करावयाचा आहे ॥ १६ ॥

**ब्रह्मलोकसहिता लोकाः कस्मात्पुनरावर्तिनः कालपरिच्छिन्नत्वात्कथम्**—

**शिष्य**—हे ब्रह्मलोकासहित सर्व अष्टलोक कां बरें उत्पत्तिलयांच्या स्वाधीन असतात?

**गुरु**—अरे! ते सर्व **कालाच्या** आधीन आहेत म्हणून ते कालमर्यादित आहेत. हे कसे ते एक-

**सहस्रयुगपर्यन्त-**
**महर्यद्ब्रह्मणो विदुः ॥**
**रात्रिं युगसहस्रान्तां**
**तेऽहोरात्रविदो जनाः ॥ १७ ॥**

**यत् अहोरात्रविदः जनाः** ( रात्र आणि दिवस यांचें परिमाण ज्यांस ठाऊक आहे असे लोक, ज्योतिषी लोक ) **ते विदुः** ( त्यांस माहित आहे कीं ) **ब्रह्मणः अहः सहस्रयुगपर्यंतं** ( ब्रह्मदेवाचा दिवस हजार युगांच्या शेवटीं पूर्ण होतो )–आणि–**रात्रिं युगसहस्रान्तां** ( रात्र ही युगसहस्राच्या शेवटीं परिपूर्ण होते. ) ब्रह्मदेवाचा दिवस व रात्र हीं प्रत्येकीं मानवी हजार युगांचीं असतात, असें कालवेत्त्यांस विदित आहे.

**सहस्रयुगपर्यन्तं सहस्रं युगानि पर्यन्तः पर्यवसानं यस्याह्नस्तदहः सहस्रयुगपर्यन्तं ब्रह्मणः प्रजापतेर्विराजो विदुः, रात्रिमपि युगसहस्रान्तामहःपरिमाणामेव । के विदुरित्याह तेऽहोरात्रविदः कालसंख्याविदो जना इत्यर्थः । यत एवं कालपरिच्छिन्नास्तेऽतः पुनरावर्तिनो लोकाः ॥ १७ ॥**

सृष्टीचा उत्पादक जो ब्रह्मदेव त्यासच प्रजापति किंवा विराट असें ह्मणतात. ह्या ब्रह्मदेवाच्या दिवसाचें मान कसें आहे तें पहा. आपलीं मानवीं जीं सत्य, त्रेता, इत्यादि चार युगें आहेत, त्यांस चौकडी म्हटलें तर ही चौकडी किंवा महायुग जेव्हां हजार वेळ फिरत राहील तेव्हां कोठें ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो ! रात्रीचेही परिमाण दिवसाप्रमाणेंच आहे. योगाभ्यासानें अतींद्रियज्ञान झालेले कालवेत्ते, ज्योतिःशास्त्रवेत्ते, अशा मनूसारख्या अति मानवी लोकांस ब्रह्मदेवाच्या दिनरात्रीचें मान याप्रमाणें कळलेलें आहे. एवंच तात्पर्य काय कीं जसा दिवस आणि रात्र असा आपला कालविभाग आहे, तसाच सृष्टिकर्त्याचाही आहे. आणि म्हणून तें विराट स्वरूपही

कालाधीन, मर्त्य आहे. येणें, जाणें त्या स्वरूपाच्या पाठीमागेंही लागलेलें आहे. श्रेष्ठ लोकांस जाणें म्हणजे ज्यास्त अयुष्य असणें इतकाच काय तो भेद होय.

**प्रपाकार**--छांदोग्यांतही **'सहस्रयुगपर्यन्तमहर्ब्राह्मं यदुच्यते'** असा मंत्र आहे. प्रपाकार १० शतकाच्या सुमारास झाले असा अजमास आहे. त्यांच्यावेळीं 'भिन्न देशांत निरनिराळें दिनमान असतें, चरकालामुळें दिनमान भिन्न होतें' इत्यादि ज्योतिःसिद्धांत ऋग्वेदाच्या आधारें सिद्ध करित असत; ही लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

**श्रीधर, पर्वते**—देवांचीं १२००० वर्षें म्हणजे चतुर्युग समजतात; मानवी वर्ष = देवांची अहोरात्र.

**शंकरानंद**--याप्रमाणें संसार कष्टप्रद असतांही प्राणी उघड्या डोळ्यांनीं सकाम कर्म अंधपरंपरेनें करून संसारांत पडतात हें आश्चर्य नव्हे काय ? ब्रह्मदेवच जर अनित्य तर बाकीचे लोक व विशेषतः मृत्युलोक, अनित्यच असणार यांत काय नवल आहे ?

**द्विवेदी**---वासनाक्षय आणि पिंडब्रह्मांड एकच आहेत अशी अखंड भावना असणें व त्याप्रमाणेंच कर्तव्य होणें हाच मोक्ष मार्ग होय. सूर्य पृथ्वीस आधार देतो म्हणून सूर्यलोकावर गेलेला जीव पृथ्वीवर परत येत नाहीं. चंद्रास पृथ्वी आकर्षण करिते म्हणून चंद्र लोकचे जीव पृथ्वीवर परत येतात. सूर्यलोकमार्ग म्हणजे ज्ञानमार्ग आणि पितृलोकमार्ग म्हणजे कर्ममार्ग होत. व्याख्यान अवश्य वाचावें. पुढील १२ श्लोकाची व्यवस्था येथें लागते. हे व **चतरजी**ही म्हणतातः 'अहोरात्र जाणणारे म्हणजे कल्पव्यवस्था व मुमुक्षूंचा मार्ग जाणणारे लोक होत.'

**द्वैतवादी**—सहस्र = अनेक. (हजारापेक्षां ही जास्त). ब्राह्म = विष्णु! (हा अर्थ सिद्धांतास विघातक आहे.) विष्णु नित्य असतांही त्यास प्रलयकाल व सृष्टिकाल असे कालानुभव येतात. सारांश तो कूटस्थ असूनही विकृत होतो! हीं सर्व अपसिद्धांतात्मक वाक्यें आहेत.

**पंडित**--हटयोगाच्या पाठीस लागणारे लोक आत्मघातक होत. ज्ञानावांचून मोक्ष नाहीं. हटयोगी........**देऊनि हातींचा विडा। तांबुल मागे वेडा। ज्यास होता ज्ञाने मोक्ष रोकडा। तो दाढेस पडला काळाच्या! ॥....हारवूनि हातींचें मोतीं। खडे मोजूं लागले! ॥**

ब्रह्मदेवाचें आयुष्य म्हणजे १९९,९२०,०००,०००००, इतकीं मानवीं वर्षें. यांत ३६००० वेळ प्रलय होतो व उत्पत्ति होते! ॥१७॥

**प्रजापतेरहनि यद्भवति रात्रौ च तदुच्यते--**

या प्रजापतीच्या दिवसरात्रींची व्यवस्था सांगतात--

**अव्यक्ताद्व्यक्तयः**
**सर्वाः प्रभवन्त्यहरागमे ॥**
**रात्र्यागमे प्रलीयन्ते**
**तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥**

**अहरागमे अव्यक्तात् सर्वाः व्यक्तयः प्रभवन्ति** (ब्रह्मदेवाच्या दिवसास प्रारंभ झाला म्हणजे सर्व चराचर, मूर्त, पदार्थ अव्यक्तापासून, आदिकारणापासून, बीजांकुराप्रमाणें उत्पन्न होऊन आपआपले व्यापार करण्यास प्रवृत्त होतात.)–आणि–**रात्र्यागमे तत्र एव अव्यक्तसंज्ञके प्रलीयन्ते** (रात्र पडली म्हणजे सर्व मूर्तपदार्थ पुनः अव्यक्तामध्यें लीन होतात.)–एवंच दिवस उजाडला म्हणजे सृष्टि प्रकट होते आणि रात्र आली म्हणजे ती लीन होते. प्रकटता आणि अप्रकटता हीं दोन सृष्टींचीं रूपें आहेत. सारांश सृष्टीस व सृष्टीकर्त्यासही जन्ममृत्यूचें अनंत दुःख आहे! ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत सर्व अनित्यच आहे. एक परब्रह्म मात्र नित्य आहे.

**अव्यक्ताद्व्यक्तं प्रजापतेः स्वापावस्था तस्मादव्यक्ताद्व्यक्तयो व्यजन्त इति व्यक्तयः स्थावरजङ्गमलक्षणाः सर्वाः प्रभवन्त्यभिव्यज्यन्तेऽह्न आगमोऽहरागमस्तस्मिन्नहरागमे का-**

**ले ब्रह्मणः प्रबोधकाले तथा रात्र्यागमे ब्रह्मणः स्वापकाले प्रलीयन्ते सर्वा व्यक्तयस्तत्रैव पूर्वोक्तेऽव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥**

अव्यक्त म्हणजे सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाची निद्रावस्था होय. ही निद्रावस्था, कारणावस्था, संपली, ब्रह्मदेवाचा दिवस उगवला, म्हणजे स्थावरजंगम, चराचर वस्तु, मूर्तस्वरूपानें व सेंद्रिय शरीरात्मक व्यक्तिस्वरूपानें प्रकट होतात. ही ब्रह्मदेवाची जागृतअवस्थेची व्यवस्था झाली. सृष्टीस चित्रविचित्र रमणीयता येते ती ह्याच वेळीं. ही अवस्था संपली, ब्रह्मदेव निद्रावश झाला म्हणजे सृष्टींतील विविधता नष्ट होऊन सर्व पदार्थ पुनः आपल्या पूर्वावस्थेंत, अव्यक्तांत, कारणावस्थेंत लीन होतात.

**शिष्य**—मातीपासून घट होणें म्हणजे व्यक्त होणें आणि घटाची माती होणें म्हणजे अव्यक्त होणें, असाच वरील प्रकार ना ?

**गुरु**—माती ही आपल्या कारणांत गुप्त झाली, तें कारण आपल्या कारणांत लीन झालें, अशी शेवटपर्यंत व्यवस्था झाली म्हणजे अव्यक्त स्थिति येते.

**प्रपाकार**—रात्र ही कारणावस्था आहे. '**ऋतं चसत्यंचाभीद्धात्तपसोऽध्यजायत। ततो रात्र्यजायत**' ( सर्वत्र प्रकाशमान असणाऱ्या तपोनिष्ठ परमेश्वराच्या मनांत सृष्टि उत्पन्न करावी असा सत्य संकल्प आला, नंतर 'मीच पुष्कळ होईन' अशी त्यानें प्रतिज्ञा केली व सत्यभाषणानुसार रात्रि उत्पन्न केली म्हणजे काल उत्पन्न केला. एवंच रात्रि ( अव्यक्त ) ही कारणावस्था आहे.

**पर्वते**—ब्रह्मदेव ही आपल्या अज्ञानजन्य कल्पनेनें सृष्टि उत्पन्न झाली आहे असें पाहतो.

**चतरजी**—अव्यक्ताच्या महासागरावर व्यक्तांच्या लाटा उत्पन्न होतात व त्यांतच लय पावतात.

**श्रीरामानुज**—चतुर्मुख ब्रह्मा = अव्यक्त. यालाच **मधुसूदन, हिरण्यगर्भ** म्हणतात.

**द्वैतवादी**—अव्यक्त = विष्णु.

**ज्ञानेश्वर--शारदीचिये प्रवेशीं । अभ्रें जिरतीं आकाशीं । मग ग्रीष्मांतीं जैशीं । निगतीं पुढतीं ॥ तैसी ब्रह्मदिनाचिये आदी । हे भूतसृष्टीची मांदी** ( समुदाय ) **। मिळे जंव सहस्रा-वधीं** ( हजार वर्षांचा काळ ) **। निमित्त पुरे** ( हे निमित्त पुरें होई-पर्यंत ) **॥.... कैसे थोरिवेचें मान पाहेपां । तो** ( ब्रह्मदेव ) **सृष्टि-बीजांचा सांटोपा** ( कोठार ) **। परि पुनरावृत्तीचिया मापा । शीग जाहाला ॥ १८ ॥**

**अकृताभ्यागमकृतविप्रणाशदोषपरिहारार्थं बन्धमोक्षशास्त्र-प्रवृत्तिसाफल्यप्रदर्शनार्थमविद्यादिक्लेशमूलकर्माशयवशाच्चाव-शो भूतग्रामो भूत्वा भूत्वा प्रलीयत इत्यतः संसारे वैरा-ग्यप्रदर्शनार्थं चेदमाह--**

**शिष्य**—भगवन्! याप्रमाणें जर सृष्टीच्या उत्पत्तीची व लयाची व्यवस्था असेल, म्हणजे कालवशत्वानें सृष्टि उदय पावते व अस्तंगत होते म्हणजे सुखदुःख हें कर्मवश नसून कालवशच आहे, असा खरा प्रकार असेल तर उद्योगाशिवाय फलप्राप्ति, उद्यो-गाचा नाश हे दोष ह्या सृष्टिव्यवस्थेवर येऊन पडतात; तसेंच प्रपं-चांत घालणारीं व प्रपंचांतून काढणारीं शास्त्रेंही व्यर्थच होऊं पाहतात. कारण कालवशातच जर सर्व गोष्टी व्हावयाच्या तर कर्माचा किंवा ज्ञानाचा कांहींच उपयोग नाहीं, असें होतें.

**गुरु**—तसें नाहीं. कालवश ह्या गोष्टी नाहींत; कर्मवश आहेत. कर्म हें अज्ञान व अज्ञानजन्य अहंकार, लोभ, द्वेष, दुराग्रह यांपासून उत्पन्न होतें. हें कर्म धर्मात्मक अगर अधर्मात्मक असो. परमार्थदृष्टीनें तें ( सकाम-कर्म ) दुःखमूलकच होतें. व्यावहारिकतः धर्मात्मक सकामकर्म सुखदायी हें खरें; पण पारमार्थिकतः सर्व सकामकर्म पापात्मक म्हणजे दुःखोत्पा-दकच होतें. असो; कर्मवश प्राणी झाला म्हणजे तो कर्मतंत्र, परतंत्र, पर-स्वाधीन होतो आणि जन्ममरणाच्या चक्रांत सांपडून 'पुनरपि जननं पुनरपि मरणं' या भोंवऱ्यांत गुंतून राहतो. एवंच संसार म्हणजे कर्मबंध दुःखदायक आहे हें सांगण्यासाठीं म्हणतात—

**भूतग्रामः स एवायं**
**भूत्वा भूत्वा प्रलीयते ॥**
**रात्र्यागमेऽवशः पार्थ**
**प्रभवत्यहरागमे ॥ १९ ॥**

**पार्थ**( अर्जुना ! ) **स एव अयं भूतग्रामः भूत्वा भूत्वा प्रलीयते** (ह्याच त्या सर्व चराचर वस्तु पुनः पुनः उत्पन्न होऊन पुनः पुनः नाश पावतात. )–केव्हां?–**रात्र्यागमे** ( रात आली, महाप्रलयकाल आला म्हणजे–नाश पावतात ) **अहरागमे प्रभवति–व**–( सृष्टिकाल आला, उजाडलें म्हणजे उत्पन्न होतात ). **पार्थ** (अर्जुना ! **अवशः** (हा सर्व पदार्थ मात्र परतंत्र आहे, कर्मतंत्र आहे. ) सारांश कर्मानुसार प्राणी व वस्तु प्रकट होतात व नाश पावतात. उत्पत्ति व लय हे कालकृत प्रकार खरे, पण पदार्थांची उत्पत्ति, स्थिति व लय ह्या सर्व गोष्टी ज्या त्या प्रत्येकाच्या कर्मानुसार होतात. एवंच प्रत्येक पदार्थ कर्मवश आहे.

**भूतग्रामो भूतसमुदायः स्थावरजङ्गमलक्षणो यः पूर्वस्मिन्कल्प आसीत्स एवायं नान्यो भूत्वा भूत्वाऽहरागमे प्रलीयते पुनः पुना रात्र्यागमेऽह्नः क्षयेऽवशोऽस्वतन्त्र एव पार्थ प्रभवति अवश एवाहरागमे ॥ १९ ॥**

भूतग्राम म्हणजे भूतांचा समुदाय; या समुदायांत स्थावरजंगम, चरअचर; जड चेतनात्मक, सर्व पदार्थ येतात. हे पदार्थ पूर्वकल्पांत स्वकर्मानुसार विशिष्ट अवस्था भोगीत असतात; हा भोग संपला म्हणजे कांहीं विशिष्ट मनोवस्था घेऊन सृष्टिकालाचे आरंभीं प्रकट होतात. त्यांस दुसरी, कर्मफलविलक्षण, अवस्था प्राप्त होणें शक्य नाहीं. '**धाता यथापूर्वं अकल्पयत्**' ( प्रजापती पूर्वानुसंधानानें उत्पति करितो ) अशी श्रुति आहे. असो; रात्र आली, प्रलयकाल प्राप्त झाला, म्हणजे हे सर्व स्थावरजंगमात्मक

विश्व, सर्वपदार्थांसह लीन होतें, गुप्त होतें, अव्यक्त स्थितींत जाऊन मिळते, अप्रकट होतें. परंतु हें प्रकटीभवन व प्रलयीभवन, सारांश हें प्रकट होणें हें अप्रकट होणें ह्या अवस्था पदार्थमात्रास परतंत्रत्वानें प्राप्त होतात. एवंच पदार्थमात्र कालाधीन व कर्माधीन आहे. हाच संसार होय, असल्या प्रकारची जी पारतंत्र्यावस्था, दुःखसात त्याची अवस्था हिला कंटाळून मनुष्यानें विषयविरक्त व्हावें, एतदर्थ पदार्थांच्या उत्पत्तीची व लयाची मीमांसा या श्लोकांत केली आहे. अर्जुना! समजलेंना?

**प्रपाकार**—'हें सर्व दृश्यजात स्वप्नसदृश आहे' हें सिद्ध करितात.

**शंकरानंद**—भिन्न भिन्न सुखदुःख केवळ कालसामर्थ्यानेंच प्राप्त होत असेल तर जीवास विनाकारण सुखदुःखें भोगावीं लागतात, असें होईल व शास्त्रेंही व्यर्थ होतील; ही शंका दूर करण्यासाठीं कर्मानुसार पुनर्जन्माची सिद्धि या श्लोकांत केली आहे व स्वकर्मानुसार सुखदुःखप्राप्ति होते असें सांगितलें आहे.

**चतरजी**—जीवमात्र सर्व प्राणी हे भेदबुद्धि, अहंकार, लोभ, द्वेष इत्यादिकांस वश असतात म्हणून परतंत्र आहेत व दुःखी आहेत.

**पर्वते, द्विवेदी**—अत्यंत नाश कशाचाच नाहीं. प्रकटता आणि प्रलीनता ह्यांनीं दृश्य स्वरूपास अनित्यत्व आणिलें आहे.

**श्रीरामानुज**—पृथ्वी पाण्यांत, पाणी तेजांत या क्रमानें अव्यक्त अक्षरांत आणि अक्षर परमेश्वरस्वरूपांत लीन होतें. एवंच माझ्याशिवाय बाकी सर्व मीच कालाकरवीं उत्पन्न करितों व माझ्यामध्येंच सर्वांचा लय होतो. कालाचा उत्पादक मीच आहें. बाकीचे सर्व पदार्थ कालवश म्हणून अनित्य आहेत.

**द्वैतवादी**—अवश = विष्णुवश. ब्रह्मदेवादि मुक्त आहेत तथापि त्यांस जन्म घ्यावा लागतो! जडास स्वरूपतः (खरोखर) उत्पत्तिलय आहे; जीवास देहोत्पत्ति व देहलय आहे; आणि कर्मफलोत्पत्ति व कर्मफललय आहेत.

**डेव्हिड**—अवश = परतंत्र = ब्रह्मवश. हा अर्थ चुकला आहे.

प्रत्येक जीवास सुखदुःख होतें किंवा पदार्थांस स्वरूपभिन्नता प्राप्त होते ती त्या जीवाच्या कर्मानुरूप होत असते. मायेच्या योगानें जीवास पारतंत्र्य आलें आहे. **टामसन**—अवश याचा अर्थ साहजिकतः असा करितात. **तेलंग**—सामर्थ्यशून्य असा करितात. आपलें बुद्धि-स्वातंत्र्याचा आपण दुरुपयोग केला म्हणजे आपण मायेच्या तडाक्यांत सांपडतों व सामर्थ्यशून्य, स्वातंत्र्यहीन, होतों हा सरळ अर्थ आहे. ॥ १९ ॥

**यदुपन्यस्तमक्षरं तस्य प्राप्त्युपायो निर्दिष्ट ओमित्येकाक्षरं ब्रह्मेत्यादिनाऽथेदानीमक्षरस्यैव स्वरूपनिर्दिदिक्षयेदमुच्यतेऽनेन योगमार्गेणेदं गन्तव्यमिति—**

या अध्यायाच्या तिसऱ्या श्लोकांत 'ब्रह्म हें अविनाशी आहे' असा विषयप्रवेश करून तें ब्रह्म 'ॐ' या प्रणवाचा जप एकाग्रतेनें केला असतां प्राप्त होतें, असा १३ व्या श्लोकांत उपायही सांगितला. नंतर ब्रह्मव्यतिरिक्त इतर सर्व वस्तु क्षर (विनाशी) आहेत असें सांगितलें. आतां त्या अविनाशी वस्तूचें स्वरूप सांगावयाचें आहे; हेतु हा कीं तें स्वरूप कळलें म्हणजे त्याचा योगमार्ग समजून त्या अक्षराची प्राप्ति होईल.—

**परस्तस्मात्तु भावोऽन्योऽ**
**व्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ॥**
**यः स सर्वेषु भूतेषु**
**नश्यत्सु न विनश्यति ॥ २० ॥**

तु (परंतु) **तस्मात् परः अन्यः भावः अव्यक्तः** (या व्यक्त भूतग्रामाहून निराळी व विलक्षण अशी अक्षर नामक वस्तु आहे ती इंद्रियांस गोचर नाहीं)—तसेंच—**अव्यक्तात् अन्यः परः भावः** (अव्यक्त म्हणजे जी प्रकृति, आदिमाया, तिच्याहून निराळी आणि विलक्षण अशी वस्तु आहे) **यः सनातनः** (ही जी सनातन वस्तु

आहे ) **सः सर्वेषु नश्यत्सु भूतेषु न विनश्यति** ( सर्व भूतांचा नाश झाला असतांही ती वस्तु नाश पावत नाहीं. )—सारांश व्यक्ताच्या पलीकडे व अव्यक्ताच्या पलीकडे व उभयतांहून विलक्षण असें सनातन ब्रह्म आहे. पदार्थमात्र नष्ट झाला तरी या ब्रह्माचा नाश होत नाहीं. ती वस्तु सर्वतोपरी पूर्ण आहे.

**परो व्यतिरिक्तो भिन्नः कुतस्तस्मात्पूर्वोक्तात् । तु–शब्दोऽक्षरस्य विवक्षितस्याव्यक्ताद्वैलक्षण्यविशेषणार्थः । भावोऽक्षराख्यं परं ब्रह्म । व्यतिरिक्तत्वे सत्यपि सालक्षण्यप्रसङ्गोऽस्तीति तद्विनिवृत्त्यर्थमाह–अन्य इति । अन्यो विलक्षणः स चाव्यक्तोऽनिन्द्रियगोचरः । परस्तस्मादित्युक्तं, कस्मात्पुनः परः पूर्वोक्ताद्भूतग्रामबीजभूतादविद्यालक्षणादव्यक्तात् । सनातनश्चिरन्तनः । यः स भावः सर्वेषु भूतेषु ब्रह्मादिषु नश्यत्सु न विनश्यति ॥ २० ॥**

परंतु हा शब्द घातला आहे तो अक्षर नामक इंद्रियांस अगोचर जें ब्रह्म आहे, तें पदार्थमात्राहून निराळें आहे, असें दाखविण्यासाठीं घातला आहे. ह्याच अक्षराचा विचार आतां कर्तव्य आहे. आतां निराळे असूनही पदार्थ एकजातीयक असूं शकतील असें कदाचित् कोणी म्हणेल म्हणून विलक्षण अशा अर्थाचा शब्द उपयोजिला. एवंच ब्रह्म नामक वस्तु अक्षर व अत्युत्तम आहे आणि म्हणूनच ती सर्व चराचर पदार्थांहून निराळी, उत्कृष्ट व विलक्षण आहे असें सिद्ध होतें.

**शिष्य**—ह्याचप्रमाणें ज्या अविद्यास्वरूपामुळें भूतांची उत्पत्ति झाली, सारांश जें भूतांच्या उत्पत्तिलयांचें बीज आहे तें जें अज्ञानरूपी अव्यक्त ( माया ), त्याहूनसुद्धां ही ब्रह्मवस्तु निराळी व विलक्षण आहे, असें सिद्ध झालेंच. कारण अज्ञानी माया विकारयुक्त आहे व ब्रह्मास विकार नाहीं. तथापि ‘ सत् ’ रूपानें हें ब्रह्म प्रपंचांत आहेच.!

**गुरु**—म्हणूनच चिरंतन असा शब्द घातला बरें ! आणि चिरं-

तन म्हणजे काय असें म्हणशील तर सर्व भूतांचा कारणासह नाश झाला असतांही या अव्यक्त, अक्षर, सनातन ब्रह्माचा नाश होत नाहीं.

**मधुसूदन**—'अव्यक्त' = हिरण्यगर्भ. हा अर्थ धनपतीस संमत नाहीं.

**श्रीरामानुज**—'ब्रह्म हें स्वसंवेद्य व असाधारणाकार आहे.' हें मत सिद्धांतरूपी नव्हे; कारण जाणणेपणा आला कीं द्वैत उत्पन्न होतें.

**द्वैतवादी**—सर्व भूतग्राम 'भावन' आहे आणि परमेश्वर 'भाव' =सर्व कर्ता व स्वतंत्र आहे.

**ज्ञानेश्वर**—जैसें आटलिया रुपें। आटलेंपण तें खोटी (लगड) ह्मणिपे। पुढती तो घनाकार (घट्टपणा) हारिपे। जे वेळीं अलंकार होती॥ हीं दोन्हीं जैसी होणीं। एकी साक्षीभूत सुवर्णी। तैसी व्यक्ताव्यक्ताची कडसणी (विचार)। वस्तूच्या (ब्रह्माच्या) ठायीं!॥ तें तरी व्यक्त ना अव्यक्त। नित्य ना नाशवंत। या दोही भावां अतीत। अनादिसिद्ध॥ जें हें विश्वचि होऊनि असे। परि विश्वपण नासलेनि न नासे। अक्षरें पुसिल्या न पुसे। अर्थ जैसा॥ पाहे पां तरी तरंग होत जात। परि तेथ तें उदक अखंड असत। तेवीं भूताभावीं न नाशत। अविनाश जें॥ ना तरी आटतिये अलंकारीं। नाटतें (न आटणारें) कनक असें जयापरी। तेवीं मरतिये जीवाकारीं। अमर जें आहे॥ २०॥

या अक्षराची उपासना करितात ते पुनर्जन्माप्रत येत नाहींत असें सांगतात—

अव्यक्तोऽक्षर इत्युक्त-
स्तमाहुः परमां गतिम्॥
यं प्राप्य न निवर्तन्ते
तद्धाम परमं मम॥२१॥

**अव्यक्तः अक्षरः इति उक्तः** ( या इंद्रियातीत अव्यक्ताला अक्षर, अविनाशी असें म्हणतात. ) **तं परमां गतिंआहुः** ( यालाच अतिश्रेष्ठ पुरुषार्थ, इष्टतमवस्तु म्हणतात. ) **यं प्राप्य न निवर्तन्ते तत् मम परमं धाम** ( ज्या पदाला जाऊच पोहोंचलें असतां पुनः कधीं परत यावें लागत नाहीं तें माझें श्रेष्ठ व परममंगल धाम होय. )– सारांश हिरण्यगर्भादिक सर्व नाशवंत आहे; पण हें अव्यक्त ब्रह्म मात्र अविनाशी आहे. हें प्राप्त करून घेणें हाच परम पुरुषार्थ होय. ह्या पदाला जाऊन पोहोंचलें असतां पुनः कधींही जन्म घ्यावा लागत नाहीं. हें परमेश्वराचें आश्रयस्थान आहे. हेंच ब्रह्म आहे.

**अव्यक्त इति योऽसावव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमेवाक्षरसंज्ञकमव्यक्तं भावमाहुः परमां प्रकृष्टां गतिम् यं भावं प्राप्य गत्वा न निवर्तन्ते संसाराय तद्धाम स्थानं परमं प्रकृष्टं मम विष्णोः परमं पदमित्यर्थः ॥ २१ ॥**

हा जो अव्यक्त ( इंद्रियातीत ) आहे तोच परमात्मा अविनाशी आहे. ' **अक्षरं पुरुषं वेद** ' अशी श्रुति आहे. ह्याच अक्षर नामक अव्यक्ताला परम श्रेष्ठ स्थान, पुरुषार्थाची जागा असें म्हणतात. ' **पुरुषात् न परं किंचित् सा काष्टा, सा परागतिः** ' अशी श्रुति आहे. परमात्मप्राप्ति हाच अत्यंत श्रेष्ठ पुरुषार्थ आहे. असो; हें उत्पत्तिविनाशशून्य, स्वयंप्रकाश आणि परमानंदस्वरूप असें पद प्राप्त झालें, ब्रह्मज्ञान होऊन साक्षात्कार झाला, म्हणजे संसारामध्यें पुनः गटंकळ्या खाव्या लागत नाहींत. भगवान म्हणतातः हेंच माझें परमश्रेष्ठ स्थान, अत्युच्च पद होय. ' **तद्विष्णो परमं पदं** ' अशी श्रुति आहे. ब्रह्मपद अद्वितीय आहे.

'अव्यक्त = हिरण्यगर्भ' असा **मधुसूदनीकार** अर्थ करितात तो **धनपतीस** संमत नाहीं; कारण ' **महतः परमव्यक्तं** ' अशी श्रुति आहे.

**श्रीधर, मधुसूदन, चतरजी, द्विवेदी**—' **मम धाम** ' ( माझें घर ही लक्षणा होय. मी आणि स्थान एकच होत. राहूचें शिर याप्रमाणें ही लक्षणा आहे. )

**चतुरजी**—निर्वाण म्हणजेच ब्रह्म होय. एवंच ॐकार ज्याचें प्रतीक आहे असें ब्रह्म कार्यकारणाहून भिन्न आणि विलक्षण आहे. In Him we live and move and have our being ( परमेश्वरी स्वरूपांत आम्ही राहतों, व्यापार करितों व आमच्या अस्तित्वाचें कारण तोच आहे. )

**श्रीरामानुज**—अचित् जें जड त्याच्याशीं बिलकुल संसर्ग नाहीं तें ब्रह्माचें श्रेष्ठ स्थान होय. धाम = प्रकाश असाही अर्थ करावा. आत्मा हा अपरिच्छिन्नज्ञानस्वरूपी ( अमर्यादज्ञानस्वरूपी ) आहे म्हणून त्याचा प्रकाश श्रेष्ठ आहे.

**द्वैतवादी**—धाम = स्वरूप.

**ज्ञानेश्वर**—**आकारा आलिया जयाचें । निराकारपण न वचे** ( जात नाहीं ) । **आकारलोपे न विसंचे** ( बिघडत नाहीं ) । **नित्यतागा ! ॥ ....जें निर्वाणीचें गौरव** ( महत्व ) । **जे निर्गुणाची जाणीव । जें सुखाची राणिव** ( राज्य ) । **निराशांसी** ( निस्पृहांस ) ॥ **जें संतोषिया वाढिलें ताट । जें आचिंता** (चिंताशून्यास) **अनाथाचें मायपोट । भक्तीसी उजु वाट । जया गांवा ॥ ....पै गेलिया जया गांवा । तो ठावोचि होइजे ॥ हिंवाचिया** ( थंडीच्या ) **झुळुका । जैसें हिंवचि पडे उष्णोदका । कां समोर आलिया अर्का । तमाचि प्रकाश होय ॥** स्वस्वरूप प्राप्त कसें होतें हें दाखविण्यास वरील दृष्टांत वर्णनीय आहेत..... **म्हणोनि तूप होउनि माघौते । जेवीं दुधपणा न येचि निरुतें** ( पुनः ) । **तेवीं पावोनिया जयातें । पुनरावृत्ति नाहीं ॥ तरी अग्नीमाजीं आलें । जैसें इंधन अग्नीचि झालें । पाठीं** ( फिरून ) **न निवडेचि कांहीं केलें । काष्ठपण ॥ नातरी साखरेचा माघौता । बुद्धिमंतपणें ही करितां । परि ऊंस नव्हे पंडुसुता ! । जियापरी ॥** समजलें पुनरावृत्ति कशी होत नाहीं ती ?

**पंडितांस** ‘ तें माझें श्रेष्ठ घर आहे ’ येथें सगुणब्रह्माचा उल्लेख आहे असें वाटतें. **सगुणीं ज्ञानिया भक्ति । ते अनन्यभक्ति दे**

सगुण मुक्ति । त्या सगुण मुक्तीची अभिव्यक्ति । वैकुंठलोकीं मग नित्य ॥ २१ ॥

तल्लब्धेरुपाय उच्यते—

याच्या प्राप्तीचा उपाय सांगतातः—

**पुरुषः स परः पार्थ**
**भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ॥**
**यस्यान्तःस्थानि भूतानि**
**येन सर्वमिदं ततम् ॥ २२ ॥**

**पार्थ** ( अर्जुना ! ) **सः परः पुरुषः अनन्यया भक्त्या लभ्यः** ( हा जो परम पुरुष, परमात्मा, व्यक्ताव्यक्ताहून विलक्षण असा परमात्मा आहे, तो एकनिष्ठ व निष्काम भक्तीनें मात्र वश होण्यासारखा आहे. ) **यस्य अंतःस्थानि भूतानि** ( ज्यामध्यें हीं सर्व चराचर अनंत विश्वें आहेत, ज्यामध्यें सर्व विश्वांचा अंतर्भाव होतो )--आणि --**येन इदं सर्वं ततं** ( जो सर्वांच्या अंतर्यामीं भरलेला आहे. )— सारांश सर्व विश्वांस कवळणारा व सर्व विश्वांच्या अंतर्यामीं, एवंच अंतर्बाह्य असणारा जो परम पुरुष आहे त्याची प्राप्ती करून घेण्यास ज्ञानपूर्वक एकनिष्ठ व निष्काम भक्ति हाच एक उपाय आहे. हा अंतरंग उपाय होय. ( याच अध्यायांतील १४ श्लोक पहा. )

पुरुषः पुरि शयनात्पूर्णत्वाद्वा स परः पार्थ परो निरतिशयो यस्मात्पुरुषान्न परं किंचित्स भक्त्या लभ्यस्तु ज्ञानलक्षणयाऽनन्ययाऽऽत्मविषयया । यस्य पुरुषस्यान्तःस्थानि मध्यस्थानि कार्यभूतानि भूतानि । कार्यं हि कारणस्यान्तर्वर्ति भवति । येन पुरुषेण सर्वमिदं जगत्ततं व्याप्तमाकाशेनेव घटादि ॥ २२ ॥

पुरि म्हणजे देहनगरी इच्यामध्यें निजणारा, अंतर्यामीपणानें वास करणारा असा पुरुष शब्दाचा अर्थ करावा, किंवा रसत्वानें पूर्ण आहे

म्हणून पुरुष असाही करावा. असो; हा पुरुष पर म्हणजे अति-श्रेष्ठ आहे; याच्याहून दुसरें कांहींही श्रेष्ठ नाहीं. या परमपुरुषाची प्राप्ति करून घेणें असेल तर ज्ञानस्वरूपी भक्तीनें मात्र—

**शिष्य**—' भक्ति ' इतकाच मूळांत उल्लेख आहे. ज्ञानयुक्त किंवा ज्ञानस्वरूपी भक्ति असे शब्द नाहींत. कर्म, योग, सांख्य इत्यादि-कांनीं ईश्वरप्राप्ति होत नाहीं हें मला कबूल आहे.

**गुरु**—पूर्ण ज्ञानावांचून खरी भक्तीच होणें शक्य नाहीं. पदा-र्थाचें पूर्ण स्वरूप समजलें तरच त्यावर आपली खरी, निश्चल व एकाग्र भक्ति उत्पन्न होईल. तेव्हां भक्तीला ज्ञानाचें साहाय्य हवेंच आहे. असो; ही भक्ति अनन्य म्हणजे एकाग्र असावी. या भक्तीचा विषय आत्मा हाच असावा. परमात्मस्वरूप मिळवावयाचें आहे तर आत्मभक्ति ज्ञानपूर्वकच केली पाहिजे. उपास्य-उपासक-भेद सुद्धां नष्ट केला पाहिजे. हा पुरुष, परमात्मा कसा आहे ? तर त्याच्या-मध्यें, त्या आदिकारणामध्यें सर्व कार्यें, सर्व चराचर वस्तु अंतर्भूत झाल्या आहेत. बींमध्यें जसें सर्व झाड गुप्तरूपानें अंतर्लीन असतें, त्याप्रमाणें कारणामध्यें सर्व कार्यें गुप्तरूपानें किंवा बीजरूपानें असतात. तसेंच ह्या पुरुषानें सर्व जगतें व्यापून टाकिलीं आहेत. आकाश जसें घटाच्या आंतबाहेर असतें त्याप्रमाणें हा परमात्मा सर्व स्थिर-चर व्यापून राहिला आहे.

**प्रपाकार**—' **एतावानस्य महिमातो ज्यायांश्च पूरुषः** '

**मधुसूदन**—' **यस्मात्परं नापरमस्ति किञ्चि। द्यस्मा न्नाणीयो न ज्यायोऽस्ति कश्चित् ॥ वृक्ष इव स्तब्धो दिवितिष्ठत्येक । स्तेनेदं पूर्णं पुरुषेण सर्वम् ॥**

( ज्याहून पर किंवा अपर, लहान किंवा मोठें कांहीं नाहीं; जो स्थाणूप्रमाणें निश्चल असून एकच आहे त्यानें हें संपूर्ण जगत् भरून टाकिलें आहे. ) तो सर्वत्र ओतप्रोत भरला आहे. शंकरानंदाचा विस्तार तज्ज्ञांनी अवश्य वाचावा.

**द्विवेदी**—अपरोक्षानुभव म्हणजे भक्ति. ' मीच ब्रह्म ' हा अप-रोक्षानुभव होय. असो; ब्रह्मसत्ताच आभासात्मक विश्वाच्या उत्पत्ति

स्थितिलयास कारण आहे. ही सत्ता नसेल तर भासही नसणार आणि भासद्रष्टाही नसणार!

**द्वैतवादी**—' अनन्य ' शब्दानें शुद्ध भक्ति घेतात.

**ज्ञानेश्वर—....रावो पहुडलिया सुखें । जैसा देशीचा व्यापार न ठके** (थांबत नाहीं) **। प्रजा आपुलालेनि अभिलाखें** (इच्छेनें) **। करितीच असती ॥ याप्रमाणें पुरुष** (आत्माराम) कांहीं करित नाहीं.....**प्रकृती पतिव्रते । पडिला एकपत्नीव्रतें । येणें ही कारणें जयातें । पुरुष ह्मणोये ॥ २२ ॥**

**प्रकृतानां योगिनां प्रणवावेशितब्रह्मबुद्धीनां कालान्तरमुक्तिभाजां ब्रह्मप्रतिपत्तय उत्तरो मार्गो वक्तव्य इति यत्र काल इत्यादि विवक्षितार्थसमर्पणार्थमुच्यते । आवृत्तिमार्गोपन्यास इतरमार्गस्तुत्यर्थः--**

'**परंच अपरंच ब्रह्म यत् ओंकारः**' या न्यायानें प्रणव (ॐ) हेंच ज्यांचें ब्रह्मसंबंधीं प्रतीक आहे असे वादविषयक सगुणब्रह्मवेत्ते योगी आहेत. यांस मुक्ति मिळणार ती क्रममुक्तीच्या, द्वारें; मिळणार. ह्यांचा मार्ग कोणता तर उत्तरमार्ग, अर्चिरादिमार्ग आहे, असें सांगण्यासाठीं पुढील ग्रंथाची (२३ श्लोकापासून पुढील श्लोकांची) योजना आहे. आतां दक्षिणमार्गाचा, आवृत्तिमार्गाचा, जो उल्लेख केला आहे तो केवळ उत्तरमार्गाचें स्वरूप तत्क्षणीं मनांत भरावें, उत्तरमार्गाची स्तुति व्हावी एतदर्थ आहे—

> **यत्र काले त्वनावृत्ति-**
> **मावृत्तिं चैव योगिनः ॥**
> **प्रयाता यान्ति तं कालं**
> **वक्ष्यामि भरतर्षभ ॥ २३ ॥**

**भरतर्षभ** (भरतकुलश्रेष्ठा अर्जुना!) **प्रयाताः योगिनः यत्र काले आवृत्तिं च अनावृत्तिं एव यान्ति तं कालं वक्ष्यामि**

( कोणत्या वेळीं योगी लोक देहत्याग करून गेले असतां पुनर्जन्म पावत नाहींत, व केव्हां देहत्याग करून गेले असतां पुनर्जन्म पावतात तो काळ, ती वेळ तुला सांगतों. भरतकुलश्रेष्ठा अर्जुना! लक्ष्य लावून ऐक )—

**यत्र काले प्रयाता इति व्यवहितेन संबंधः। यत्र यस्मिन्काले त्वनावृत्तिमपुनर्जन्माऽऽवृत्तिं तद्विपरीतां चैव। योगिन इति योगिनः कर्मिणश्चोच्यन्ते। कर्मिणस्तु गुणतः 'कर्मयोगेण योगिनाम्' इति विशेषणाद्योगिनः यत्र काले प्रयाता मृता योगिनोऽनावृत्तिं यान्ति यत्र काले च प्रयाता आवृत्तिं यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ॥ २३॥**

**शिष्य**—भगवन्! परमपुरुषप्राप्ति ज्ञानानें मात्र होते. ज्ञानाला फल अपेक्षित नाहीं. विद्वान पुरुष जन्मत नाहीं, मरत नाहीं, असें श्रुतीच सांगते. असें असतां आपण मुक्तिमार्ग, मुक्तिफल, इत्यादि गोष्टी सांगत आहात, याचा काय अर्थ?

**गुरु**—अरे! सगुणोपासकांसाठीं, ज्यांस क्रममुक्तिमार्गानें जाणें अवश्य आहे त्यांच्यासाठीं ही मीमांसा आहे. जीवन्मुक्तासाठीं हा प्रस्तुतचा विचार नाहीं.

**शिष्य**—बरें! पण येथें कालाचा विचार कशाला?

**गुरु**—काल सांगितला म्हणजे सगुणब्रह्माचें ध्यान इत्यादि सांगितल्यासारखेंच होतें. असो; येथें 'योगी' शब्दाचा अर्थ कर्मयोगी असा घ्यावयाचा. हा अर्थ लाक्षणिक आहे, वाच्य नव्हे; तथापि बरोबर आहे असें '**कर्मयोगेण योगिनाम्**' या तिसऱ्या अध्यायांतील तिसऱ्या श्लोकावरून सिद्ध होतें. शिवाय ज्ञानयोग्यांस क्रममुक्तीची अवश्यकताही नाहीं. असो; तेव्हां हे योगी जेव्हां देहत्याग करितात तो काल कसा असावा, कोणत्या वेळीं देहत्याग केला ( झाला ) असतां काय फल होतें, तें सांगतातः म्हणजे कोणत्या वेळीं देहत्याग झाला तर पुनर्जन्म प्राप्त होतो व तद्विपरीत परिणाम म्हणजे पुनर्जन्म केव्हां होत नाहीं; याचें स्पष्टीकरण करितात.

**मधुसूदन**—देवयानमार्गानें जाणाऱ्यांपैकीं ज्या जीवांस ज्ञान होत नाहीं, ते मात्र पुनः मृत्युलोकीं परत येतात; म्हणून १६ व्या श्लोकांत सर्व लोक चक्राकार फिरत असतात, असें म्हटलें.

**पर्वते**—यांचे व्याख्यान अवश्य वाचावें. दक्षिणायनांत मेला म्हणजे परत येतो, व उत्तरायणांत मेलेला मनुष्य परत येत नाहीं असा वरील श्लोकाचा अर्थ नव्हे. तर प्राणोत्क्रमण झाल्यावर उत्तरायणाच्या अभिमानिनी देवता ज्या मार्गावर अध्यक्ष आहेत त्या अग्नि, प्रकाश, इत्यादि देवतांनीं दाखविलेल्या मार्गानें जाणारा मनुष्य परत येत नाहीं असा अर्थ घ्यावा.

**चतरजी**—'काल = भिन्नत्वाचें कारण.' ज्ञानविज्ञानवंत पुरुषाला कालाचा प्रश्नच नाहीं, कारण तो मरत नाहीं.

**श्रीरामानुज**—काल = मार्ग.

**पंडित**—यत्र = ज्या मार्गानें. काल = ज्या काळीं. तत्र = त्या मार्गानें व त्या काळीं. असा अर्थ केला असतां पुढील अर्थाची संगति चांगली लागते असें यांचें म्हणणें आहे.

**डेव्हिड**—२३ पासून २७ पर्यंतचे पांचही श्लोक 'क्षेपक' असावे असें समजतात. आत्मप्रवासाचा मार्ग हिंदूंशिवाय इतरांस समजणें प्रायः दुर्घटच होय.

**तेलंगासही** 'अग्नि' व 'काल' यांचा स्वर्गमार्गाशीं काय संबंध आहे हें समजत नाहीं. **टामसन** हे या श्लोकांचा लाक्षणिक अर्थ करितात. सूर्य = ब्रह्म; चंद्र = इतर देवता. हा विषय समजून घेण्यासाठीं Esoteric Buddhism by Mr. Sinnett हें पुस्तक जिज्ञासूंनीं वाचावें. ॥ २३ ॥

**तं कालमाह**—

तो काळ सांगतात—

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः**
**षण्मासा उत्तरायणम् ॥**

तत्र प्रयाता गच्छन्ति

ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥ २४ ॥

**अग्निः**, ज्योतिः, अहः, शुक्लः, **षण्मासाः उत्तरायणं**, ( अग्नि, सूर्यप्रकाश, दिवस, शुक्लपक्ष आणि उत्तरायणांतील सहा महिने ) **तत्र प्रयाताः ब्रह्मविदः जनाः** ( त्या वेळीं देहत्याग केलेले परोक्षानुभूतीचे ब्रह्मवेत्ते लोक ) **ब्रह्म गच्छन्ति** ( ब्रह्मप्रत–क्रममुक्तिपंथानें जातात. ) अर्थ स्पष्ट आहे.

अग्निः कालाभिमानिनी देवता तथा ज्योतिर्देवतैव कालाभिमानिनी । अथवाऽग्निज्योतिषी यथाश्रुते एव देवते । भूयसां तु निर्देशो यत्र काले तं कालमित्याम्रवणवत् । तथाऽहर्देवताऽहः शुक्लः शुक्लपक्षदेवता षण्मासा उत्तरायणं तत्रापि देवतैव मार्गभूतेति स्थितोऽन्यत्र न्यायः । तत्र तस्मिन्मार्गे प्रयाता मृता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो ब्रह्मोपासनपरा जनाः । क्रमेणेति वाक्यशेषः । न हि सद्योमुक्तिभाजां सम्यग्दर्शननिष्ठानां गतिरागतिर्वा क्वचिदस्ति " न तस्य प्राणा उत्क्रामन्ति " इति श्रुतेः । ब्रह्मसंलीनप्राणा एव ते ब्रह्ममया ब्रह्मभूता एव ते । ( क्रमेण तु गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ) ॥ २४ ॥

अग्नि ही कालाभिमानिनी देवता आहे, कालावर सत्ता चालविणारी देवता आहे; ह्याचप्रमाणें प्रकाशदेवता कालाभिमानिनी आहे. किंवा अग्नीची देवता अग्नि व कालाची देवता प्रकाश, असाच शब्दशः ( यौगिक अर्थही ) घ्यावा; व उभयतांचा अर्थ कालदेवता असाच घ्यावा. एखाद्या बागेत आंबा, पेरू, नारळ इत्यादि अनेक वृक्ष असून आंब्याचींच झाडें जास्त असलीं तर जसें ' आंब्याची बाग ' असें आपण नांव देतों, तसाच येथेंही कालाभिमानिनी देवतांचा पुष्कळ वेळ उल्लेख आहे म्हणून अग्निदेवतेसही कालदेवता असें म्हटलें; असो;

दिवसाची देवता, शुक्लपक्षाची देवता. व उत्तरायणांतील षण्मासांची देवता इत्यादि कालदेवताच आहेत. या सर्व देवता प्रत्येक जीवास त्यात्या जीवाच्या कर्मानुसार–उपभोग लोकाकडे नेतात. हाच न्याय, हाच विषय, ब्रह्मसूत्रांच्या तिसऱ्या पादाच्या चवथ्या सूत्रांत सांगितला आहे. असो; या मार्गानें जाणारे परोक्षज्ञानी व ब्रह्मोपासना करणारे लोक संवत्सरदेवता, देवलोकदेवता; इत्यादिकांनीं दाखविलेल्या देवमार्गानें मुक्तीस जातात.

**शिष्य**—काय मुक्तीस जातात?

**गुरु**—क्रमाक्रमानें चित्तशुद्धि होऊन ज्ञान झालेनंतर पूर्ण साक्षात्काराच्या वेळीं त्यास मुक्ति प्राप्त होते. क्रमानें त्यांस मुक्ति मिळते. आतां सद्योमुक्ति ज्यांस मिळते, सर्व अज्ञान नष्ट होऊन 'त्या परावराचे दर्शन' झाल्याबरोबर हृदयग्रंथीचा भेद, व सर्व संशयांचा उच्छेद होतो. सारांश ते मुक्त होतात. अर्थातच या मुक्तांस जन्म मरण, जाणेंयेणें, येरझारा, कराव्या लागत नाहींत. ज्यांस सम्यग्दर्शन झालें आहे, परमात्मसाक्षात्कार झाला आहे, त्यांस 'त्याचे प्राण बाहेर जात नाहींत' या श्रुत्यनुसार मरणच नसतें. कारण ह्या श्रुत्यधारें '**ब्रह्ममय वृत्ति झाली आतां काय उणें। अहंकार दग्ध झाला श्रीगुरूचें देणें** ॥ अशी स्थिति झालेल्या ब्रह्मज्ञ पुरुषाचे प्राण ब्रह्मांत लीन होतात, तें ब्रह्ममय होतात, किंबहुना ते प्राण ब्रह्मच होतात. सर्वव्यापी ब्रह्माला जाणेंयेणें शक्यच नाहीं. हें तुला सांगावयास नकोच. पण सगुणोपासकांस मात्र क्रममार्गानें जावें लागतें

**प्रपाकार, श्रीधर, मधूसूदन**—ईशावास्यांतील मंत्र देऊन शातपथी श्रुति सांगतात. ह्यांत क्रममुक्तीचा मार्ग सांगितला आहेः देवलोक, आदित्यलोक, वैद्युतलोक, आणि ब्रह्मलोक ( सत्यलोक ) असे लोकांतून निष्काम कर्म करणाऱ्या भक्तांचा लिंगदेह जातो व ज्ञान झाल्यावर मुक्त होतो.

**शंकरानंद**-हा अयनविभाग 'कर्मभेदापासून फलभेद उत्पन्न होतो' हें दर्शविण्यासाठीं सांगितला. अग्नि ही उत्तरायणाची अभिमानिनी देवता आहे.

**ज्ञानेश्वरचा** अभिप्राय असा दिसतो. अभ्यास करणाऱ्या पुरुषास **वर** सांगितल्या नियमानेंच मृत्यु येतो व तो मुक्त होतो **पर्वते** यांचा **अर्थ** बरा दिसतो. ॥ २४ ॥

**धूमो रात्रिस्तथा कृष्णः**
**षण्मासा दक्षिणायनम् ॥**
**तत्र चान्द्रमसं ज्योति-**
**र्योगी प्राप्य निवर्तते ॥ २५ ॥**

**धूमः, रात्रिः, तथा कृष्णः, षण्मासा दक्षिणायनम्** ( धूर, अंधकारमय रात्र, त्याचप्रमाणें वद्य पक्ष, दक्षिणायनांतील सहा महिने ) **तत्र** ( अशा कालांत ) **योगी चान्द्रमसं ज्योतिः प्राप्य निवर्तते** ( कर्मयोग्याला चंद्रसंबंधीं प्रकाश प्राप्त होतो व तो पुनः जन्मास येतो. )—अर्थ स्पष्ट आहे.

**धूम इति । धूमो रात्रिर्धूमाभिमानिनी रात्र्यभिमानिनी च देवता । तथा कृष्णः कृष्णपक्षदेवता । षण्मासा दाक्षिणायनमिति च पूर्ववद्देवतैव । तत्र चन्द्रमसि भवं चान्द्रमसं ज्योतिः फलमिष्टादिकारी योगी कर्मी प्राप्य भुक्त्वा तत्क्षयान्निवर्तते** ॥ २५॥

धुराची देवता, रात्रीची देवता, त्याचप्रमाणें वद्यपक्षाची देवता, दक्षिणायनांतील सहा महिन्यांची देवता, या सर्व देवताही देहत्यागानंतर जीवास मार्गदर्शक आहेत. कोणत्या जीवानें कोठें जावयाचें हें या देवतांस ठाऊक असून त्या तेथें तेथें अधिकारी असतात. असो; हे इष्टापूर्ति करणारे ( यज्ञयाग, कूपखनन, धर्मशालास्थापन, दान, इत्यादि करणारे ) योगी ( कर्म करणारे ) चंद्रलोकास जातात. पितृलोक, इंद्रलोक इत्यादिमध्यें जातात. हे सर्व भोगलोक आहेत. येथें आपआपल्या पुण्यांचा उपभोग घेऊन पुण्यक्षय झाल्यावर हे लोक मृत्युलोकांस पुनः परत येतात.

**प्रपाकार**—अवरोहाचा (खालीं येण्याचा) मार्ग श्रुत्याधारें सांगतातः पितृलोक, चंद्रलोक, देवांचें अन्न, आकाश, वायु, पर्जन्य, पृथ्वी, अन्न आणि शुक्ररेतादिद्वारां कीटादिकांमध्यें जन्म असा हा मार्ग आहे.

**श्रीधर, चतरजी**—निष्काम कर्मसहित उपासना केली म्हणजे क्रममुक्ति, मिळते. काम्यकर्मानें (शास्त्रविहित) स्वर्गभोगादिकांनंतर पुनर्जन्म येतो; आणि निषिद्ध कर्मानें नरकवासानंतर पुनर्जन्म येतो अशी व्यवस्था आहे.

**शंकरानंद, मधुसूदन**—म्हणून देवयानमार्ग श्रेष्ठ आहे. पितृयानमार्ग कनिष्ठ आहे.

**शुक्लकृष्णे गती ह्येते**
**जगतः शाश्वते मते ॥**
**एकया यात्यनावृत्ति-**
**मन्ययाऽऽवर्तते पुनः ॥ २६ ॥**

हि (श्रुतिस्मृतींमध्यें हें प्रसिद्धच आहे कीं) **एते शुक्लकृष्णे जगतः शाश्वते गती मते** (ह्या शुक्ल व कृष्ण अगर प्रकाशवंत व अप्रकाशवंत (ज्ञानवंत व अज्ञानवंत) अशा विश्वाच्या परस्परविलक्षण गति नित्य आहेत असें ठरलेलें आहे.) **एकया अनावृत्तिं याति** (एकीनें, देवमार्गानें, गेला तर पुनर्जन्म येणार नाहीं अशा गतीला जीव जातो) **अन्यया पुनः आवर्तते** (दुसऱ्या गतीनें चंद्रमार्गानें गेला तर पुनः मृत्युलोकीं येतो.)

शुक्लेति । शुक्लकृष्णे शुक्ला च कृष्णा च शुक्लकृष्णे । ज्ञानप्रकाशकत्वाच्छुक्ला तदभावात्कृष्णा । एते शुक्लकृष्णे हि गती जगत इत्याधिकृतानां ज्ञानकर्मणोर्न जगतः सर्वस्यैवैते गती संभवतः । शाश्वते नित्ये संसारस्य नित्यत्वान्मते अभिप्रेते तत्रैकया शुक्लया यात्यनावृत्तिमन्ययेतरयाऽऽवर्तते पुनर्भूयः ॥२६॥

ह्या शुक्ल कृष्ण अशा ज्या गती आहेत—

**शिष्य**—'शुक्ल कृष्ण' अशीं नांवें कां दिलीं?

**गुरु**—प्रकाश ह्मणजे ज्ञान व विद्या ज्यांत प्रकट होतात तो शुक्लमार्ग व अंधार ह्मणजे अज्ञान व अविद्या ज्यांत प्रकट होतात तो कृष्णमार्ग; ज्ञानमार्ग प्रकाशवंत आहे ह्मणून त्यास शुक्ल म्हणतात. अज्ञानमार्ग अंधारपूर्ण आहे म्हणून कृष्णमार्ग; अशीं त्यांस नांवें दिलीं. असो; हे शुक्लकृष्ण असे जे दोन मार्ग आहेत ते अधिकारानुसार जीवांस मात्र प्राप्त होतात. सगुण विद्येचे ज्ञानी असतील ते शुक्ल मार्गानें जातात; अज्ञानी कर्मठच जे नुसते असतात ते कृष्णमार्गानें जातात. एवंच ज्ञानी व कर्मठ अशा जीवांसंबंधेंच हे मार्ग आहेत. नास्तिक, स्याद्वादी, दांभिक, वाममार्गी व जड वस्तू यांस हा संबंध नाहीं. येथें जगत् म्हणजे कर्माधिकारी मनुष्यप्राणी होत. आतां हे मार्ग नित्य आहेत असें ठरतें; कारण संसारच नित्य आहे. असो; शुक्ल मार्गानें जाणारा पुनः मृत्युलोकीं येत नाहीं; इतर मार्गानें गेलेला जीव पुनश्च मृत्युलोकांस येतो.

**पर्वते**—अंतःकरणांतील आकाशांत ब्रह्म आहे असें समजून त्याची उपासना करणारे दहरोपासकही देवयानमार्गानें जातात.

**ज्ञानेश्वरदृष्टांत** पहा : **पाहे पां नाव देखतां बरवी । कोणी आड घालवी काय अथांवी ?** ( खोल डोहांत ) **। कां सुपंथ जाणोनि अटवी** ( आड रानांत ) **। रिगवत असे ? ॥ जो विष अमृत ओळखे । तो अमृत काय सांडूं शके ? । तेवीं जो उजू वाट देखे । तो अव्हांटा** (आड रानांत) **न वचे ॥** तसेंच ज्ञानेश्वर सांगतात कीं जन्मादारभ्य अभ्यास करावा म्हणजे मरणसमयीं भ्रांति पडत नाहीं.

**पंडित**—उत्तरायणीं मृत्यु आला तर ज्ञानी मुक्त होतो; तोच दक्षिणायनांत मेला तर पुनर्जन्म पावून पुनः मोक्षास जातो. आचार्यांच्या उलट ही पंडितांची स्वारी आहे. पंडितांस कर्मठपणाचा, सगुणाचा व आपल्या पांडित्याचा अभिमान फार म्हणून परंपरागत भाष्यकारांचा व टीकाकारांचा जेथें तेथें मानभंग करण्याचें व्रत यांनीं

अंगीकारलेंसें दिसतें. यांस अद्वैत सिद्धांत मान्य असून, तथापि सगुणोपासना प्रियतर आहे; आणि प्रत्येक ठिकाणीं सगुणोपासनाविस्तार करण्याचा जणूंकाय यांनीं विडाच उचलिला आहे. या षट्कांत तर असे प्रसंग पुष्कळच येणार; तेव्हां १२ व्या अध्यायाच्या शेवटीं या मताचा विचार करूं. पंडितांच्या मताचें सार पहा:--

**निर्गुणज्ञान सगुणभक्ति । आणि परमपुरुषार्थ सगुणमुक्ति । ऐसी गीता भगवदुक्ति । सार सकळा वेदांचें ॥ २६ ॥**

**नैते सृती पार्थ जान-**
**न्योगी मुह्यति कश्चन ॥**
**तस्मात्सर्वेषु कालेषु**
**योगयुक्तो भवार्जुन ॥ २७ ॥**

**पार्थ** ( अर्जुना ! **एते सृती जानन्** ( हे दोन मार्ग ज्यास पूर्णपणें अवगत झाले आहेत ) **कश्चन योगी न मुह्यति** ( तो कोणताही योगी कधींही मोह पावत नाहीं. वासनायुक्त होत नाहीं. ) **तस्मात् सर्वेषु कालेषु अर्जुन योगयुक्तः भव** ( म्हणून हे अर्जुना ! सदा योगयुक्त ऐस; योगाभ्यासांत रत हो. )

**नैते इति । नैते यथोक्ते सृती मार्गौ पार्थ जानन्संसारायैकाऽन्या मोक्षाय चेति योगी न मुह्यति कश्चन कश्चिदपि । तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तः समाहितो भवार्जुन॥२७॥**

हे दोन परस्परविलक्षण मार्ग व त्यांचीं फलें ज्यास पूर्णपणें अवगत झालीं, शुक्ल मार्ग क्रम मुक्तीप्रत नेतो, कृष्णमार्ग संसारांत नेऊन ढकलतो, हें ज्ञान ज्यास उत्तम झालें आहे अशा योग्याला केव्हांही मोह उत्पन्न होत नाहीं. आणि ह्मणून तो कधींही कामपूर्वक कर्म करित नाहीं. आणि म्हणूनच तो कधींही संसारचक्रांत अडकत नाहीं. सारांश त्याचें अज्ञान, कामुकता व अभिमान

विगलित होतात. म्हणून हे अर्जुना ! तूं योगाभ्यास करून समाधिनिष्ठ होशील, चित्ताला समाधान होईल, असें कर; सारांश कोणतेंही काम करित असतां जीवब्रह्माचें ऐक्य विसरूं नको.

**चतरजी**—योग्यास केव्हांही मोह होत नाहीं, कारण त्यास निष्काम कर्माचें, सकाम सत्कर्माचें व निषिद्ध कर्माचें, सारांश सर्व कर्मांचें व ज्ञानाचें फल विदित असतें.

**श्रीरामानुज**—' योग्यास मरणकालीं मोह उत्पन्न होत नाहीं. ' वरील चतरजींचा अर्थ सयुक्तिक नव्हे काय ?

**द्वैतवादी**—सृती ज्ञात्वातु सोपाये अनुष्ठायच साधनं । नकश्चिन्मोहमाप्नोति नचान्या तत्रवैगतिः ॥ किती समानार्थक श्लोक आहे हा ? मोह = विष्णूचें विस्मरण.

ज्ञानेश्वरांचा निश्चय पहा—आतां देह असो वा जावो । आम्ही तों केवळ वस्तूचि आहों । कां जें दोरीं सर्पत्व वावो ( व्यर्थ ) । दोराचिकडुनी ॥ मज तरंगपण असे कीं नसें । ऐसें हें उदकाप्रति कें भासें ? । तें भलतेव्हां ( केव्हांही ) जैसें । उदकची ॥ तरंगाकारें न जन्मेची । ना तरंग लोपे निमेची । तेवि देहीं जे देहेचि । वस्तु जाहालें ॥ आतां शरीराचें तया ठायीं । आडनांवही उरलें नाहीं । तरी कोणें काळें काई । निमे तें पाहे पां ! ॥ २७ ॥

शृणु योगस्य माहात्म्यम्—
योगाचें माहात्म्य ऐक:—

वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव
दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ॥
अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा
योगी परं स्थानमुपैति चाऽऽद्यम् २८

**इति श्रीमहाभारते श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे तारकब्रह्मयोगो नामाष्टमोऽध्यायः ॥८॥**

**वेदेषु, यज्ञेषु, तपःसु च एव, दानेषु यत् पुण्यफलं प्रदिष्टं** (वेदांमध्यें, यज्ञामध्यें, तपांमध्यें आणि तसेंच दानांमध्यें जें पुण्यफल सांगितलें आहे, यज्ञयागादि केलें असतां जें पुण्य मिळतें म्हणून सांगितलें आहे) **तत् सर्वं इदं विदित्वा योगी अत्येति च परं आद्यं स्थानं उपैति** (तें सर्व फल,—हें मागें सांगितलेलें सप्तप्रश्नात्मक उत्तराचें ज्ञान प्राप्त झालें असतां—योगी मागें टाकितो म्हणजे हीं सर्व फलें त्यास तुच्छ वाटतात आणि तो सर्वश्रेष्ठ आणि आदिकारण असें जें ब्रह्म त्याप्रत क्रमानें प्राप्त होतो.) अर्थ स्पष्ट आहे.

याप्रमाणें तारकब्रह्मयोगाचें मूळ संपलें.

**वेदेषु सम्यगधीतेषु यज्ञेषु च साद्गुण्येनानुष्ठितेषु तपःसु च सुतप्तेषु दानेषु च सम्यग्दत्तेषु यदेतेषु पुण्यफलं पुण्यस्य फलं पुण्यफलं प्रदिष्टं शास्त्रेणात्येत्यतीत्य गच्छति तत्सर्वं फलजातमिदं विदित्वा सप्तप्रश्ननिर्णयद्वारेणोक्तं सम्यगवधार्यानुष्ठाय योगी परं प्रकृष्टमैश्वरं स्थानमुपैति प्रतिपद्यते आद्यमादौ भवं कारणं ब्रह्मेत्यर्थः ॥ २८ ॥**

**इति श्रीत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीमद्भगवद्गीताभाष्ये तारकब्रह्मयोगो नामाष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥**

वेदांचें अध्ययन सांगोपान उत्तम तऱ्हेनें केलें, सर्व सामग्री मिळवून यथासांग असे यज्ञ सात्विकबुद्धीनें केले, उत्तम प्रकारची शारीरिक व मानसिक उग्र उपश्चर्या केली व सत्पात्रीं दानें यथाशास्त्र दिलीं असतां जें पुण्य उत्पन्न होतें व त्याचें फल मिळतें असें शास्त्रांत सांगितलें आहे, तीं पुण्यें व तीं सर्व फलें टाकून देतो, तीं फळें तुच्छ आहेत. असा याचा निश्चय होतो.

**शिष्य**—केव्हां!

**गुरु**---अध्यायाच्या आरंभीं ब्रह्म म्हणजे काय इत्यादि जे सात प्रश्न केले आहेत, त्यांचा निर्णय करित असतां जें व्याख्यान केलें आहे, तें पूर्णपणें समजून घेऊन, निश्चित करून, जेव्हां आचरणांत दिसूं लागतें, तेव्हां हीं सर्व फलें तृणवत् भासूं लागतात आणि सर्वैश्वर्य-संपन्न असें जें परम श्रेष्ठ ब्रह्मस्थान तेथें तो जातो. ब्रह्म हेंच आदि-कारण आहे. तें समजून उत्पत्तिविनाशशून्य, कारणरूपच जीव झाला म्हणजे पुरुषार्थ साध्य होऊन तो पुरुष मुक्त होतो.

**तारकब्रह्म भाष्य संपलें.**

प्रपाकाराचें तात्पर्य सप्तप्रश्नांचा निर्णय हेंच आहे.

**श्रीधरः**---' ८ प्रश्न आहेत ' असें म्हणतातः दुसऱ्या श्लोकांत ' या देहामध्यें कोण आहे व तो कसा वास करितो ? ' हा यांचा आठवा प्रश्न आहे. परंतु, या प्रश्नांस उत्तर दिलें नाहीं व सहाव्या प्रश्नांतच याचा अंतर्भाव होतो म्हणून खरोखर ७ प्रश्न आहेत.

**तात्पर्यः**---**अष्टमेऽष्टऽविशिष्टेष्टसंपृष्टार्थाष्टनिर्णयैः अक्लिष्टमिष्टया-माप्तिः स्पष्टिताष्टमवर्त्मना ।** ( आठव्या अध्यायांत आठ इष्ट प्रश्न व त्यांची आठ निश्चित उत्तरें आहेत. शिवाय आठवा अवतारी पुरुष जो कृष्ण त्यानें सुलभ असा परमपुरुषार्थाचा मार्ग सांगिला आहे. ) आहे कीं नाहीं येथें ' ष्ट ' काराची गर्दी !

**द्विवेदी, पर्वते**---या अध्यायांत 'तत्' (ब्रह्म) पदाचें निरूपण केलें व त्या ब्रह्माची अधिकारपरत्वें सगुणोपासना व निर्गुणोपासना सांगितली.

**द्वैतवादी**---**मार्गौ ब्रह्मच यः पश्येत्साक्षादेवाऽपरोक्षतः ।**
**सर्वपुण्यातिगोऽमुह्यन्यात्यसौ ब्रह्मतत्परम् ॥**

( ज्याला ब्रह्माचें व दोन्ही मार्गांचें ज्ञान साक्षात् झालें तो अत्यंत पुण्यवंताच्या पलीकडचा पुण्यश्लोक होऊन ब्रह्मस्वरूपाकडेच जातो. त्याला कसलाही मोह प्राप्त होत नाहीं. )

**पंडितः**--तात्पर्यः **सर्वदा स्वचरणस्मरणाय । पार्थमादिशतिस्म रणाय ॥ यद्गतस्य नहि संसृतिचक्रं । तं स्मरामि सततं धृत-चक्रम् ॥ २८ ॥**( सर्वदा भगवत्स्मरण करून कर्तव्यतत्पर ऐस असा भगवंतांनीं पार्थाला उपदेश केला. ज्या चक्रपाणी श्रीविष्णूला शरण गेलें असतां संसारचक्राचा ताप होत नाहीं त्या भगवंताचें मी स्मरण करितों. )

# अध्याय आठवा.

## उपसंहार.

आठव्या अध्यायाचें व्याख्यान दुय्यम प्रतीच्या भक्तांसाठीं आहे. या भक्तांचा अहंकार व प्रापंचिक वासना ही जोडी अद्यापि नष्ट झालेली नसते. तथापि शमदमादिक सात्विक संपत्तीच्या साहाय्यानें रजोगुण व तमोगुण यांचा प्रायशः अस्तच झालेला असतो आणि म्हणूनच वेदांतग्रंथांवर या भक्तांची निःसीम श्रद्धा असून ध्यानधारणेमध्यें हे प्रवीण असतात. असो; गेल्या अध्यायाच्या उपसंहार समयीं सांगितल्याप्रमाणें यांस परोक्षज्ञान झालें असतें; परंतु अपरोक्षविज्ञान अगर साक्षात्कार झालेला नसतो. असो; तेव्हां यांच्या पुरुषार्थास उपयोगी असा मार्ग प्रस्तुतच्या व्याख्यानांत उपदेशिला आहे.

२ अध्यायाच्या आरंभीं जे सात प्रश्न उत्पन्न केले आहेत व त्यांचीं जीं उत्तरें दिलीं आहेत, त्या सर्वांचें एकनिष्ठतेनें अनन्यचिंतन केलें असतां योग्यवेळीं अपरोक्षानुभव अथवा साक्षात्कार होईल यांत शंका नाहीं. हाच हेतु मनांत आणून हे प्रश्नसप्तक निर्माण केलें आहे. श्रवणमननानंतर या अखिल प्रश्नोत्तरमालिकेचा अखंड निदिध्यास एकनिष्ठेनें केला असतां अंतःकरणांत प्रकाश फांकून तें स्वतःच ब्रह्ममय होऊन जाईल. आपला आत्मा ब्रह्मस्वरूपच होता, आहे व असेल हें खरें आहे. म्हणून वरील वाक्याचा अर्थ इतकाच घ्यावयाचा कीं ज्या ब्रह्मस्वरूपाच्या प्रत्ययाला आपण आपल्या वासनाजन्य अज्ञानानें पराङ्मुख झालों होतों, तो प्रत्यय जसजसें अज्ञान नष्ट होत जात असतें, तसतसा स्वस्वरूपमय होत असतो. अत्यंत जड अवस्थेंतून अत्यंत चैतन्यावस्थेमध्यें जाणें हा मोक्षाचा मार्ग आहे. जावत्कालपर्यंत विषयभान आहे, तोंपर्यंत जडसंयोग सुटला नाहीं, असें समजावयाचें. पूर्णचैतन्यावस्थेंत विषयभान नाहीं. असो; तेव्हां ब्रह्मस्वरूपास जाऊन मिळावयाचें याचा अर्थ आपलें जें अज्ञान ( मर्यादित ज्ञान ) असतें तें क्रमशः

नाहींसें करून अमर्यादज्ञान संपादन करावयाचें; आणि शेवटीं ह्या ज्ञानाज्ञानापलीकडे जाऊन परब्रह्मस्वरूप व्हावयाचें हाच पुरुषार्थ आहे. वरील दुय्यमप्रतीच्या उपासकांस हें अज्ञेयज्ञान होणें दुःसाध्य आहे, म्हणून परमेश्वरानें या श्रद्धालु भक्तांसाठीं पुढील व्याख्यानांत त्यांस समजेल असें परमेश्वरस्वरूप वर्णून त्यांनीं कोणत्या मार्गानें जावें हेंही सांगितलें आहे.

## प्रश्नसप्तक.

३ (१) ब्रह्म ह्मणजे काय? (२) अध्यात्म (३) कर्म (४) आधिभूत (५) आधिदैव व (६) अधिदैव ह्मणजे काय? आणि (७) मरणकाळीं परमेश्वराचें ध्यान कसें करावें? हे वरील सात प्रश्न होत. पहिला प्रश्न पहिल्या ज्ञानविज्ञानी भक्तांसाठीं आहे व बाकीचे प्रश्न दुय्यम प्रतीच्या भक्तांसाठीं आहेत.

## उत्तरसप्तक.

४ **ब्रह्माचे** अपरब्रह्म आणि परब्रह्म, सगुण ब्रह्म आणि कैवल्य-ब्रम्ह (निर्गुणब्रह्म), असे दोन प्रकार भक्तांच्या ज्ञानमर्यादेनें उत्पन्न होतात. निर्गुण ब्रह्माचें लक्षण निषेधाच्या द्वारें मात्र सांगतां येतें. ' ज्याचा नाश नाहीं ' या येवढ्याशा निषेधात्मक लक्षणानें सर्व प्रकारचे गुणांचा निरास होऊन बाकी ' जें एक अथवा एकच, किंवा अद्वितीय एकच आहे ' अशा ब्रह्माचा परोक्षतः (व्यतिरेकद्वारा) निर्देश होतो. आतां ज्याला शास्त्रविज्ञान उत्तम होऊन अपरोक्षानुभूति झाली आहे, त्याला हें लक्षण उत्तम रीतीनें समजेल; म्हणजे ह्या लक्ष-णानें समजणाऱ्या, दिग्दर्शन झालेल्या, वस्तूचें ज्ञानविज्ञान उत्तम होईल. पण आपल्या सारख्या सामान्य मनुष्यांस किंवा शास्त्रमात्रपा-रंगत वेदांत्यासही तें समजणार नाहीं. येथें हें लक्षण देण्याचा हेतु इतकाच आहे कीं विषयाचें विषयत्व नाहींसें करून स्वस्वरूपास नेणारी मर्यादा कोणती आहे, हें सामान्यतः कळावें.

**अध्यात्म** ह्मणजे प्रत्यगात्मा आहे. ज्याच्या सत्तेनें आपण बोलतों, चालतों, विचार करितों, रागावतों; परंतु ज्यांस आपण सामान्य मनुष्यें ओळखीत नाहीं, इतकेंच नव्हे तर ज्याचा आपण प्रापंचिक. संसारी कधींही विचार करीत नाहीं, तो आपल्या शरीरांत वास्तव्य करितोसा

दिसणारा सर्वसाक्षी जीवात्मा होय. हा प्रत्यक्ष परमात्मस्वरूपच. असून सच्चिदानंदांची त्रयी याच्या सत्तेनेंच उत्पन्न होत असते. ह्याचें स्वरूप कोणतें आहे, याचा विचार पहिल्या सहा अध्यायांत केला आहेच. आतां इतकेंच सांगावयाचें आहे कीं, परमात्मा व हा प्रत्यगात्मा यांत भेद नसून ते उभयतांही एकच आहेत. हें सांगितलें म्हणजे अर्थातच दुय्यम प्रतीच्या भक्ताला ध्यानधारणेच्या योगानें आत्मस्वरूप समजून उमजेल आणि मग साहजिकच परमार्थानें परमात्मस्वरूप व पुढें ब्रह्म-स्वरूपही त्यास कळेल.

**कर्म** म्हणजे भूतांची उत्पत्ति करणारें तें. ह्यांत सात्विक, राजस व तामस या सर्व कर्मांचा अंतर्भाव होतो. सारांश कर्माच्या योगानें भेदाची, प्रपंचाची, उत्पत्ति होते, संसार कर्माच्याच योगें चालतो आणि निष्काम कर्माच्या योगानें संसाराचा नाश होतो. एवंच कर्म किंवा कर्म करण्यास लावणारें आपलें मन हें संसारास व संसारनाशास कारण आहे. कर्म करविणारें ज्ञान किंवा वासना असते. ज्ञानपूर्वक कर्म मोक्षदायी आहे, वासना युक्त कर्म प्रपंचांत घालविणारें आहे. एवंच सत्तारूपानें कर्माचें आधिपत्य परमात्म्याकडेच येतें.

**अधिभूत** म्हणजे विनाशी पदार्थांचें कालभंगुर अस्तित्व व त्या अस्तित्वाचें आधिपत्य होय. पदार्थांचे अस्तित्वाचा अधिपति परमात्माच आहे. ह्या दृष्टीनें म्हणजे 'क्षरांत (नाशवंत पदार्थांत) अक्षर (अवि-नाशी) पाहतां येऊं लागलें म्हणजे पुष्कळच कार्य झालें. सांख्याची प्रकृति जड आहे. परंतु वेदांतांतील वरील 'क्षरत्व' परमात्मस्वरूपी आहे असें ज्ञानदृष्टीनें पाहतां येतें व म्हणूनच सांख्यापेक्षां वेदांतमत श्रेष्ठ ठरतें.

**अधिदैवत** म्हणजे सर्व श्रेष्ठ ज्ञानाचें प्रकट स्वरूप होय. सांख्य मतां-तील पुरुष हा केवळ फलोपभोक्ता आहे. येथील पुरुषास ज्ञान आहे. व आपल्यास मुक्त करणारें कर्म करण्याचें स्वातंत्र्य (मनःस्वातंत्र्य) त्या पुरुषास आहे. या सर्व पुरुषांचा आधिपति, समष्टि व व्यष्टि स्वरूपानें राहणारा, सर्वव्यापी, तो अधिदैवत होय. अर्थात हिरण्यगर्भ स्वरूप तें हेंच होय.

**अधियज्ञ** म्हणजे यज्ञाधिपति. प्राणीमात्राच्या करवीं जें कर्म होत असतें तो एकप्रकारचा यज्ञ आहे आणि या यज्ञाचा अधिष्ठाता व अधि-

पति 'विष्णु' आहे हें तृतीय अध्यायांत स्पष्ट करून सांगितलेंच आहे. तात्पर्य हें कीं सर्व निष्काम कर्मांचें समर्पण भगवंतास केलें तर त्या कर्मास यज्ञस्वरूप येतें व निष्कामत्वाच्या कसाला तो कर्मयज्ञ जसजसा उतरेल तसतसें कर्मफल ही ईश्वरसत्तेनें मिळत जातें. म्हणजे अर्थातच निष्काम–कर्म–कर्ता सात्विक, पूर्ण सात्विक होत जातो; सकाम कर्मरूपी यज्ञ केला असतां प्राणी संसारांत पडतो. हें सर्व नियमन परमात्म्याच्या सत्तेनें होत आहे. म्हणून परमात्म्यास अधियज्ञ म्हटलें.

सारांश प्रपंच, विश्वव्यापार हा यज्ञ असून त्याचा अध्वर्यु परमात्मा आहे, अशा स्वरूपानें ईश्वराचें ध्यान केलें; किंवा आपल्या जीवास होणारें विषयज्ञान, वासना, विचार, अध्यात्म, या सर्वांचें आधिपत्य परमात्माच आहे, अशा स्वरूपानें त्या पुरुषोत्तमाचें ध्यान केलें; किंवा विनाशी वस्तूंमधील क्षणभंगुर आस्तित्व हें त्या अखंड आस्तित्वाची एक कला असून ती त्या अखंड आस्तित्वानें नियमित होत असते; असें समजून त्या विश्वपतीची आराधना केली; अगर; विश्वचक्रांत जें जें कर्म होत असतें त्याचा अध्यक्ष परमात्माच आहे असें समजलें व उपासनाव्रत सुरू केलें; अथवा आपल्यास वस्तुतः अपरोक्ष असणारा जो प्रत्यगात्मा तोच परमात्मा होय असें समजून व उमजून त्या परमात्मस्वरूपाचें एकनिष्ठ ध्यान केलें तथापि, फलश्रुति एकच आहे. जें जें ध्यान आपल्या अधिकारानुसार आपल्यास उपयोगाचें होईल, तें तें ध्यान अंगीकृत करून उपासना पंथ ज्ञानशुद्धमार्गानें वाढवावा एतदर्थ हीं निरनिराळीं स्वरूपें वर्णिलीं आहेत. ह्या सर्व भिन्नस्वरूपांत एकरसत्वच आहे. भिन्नत्व दिसतें याचें कारण आपलें अज्ञान म्हणजे माया हें होय- असो; तेव्हां अधिकारानुरूप या सत्यस्वरूपांपैकीं कोणत्याही स्वरूपानें जो माझें ध्यान करील त्याला सद्गति प्राप्त होईल व पुढें कालांतरानें सत्कर्म, निष्कामकर्म, करून शेवटीं ज्ञानी होऊन तो माझ्याच स्वरूपाला येऊन मिळेल यांत शंका नाहीं; ही भगवत्प्रतिज्ञा सर्वांनीं लक्ष्यांत ठेवावी.

'अंतकाळीं तुझें स्मरण कसें होईल व त्या स्मरणाचें स्वरूप कसें असावें ?' अशा अर्थाचा सातवा प्रश्न आहे. त्यास स्वरूपसंबंधानें वर उत्तर दिलेंच. आतां प्राणप्रयाणाच्या वेळीं स्मरण होण्याचें उत्कृष्ट

साधन म्हणजे इष्ट व उपास्यस्वरूपाचें अखंड चिंतन होय. कोणत्याही स्वरूपाचें अखंड चिंतन अहोरात्र केलें ( झालें ) असतां कीटकांस कोळ्याचें स्वरूप प्राप्त होतें, भरतास हरिणरूप मिळालें इत्यादि उदाहरणांवरून उपास्यस्वरूपाची प्राप्ति होते हें अनुभवसिद्ध आहे. मन आणि बुद्धी यांची तंद्री अनन्य भावानें एकाच विषयाकडे लागून राहिली म्हणजे तन्मयता, तादात्म्य होतें. ही भगवद्वाणी स्वानुभवास येण्यासारखी आहे. कर्तव्यबुद्धीनें कर्मतत्परता आणि श्रद्धापूर्वक वेदप्रणीत भगवत्स्वरूपस्मरण हीं दोन अबाधित असलीं म्हणजे अंतकाळींही भगवत्स्वरूप स्मरणगामी होऊन आपल्या अधिकाराप्रमाणें आपल्यास सद्गती मिळते.

५ याप्रमाणें सर्व प्रश्नांचीं उत्तरें झालीं. आतां दुय्यम प्रतीच्या भक्तांस परमात्मस्वरूप लीलेनें समजेल अशा हेतूनें ९ व्या श्लोकांत परमात्मस्वरूपाचें वर्णन केलें आहे. अशाच प्रकारचें वर्णन अनेक उपनिषदांत आलें आहे हें तज्ज्ञांस सांगण्याचें कारण नाहीं. ‘ अजो नित्यं ’ हा श्लोकही याच अर्थाचा आहे. सारांश ९ व्या श्लोकांत सांगितलेल्या स्वरूपानुसार परमात्मचिंतन अखंड असावें. समाधियोगाचें साहाय्य असेल तर उत्तमच होय. परंतु हें अमळसें अव्यक्त स्वरूप ध्यानांत येणें कठिण वाटत असल्यास

## ॐकार स्वरूप

दृढ करून त्याचें चिंतन करावें. मंडुकोपनिषदांत व इतरत्र ॐकार स्वरूपाचा उत्तम विस्तार आहे. वे. शा. सं. केशवशास्त्री दामले यांचा ‘ प्रणवप्रकाश ’ व रा. रा. हरि नारायण कृत ॐकारस्वरूपाचें इंग्रजी व्याख्यान हीं पुस्तकें अतज्ज्ञ प्रापंचिकांस अत्यंत उपयोगीं आहेत. प्रत्यक्ष भगवंतांनीं ही ॐकारमहात्म्य या अध्यायाच्या ११ व १३ व्या श्लोकांत कथिलें आहे; व १२ व्या श्लोकांमध्यें साधकाची वृत्ति व शरीरयोजना कशी असावी याचा विस्तार सांगितला आहे. हें ॐकारस्वरूप दृढ होऊन सदैव चित्तनिष्ठ व्हावें म्हणून सदासर्वदा ॐकारस्वरूपानें भगवद्ध्यान करावें हें उघडच आहे. ‘ अव्यक्त बोध ’ नामक एक सुंदर ग्रंथ श्री० जटार साहेब जहागिरदार, ग्वाल्हेर, यांनीं केला आहे, त्यांत ‘ अ, उ, म, ’ इत्यादि ॐकार घटकावयवांचा उत्तम विचार झाला आहे. ॐ स्वरूपानें मूळच्या अद्वैताला द्वैतत्व

मायाभासानें आलेंसें वाटतें तें कसें व ॐकारनिदिध्यासानें या द्वैताचा निरास कसा करावा, याविषयीं सुंदर व्याख्यान श्री० जटार साहेबांच्या पुस्तकांत केलेलें आहे; वाचकांनीं हें अवश्य वाचावें असें सांगण्याचें विषयांतर केल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं.

६. याप्रमाणें ॐकाराचें किंवा पहिल्या तीन चार श्लोकांत निर्दिष्ट केलेल्या स्वरूपाचें अखंड ध्यान करणारा पुरुष जरामरणापासून मुक्त होतो हें ठरलें. त्याला आध्यात्मिक, आधिभौतिक, आधिदैविक तापत्रयाची बाधा किमपिही न होतां उत्तम प्रकारचें सम्यग्ज्ञान होतें व शेवटीं तो मुक्त होतो. एवंच सगुणस्वरूपाच्या अखंड ध्यानानें दुय्यम प्रतीच्या भक्तांस उत्तम गति मिळते असें ठरलें. ज्यांचें विकार शांत झाले नाहींत व प्रापंचिक वासना नष्ट झाल्या नाहींत, त्यांनीं श्रद्धा पुरःसर वेदांतग्रंथ वाचिले व अधिकारानुसार परब्रह्माचें सगुणध्यान दृढ केलें म्हणजे त्यांस साक्षात्कार होतो व शेवटीं 'मीच ब्रह्म स्वरूप आहें.' हें भानही नष्ट होऊन ते अखंड सच्चिदानंदाच्या कारणावस्थेंत जाऊन लीन होतात; ब्रह्म होतात. **यांस पुनरावर्तन नाहीं.**

## पुनर्जन्म कां येतो?

७ पुनरावर्तन या जीवन्मुक्त लोकांस नाहीं, याचें कारण "अज्ञानानें 'जडांश मीच आहें' 'माझा आहे' असें अहंकारानें वाटणें व 'मी अपूर्ण आहें' असें वाटणें" हें या लोकांच्या ठायीं नसतें हें होय. जडांश मी आहें असें वाटलें कीं विकार होण्यास सुरवात होते. **असल्याशिवाय वाटत नाहीं** व **वाटल्याशिवाय असत नाहीं** हे सिद्धांत कालाबाधित व स्थलाबाधित आहेत. माझ्या वेदांती-मित्रांस हे अपसिद्धांत आहेत असें वाटण्याचा संभव आहे. पण ते तसे नाहींत. जन्म येणें ही गोष्ट जडाशीं संयोग **झाल्या-शिवाय** होत नाहीं. जडाशीं संयोग, जडाशीं तादात्म्य, जडाची वासना, इत्यादि गोष्टी अज्ञानानें उत्पन्न होतात. एवंच( मीं जड आहें, मी देह आहे, मीच बुद्धि, मीच अहंकार मीच मन, मीच इंद्रियें, मीच विषय) इत्यादि जडात्मकता येण्याला आपलें मूळचें अज्ञान व तज्जन्यकर्म हीं कारणें आहेत. ( आतां अज्ञान केव्हां उत्पन्न झालें, आपण पूर्वीं ज्ञानी असून पुढें अज्ञानी झालों किंवा अज्ञानी होतों व हळूहळू ज्ञानी

होत चाललों आहों, हा वाद महत्वाचा आहे; तथापि तो या पुस्तकांत, निदान येथें तरी, काढणें शक्य नाहीं. ) असो; जोंपर्यंत अज्ञान आहे तोंपर्यंत जडात्मकता व जडात्मकतेचा प्रत्यय या गोष्टी प्रकट व्हावयाच्याच. पुनः, व्यवहारदृष्टीनें देह बुद्धि, मन, इंद्रियें, विषय ही वस्तुमाला प्रत्येकीं लहान, मर्यादित, काल-स्थल कार्यकारणादि प्रसंगास वश आणि ह्मणून विकार्य अशी आहे. विकार होणें ह्मणजे कार्यकारणाच्या विश्वव्यापी नियमास वश होणें आहे. जितका जितका जडांश जास्त, तितका तितका कार्यकारणाचा पगडा जास्त, तितके तितके विकार जास्त आणि तितका तितका जन्म मरणाचा संभव जास्त; हा न्याय अबाधित आहे. सारांश जडाशीं संयोग करणें ही वासना अज्ञानानें उत्पन्न होते आणि जडाशीं संयोग झाला कीं जन्ममरणाच्या फेऱ्यांत जीव सांपडतो. यावरून गीतावाचकांच्या हें स्पष्ट लक्ष्यांत येईल कीं उपभोगाच्या आशेनें जेवढें कर्म होतें, जडाशीं संयोग करण्याच्या अभिलाषानें जेवढें कर्म होतें, तेवढें सर्व कर्म जीवास जन्ममरणाच्या पिंजऱ्यांत घालणारें होतें; आणि कर्तव्यबुद्धीनें, निरभिलाषानें, निष्कामबुद्धीनें जें जें कर्म होत असतें तें कर्म 'जन्ममरण' पिंजऱ्याचा एक एक गज उपटून टाकणारें होतें. जडमिश्रित-स्वार्थी कर्म उपकारक न होतां अपकारक होतें व निष्कामकर्म उपकारक होतें. वस्तुतः कर्म बाधक नाहीं; तथापि जडविषयक सकामकर्म करणें असलें कीं त्या कर्त्यास व जडविषयकज्ञान असलें कीं त्या ज्ञात्यास जन्मरणाचे गोते चुकत नाहींत. म्हणून ब्रह्मदेवासारखे सृष्टिकर्त्या विधात्यांसही जड जन्ममृत्यूनें सोडिलें नाहीं. जेथें जन्ममृत्यु आहे, तेथें दुःख आहेच. सात्विक-वृत्ति असेल तर कमी दुःख होईल, हें खरें; पण दुःख आहे. हें दुःख नाहींसें करण्याला परमेश्वराची अनन्य भक्ति हेंच साधन आहे. परमेश्वराची अन्ययभक्ति म्हणजे उपभोगवर्धक स्वार्थाचा सर्वथैव त्याग होय. उपभोग जडवस्तूंचाच व्हावयाचा. कारण चैतन्य उपभोग्य नाहीं व ज्ञेयही नाहीं ! सारांश विकारजन्य म्हणून सुखमूलक दुःखांचा व दुःखमूलक सुखांचा जर सर्वथा बींमोड करावयाचा असेल तर साधकानें आपली योग्यता पाहून ठरविलेल्या परमेश्वरी स्वरूपाचें अखंड चिंतन करण्यास लागावें. हें चिंतन दृढ होत जाईल तसतशी चैतन्यज्योति,

प्रकाशवंत होत जाईल व पूर्णप्रकाश फांकला म्हणजे ध्याता व ध्येय हा संबंध निरस्त होऊन एकच शुद्ध, निर्विकार, निरंजन, असें चैतन्य उरेल. ॐकार अगर सगुण ब्रह्म हीं या शुद्धचैतन्याचीं प्रकट म्हणजे ज्ञानविषय म्हणजे जडमिश्रित स्वरूपें होत; आणि जडमिश्रित म्हणून जन्ममरणशील स्वरूपें होत. पण हीं स्वरूपें साधनभूत होऊन जीवांचें कार्य करितात म्हणजे त्यास सद्गति देतात व अंतीं तो मुक्त होतो.

यावरून जेवढी म्हणून ज्ञानविषय वस्तु आहे, ती जडमिश्रित आहे व जन्ममरणास वश आहे असें सिद्ध झालें. ज्ञानाला गोचर होणें हें जडत्वाचें दर्शक आहे. कारण बुद्धी, मन, इंद्रियें, या करवीं आपल्यास ज्ञान होतें. आणि हीं जीं सर्व अंतःकरणें व बाह्यकरणें आहेत तीं जड व विकारीं आहेत; अर्थातच यांस गोचर होणारे पदार्थही जडमिश्रितच असले पाहिजेत. कर्मेंद्रियांस गोचर होणाऱ्या पदार्थांची ही हीच स्थिती असणार ! म्हणून ज्ञानास व कर्मास गोचर असणारे सर्व पदार्थ जड, विकारी, जन्ममरणशील असावयाचे असें ठरलें. ब्रह्मदेवापासून स्थावरा-पर्यंत बुद्धिगम्य, मनोगम्य व इंद्रियगोचर सर्व पदार्थ उत्पन्न होणारे व मरणारे असले पाहिजेत असें ठरलें. तसेंच सुखदुःख, राग द्वेष इत्यादि द्वंद्वें हीं मृत्युगोचर आहेत. काळाला वश नाहीं असा एकही पदार्थ नाहीं, असें पाहून ' कालाय तस्मै नमः ' असें जें कित्येक तत्वज्ञ कवी म्हणतात, तें अक्षरशः खरें आहे. या कालरूपी सर्वभक्षक महाराक्षसाच्या तावडींतून जर आपल्यास सुटावयाचें असेल तर उपभोगाची इच्छा नष्ट करणारें, अहंभाव नाहींसा करणारें, कर्म करण्याचें सर्वथा वर्ज केलें पाहिजे. ' कामक्रोध मीठ मिरची । याची घेऊ नये रुची ॥ ' असें साधुवर्य तुकोबा ' विठ्ठलमात्रा घेणारांस ' पथ्य सांगत आहेत. हें ध्यानांत ठेऊन आचरण ठरविलें पाहिजे. या कर्मानें जाऊं लागलों म्हणजे क्रमशः मुक्ति मिळेल. पण हें न करितां केवळ स्वार्थसाधनासाठीं अनंत सत्कृत्यें केलीं, तर कीर्ति मिळेल, संपत्ति मिळेल, इंद्रलोकीं वास्त-व्य होईल, प्रत्यक्ष ब्रह्मदेवाच्या मांडीशी मांडी लावून बसावयास मिळेल, पण हें सर्व कालभंगुर होईल; यानें जन्ममरण चुकावयाचें नाहीं, दुःख संपावयाचें नाहीं, ज्ञान होणार नाहीं. सारांश पुनरावृत्तीचें कारण अज्ञान, जडसंयोग, होय. हा जडसंयोग क्रमाक्रमानें टाकून देऊन

## परमात्म्याचें आराधन करावें.

८ हा सर्वदयाघन प्रभूचा उपदेश आहे. हा सर्व जीवांस उपदेश आहे. परमात्मा हा काळाचा कर्ता, अव्यक्ताचा अधिपति, सनातन व अविनाशी आहे. सर्वभूतें येथेंच सामावतात आणि हा सर्वव्यापी आहे. हा २०, २१, २२ व २७ श्लोकांतील उपदेश व त्यांतील रहस्य वाचकांनीं समजून उमजावें. परमात्म्याचें ध्यान व परमात्मा जोडेल असें निष्काम, निष्कपट व शास्त्रविहित आचरण व कर्तव्यतत्परता ही जोडी जर असेल, जर ज्ञानाचा परिचय होऊन परमात्म्याचें परोक्षज्ञान होईल; आणि पुढें ( या अगर पुढील जन्मीं ) योगपूर्वक व भक्तिपूर्वक निदिध्यास झाला तर अपरोक्षविज्ञान होऊन मुक्ति मिळेल. येथें गेल्यावर, या स्थितीस जाऊन पोहोंचल्यावर जन्ममरणाचें नांवच घ्याव-यास नको ! येथें ज्ञानाच्या पलीकडे, आनंदाच्या पलीकडे व अस्ति-त्वाच्याही पलीकडे आपण जाऊं ! ! पण हें सिद्ध व्हावयास ज्ञानवि-ज्ञान हवें. ज्ञानविज्ञानाचीं साधनें मिळाल्याशिवाय ज्ञानविज्ञान हस्तगत होणार नाहीं. सत्कर्म, योग, उपासना, वेदांतश्रवण इत्यादि साधनें क्रमशः अंगीकृत केलीं तर ज्ञानाविज्ञान होईल. असो; तेव्हां दुय्यम-प्रतीच्या भक्तानें ओंकाराची उपासना व ध्यान संपादून अखंड चिंत-नांत निमग्न राहावें व ७ व्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें वर्णप्राप्त व व आश्रमप्राप्त कर्तव्य निष्कामबुद्धीनें करावें. या भक्तांसाठींच ९, ११, १२, १३, व २०, २१ आणि २२ श्लोकांत परमात्म्याचें स्वरूप, परब्रह्माचें सगुण स्वरूप, सांगितलें आहे आणि श्लोक ५ तें ८, १०, १२, १४ व २२ श्लोकांत या स्वरूपाची उपासना करण्याचे सुलभ मार्ग सांगितले आहेत. तसेंच ५, ७, ८, १०, १३, १४, १९ इत्यादि श्लोकांत या उपासनेचें फल सांगितलें आहे. जन्ममरणाच्या त्रिविध तापांतून सुटावयाचें असेल तर अनन्यभक्तीनें परमेश्वराचें आरा-धन केलेंच पाहिजे; असा हा विषय आहे.

९ शेवटच्या श्लोकांत पुनरावर्तनाच्या अभिमानिनी देवता कोणत्या व अपुनरावर्तनाच्या देवता कोणत्या हें सांगितलें आहे. ब्रह्मवेत्ते लोकांस-प्रकाशक देवतांचें पाठबळ असल्या कारणानें त्यांस पुनर्जन्म येणें संभवनीय नाहीं. प्रकाश व प्रकाशक देवता ज्ञानपोषक

आहेत, असा पूर्वीचा समज सर्वत्र होता. प्रसिद्ध कवी **मिल्टनमध्यें** प्रकाश ह्मणजे ज्ञान असें प्रकट करणारीं अनेक कवितास्थळें दाखवून देतां येतील. शिवाय प्रकाशानें जितकें ज्ञानसंपादन होतें, तितकें इतर भूतांकडून होत नाहीं. एवंच प्रकाश हा ज्ञानपोषक असल्या-कारणानें दिवसा, शुक्लपक्षांत व उत्तरायणांत, सारांश उत्तरायणांतील शुक्लपक्षाच्या दिवसा जर मरण आलें तर तो भाग्यवान समजावा; ( कारण त्या जीवाला मार्गदर्शक प्रकाश देवता असतात ), असा प्रकार असणें, असें मत असणें, साहजिकच होतें; तसेंच उत्तरेकडे राहणाऱ्या लोकांस सूर्यप्रकाश जास्त वेळ असतो हेंही विसरतां कामा नये. शिवाय आलीकडील शास्त्रांन्वयें सूर्यकिरणांनीं आकर्षित झालेला जीव पृथ्वीवर येणें शक्य नाहीं, पण चंद्राकर्षित जीव पृथ्वीवर येऊं शकेल, हें पृथ्वी हीं सूर्यमालेंतील एक ग्रह व चंद्र हा पृथ्वीचा उपग्रह आहे हें ध्यानांत ठेविलें असतां समजणार आहे. एवंच अज्ञान मार्गानें जाणारे लोक पुनर्जन्म पावतात व ज्ञानमार्गानें जाणाऱ्या लोकांस पुन-र्जन्म येत नाहीं; ते उत्तम उत्तम लोकांप्रत जाऊन शेवटीं मुक्त होतात. अद्वैताचें ज्ञान झाल्यावर मुक्त होतात. म्हणून वेदाध्ययन, यज्ञ, तप, दान, यांच्या करण्यानें जें पुण्य प्राप्त होतें, सकामत्वानें हीं कर्में केलीं असतां जें पुण्य मिळतें; त्यापेक्षां अनंत पटीनें मोलवान फल ईश्वराच्या निष्कामभक्तीनें मिळतें. अतएव सर्व लोकांनीं या व्याख्यानांत सांगितलेल्या पद्धतीनें परमात्मभजन करावें. हें केलें तरच जीवाचें सार्थक होईल, जन्ममरण चुकेल, समाजाचें व मनुष्यतेचें, किंबहुना जीवमा-त्राचें कल्याण होईल, प्रापंचिक जीवांचें दुःख कमी होऊन स्वतःस कालांतरानें परमावधीच्या सुखाकडे जाऊन स्वस्थ व्हावयास अखंड सांपडेल आणि धर्मग्रंथांचें चीज होईल !

---

# अथ नवमोऽध्यायः

---

अष्टमे नाडीद्वारेण धारणायोगः सगुण उक्तः। तस्य च फलमग्न्यर्चिरादिक्रमेण कालान्तरे ब्रह्मप्राप्तिलक्षणमेवानावृत्तिरूपं निर्दिष्टम्। तत्रानेनैव प्रकारेण मोक्षप्राप्तिफलमधिगम्यते नान्यथेति तदाशङ्काव्याविवृत्सया—

**गुरु**—वत्सा! गेल्या व्याख्यानामध्यें इडा, पिंगला व सुषुम्ना या नाडींच्या द्वारानें साध्य होणारा जो अखंडचिंतन नामक धारणा योग आहे तो सांगितला. सर्व द्वारें बंद करून हा योग साधावा असा त्याचा गुणही सांगितला. याप्रमाणें सर्व द्वारें रोधून साध्य होणाऱ्या योगाचें फलही सांगितलें कीं अग्निमार्ग किंवा अर्चिमार्ग म्हणजे देवयानमार्ग प्राप्त होऊन कालान्तरानें म्हणजे क्रममुक्तीच्या द्वारानें ब्रह्मप्राप्ति होते. अर्थातच पुनः जन्मरणाचें ओझें वाहावें लागत नाहीं.

**शिष्य**—तर मग गेल्या अध्यायांत सांगितलेला धारणायोगच कायतो मोक्षसाधन आहे म्हणावयाचा. दुसरा कांहीं मार्गच नाहीं?

**गुरु**—या शंकेचें निवारण भगवान करित आहेत—

**श्रीभगवानुवाच—**

श्रीभगवान म्हणाले—

इदं तु ते गुह्यतमं-
प्रवक्ष्याम्यनसूयवे ॥
ज्ञानं विज्ञानसहितं
यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १ ॥

**तु*** ( पण ) **ते अनसूयवे इदं गुह्यतमं विज्ञानसहितं ज्ञानं वक्ष्यामि** ( मत्सरशून्य झालेला, चित्तशुद्ध झालेला जो तूं त्या तुला अत्यंत गुप्त असें अनुभवासहित हें शास्त्रज्ञान–सानुभव तत्त्वज्ञान–सांगतों ) **यत् ज्ञात्वा अशुभात् मोक्ष्यसे** ( जें ज्ञान झालें असतां तूं अमंगळ संसारापासून मुक्त होशील. )–सारांश अत्यंत गुह्य असणारें सानुभव तत्त्वज्ञान तुला समजलें व उमजलें तर तूं जन्ममरणांतून सुटशील. हेंच ज्ञान तुला आतां सांगतों.—

**इदं ब्रह्मज्ञानं वक्ष्यमाणमुक्तं च पूर्वेष्वध्यायेषु तद्बुद्धौ संनिधीकृत्येदमित्याह । तुशब्दो विशेषनिर्धारणार्थः । इदमेव सम्यग्ज्ञानं साक्षान्मोक्षप्राप्तिसाधनं 'वासुदेवः सर्वमिति' "आत्मैवेदं सर्वम्" "एकमेवाद्वितीयम्" इत्यादिश्रुतिस्मृतिभ्यः। नान्यत्।"अथ येऽन्यथाऽतो विदुरन्यराजानस्ते क्षय्यलोका भवन्ति" इत्यादिश्रुतिभ्यश्च। ते तुभ्यं गुह्यतमं गोप्यतमं प्रवक्ष्यामि कथयिष्याम्यनसूयवेऽसूयारहिताय । किं तत्, ज्ञानं, किंविशिष्टं, विज्ञानसहितमनुभवयुक्तम् । यज्ज्ञानं ज्ञात्वा प्राप्य मोक्ष्यसेऽशुभात्संसारबंधनात् ॥ १ ॥**

पूर्वींच्या अध्यायांत जें ब्रह्मतत्त्वविषयक ज्ञान सांगितलें तें मनामध्यें ठेऊन व तसेंच या अध्यायामध्यें जें सांगावयाचें आहे तेंही मनांत आणून भगवान बोलले म्हणून 'हे' असा शब्द त्यांनीं उपयोजिला आहे. असो; हें ज्ञान पूर्वापेक्षांही विशेष श्रेष्ठ आहे. कारण आतां या अध्यायांत ज्या ज्ञानाचा निर्देश करावयाचा आहे तेंच खरें ज्ञान असून मोक्षाचें साक्षात् साधन तेंच आहे. 'सर्वत्र वासुदेवच ओतप्रोत भरलेला आहे' 'हें सर्व आत्ममयच आहे' 'एकच असून तें अद्वितीय आहे' असे सद्वस्तुस्थापक सिद्धांत अनेक श्रुतिस्मृति कंठरवानें व एककंठानें सांगत आहेत. ब्रह्मसाक्षात्कार झाल्याशिवाय मुक्ति नाहीं हा सर्व श्रुतिस्मृतींचा अभिप्राय आहे. छांदोग्य उपनि-

* सगुण ब्रह्माचें ज्ञान भेदबुद्धिजन्य आहे, पण ब्रह्मज्ञान तसें नाहीं, हें दाखविण्यासाठीं 'पण' चा उपयोग आहे.

षदांत स्पष्ट सांगितलें आहे कीं अद्वैतज्ञानाहून भिन्न जें द्वैतज्ञान तेंच ज्या राजांस समजलें, सारांश ज्यांची द्वैतबुद्धीच कायम राहिली ते मृत्युलोकांप्रत गेले.' अशाच आणखीही श्रुति आहेत. दोरी असतां सर्प दिसणें हें जसें मिथ्याज्ञान आहे, तसेंच द्वैतज्ञान मिथ्या म्हणजे कल्पित आहे. असो; तेव्हां असें संसारभंजक व मोक्षदायक जें ज्ञान आहे, तें तुला सांगतों.

शिष्य---अर्जुन हा मत्सरशुन्य, व दोषदृष्टिशून्य होता. ईश्वरानें आपलें महत्व वर्णन केलें ह्मणून त्यास मत्सर उत्पन्न झाला नाहीं! अत-एव त्यास हें ज्ञान भगवंतांनीं प्रसन्न होऊन सांगितलेंना? भगवान, प्रत्यक्ष परब्रह्मस्वरूपी सर्वसाक्षी व सर्वव्यापी भगवानच हें ज्ञान सांगणार, तेव्हां ते केवळ तत्त्वज्ञानच सांगून राहावयाचे नाहींत, अर्जुनास व अर्जुननिमित्तानें इतरांस स्पष्ट बोध होईल अशा अनुभवयुक्त पद्धती-नेंच तें ज्ञान सांगणार असतील? सारांश अनुभव येईल, साक्षात्कार होईल, अशाच पद्धतीनें सांगणार असतील?

गुरु--हो, हो तर! यांत शंका कसली? अरे! सर्व जगद्व-त्सल व परमकारुणिक भगवंताला विश्वाची काळजी! तेव्हां तीव्र मोक्षेच्छा, शम, दमादि साधनसंपन्न अशा अर्जुनास निमित्त मात्र करून सर्वस्थळीं व सर्वकाळीं अबाधित राहणारें असें उत्तमोत्तम ज्ञान त्यांनीं येथें प्रकट केलें आहे कीं ज्याचें ग्रहण झालें असतां व ज्याचे आचरणमात्रांत रूपांतर झालें असतां ते ते ज्ञानवंत योगी अमंगल संसारापासून मुक्त व्हावें!

प्रपाकार, शंकरानंद---मागच्या अध्यायांत दृश्यप्रपंचाचें नश्व-रत्व सांगितलें, तेंच येथेंही दृढ करावयाचें व योगसामर्थ्यानें ब्रह्माचें सत्यत्व प्रकट करावयाचें हा या अध्यायाचा हेतु आहे; असो; पहिल्या तीन श्लोकांत येथें सांगावयाचें प्रमेय तें अति गूढ आहे असें सांगितलें आहे.

मधुसूदन---क्रममुक्ति गेल्या अध्यायांत सांगितली. येथें अन-न्यभक्तीचा विस्तार करितात. आठव्यांत ध्येयस्वरूप सांगितलें; नव-व्यांत ज्ञेयस्वरूप सांगणार आहेत. हें ज्ञान साक्षात् मुक्ति देणारें आहे.

गुप्त = गोपनीय. अतीशय रहस्याचें. येथें शिष्य हा सत्यवक्ता व आत्मसंयमी असावा असें सुचविलें.

**नीलकंठ**—वचनमात्रेकरूनच ब्रह्मानुभव करून देणारें हें व्याख्यान आहे.

**धनपति**—धर्मज्ञान गुह्य असतें; उपास्यज्ञान गुह्यतर असतें आणि अखंडार्थज्ञान गुह्यतम असतें.

**श्रीधर**—विज्ञान = उपासना. धर्मज्ञान गुह्य, देहापासून आत्मा निराळा आहे हें ज्ञान गुह्यतर आणि परमात्मज्ञान गुह्यतम आहे.

**पर्वते**—' किंतत् ब्रह्म, किं अध्यात्मं ' या प्रश्नांस सविस्तर उत्तर या अध्यायांत देतात,

सातव्या अध्यायांत जगताच्या उत्पत्तिलयाचें आदिकारण ब्रह्म असें ब्रह्मस्वरूप वर्णन केलें. आठव्यांत सगुणस्वरूपाचें वर्णन केलें आणि येथें ज्ञेयस्वरूपाचें वर्णन आहे.

**द्विवेदी**—निर्विकल्प समाधि साध्य करणाऱ्या राजयोगाचा येथें तत्वपूर्वक विचार आहे. ज्याला आपपर असा भेदभाव नाहीं व दोषदृष्टि नाहीं, तो अनसूयु.

**चतरजी**—' ज्यांना मंदबुद्धिही नाहीं त्यांच्या साठीं हा अध्याय आहे ' हा हेतु शुद्ध नाहीं. साक्षात् मोक्षप्राप्तीसाठींही हा अध्याय आहे. असें पुष्कळांचें मत आहे व तें सयुक्तिक आहे. जगज्ज्ञान कठिण, त्याहून धर्मज्ञान कठिण आणि त्याहूनही ब्रह्मज्ञान कठिण आहे.

**श्रीरामानुज**—येथें उपास्याचें माहात्म्य; ज्ञानी लोकांचा विशेष आणि भक्तिरूप उपासनेचें स्वरूप हीं सांगितलीं आहेत. ' इदं ' = भक्तिरूप उपासना नामक ज्ञान. विज्ञान = उपासनगतिविशेषज्ञान.

**द्वैतवादी**—विशेषतः जाणावयाचें तें विज्ञान.

**ज्ञानेश्वर**—....सुमन आणि शुद्धमति। जो अनिंदक अनन्यगति। पैं गा! गौप्यही तयाप्रती। चावाळिजे ( सांगावें ) सुखें॥ हा अनसूयुचा अर्थ.

**पंडित**—' अनसूयु ' = एवंच ईश्वर सम, सदय,। तो हा कृष्ण नव्हे विषम निर्दय। ऐसें समजला धनंजय। म्हणूनी

'अनसूयवे' म्हणों तयातें ॥....विविधरूप जें ज्ञान। त्यास म्हणावें विज्ञान।....आणि विविध हें ब्रह्म। ऐसें कळलें बुद्धीस वर्म। ते बुद्धीही मायाधर्म। ब्रह्म निर्धर्म ते सर्वथा वृत्ती नव्हे ॥ आतां माया तेंही ब्रह्म। हे प्रतीतीही मायाधर्म। निर्गुणोपासका आवडे निर्धर्म। बाळासि जैसी शर्करा ॥ शर्करामाधुर्य सीमा। त्याच साखरेच्या ओतिल्या प्रतिमा। माधुर्य आणि कौशल्यमहिमा। जाणती प्रौढ ॥ माधुर्य चाखे त्याची रसना। आकार गोड त्याच्या लोचना। तैसें निर्गुण आणि मायारचना। सगुण भगवद्रूप भक्तांतें ॥ त्याज्य मायांश त्यांस नाहीं। भगवद्रूपें सेव्य तेंही। ऐसें विविधमायामयच जें कांहीं। ज्ञानविज्ञान तें हा भाव ॥ ज्ञानास अन्नाची व विज्ञानास लवणाची उपमा पंडितांनीं दिली आहे.

रंगनाथ--हें अतिगोप्य तरी जाण। तेही तुजप्रति मी सांगेन। स्तनींचें दुग्ध स्तना लागून। गोड तों जाण कदा नव्हे ॥ तोचि सोवितें वत्स जरी मिळे। तरी गूढ असतांही पान्हा गळे। तेणें अधिकची सुख होय प्रेमबळें। शिष्यमेळें गुरूसी तैसें ॥ १ ॥

तच्च—

हें ज्ञान कसें आहे म्हणशील तर ऐक—

> राजविद्या राजगुह्यं
>
> पवित्रमिदमुत्तमम् ॥
>
> प्रत्यक्षावगमं धर्म्यं
>
> सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २ ॥

**राजविद्या** ( हें ज्ञान सर्व विद्यांचा राजा आहे ) **राजगुह्यं** ( हें सर्व गुह्यज्ञानांचें गुह्य होय ) **इदं उत्तमं पवित्रं** ( सर्व पावनशील वस्तूंमध्यें हें अति श्रेष्ठ आहे. ) **प्रत्यक्षावगमं** ( हें ज्ञान साक्षात् समजून घेण्याचें आहे. प्रतीतीस येणारे हें ज्ञान आहे )

**धर्म्यं** ( हें श्रुतिस्मृतींस अनुसरून आहे ); **कर्तुं सुसुखं** ( या ज्ञानाप्रमाणें आचरण करणें संकटप्रद नाहीं; सुखानें आचरितां येतें ) –आणि–**अव्ययं** ( हे अविनाशी म्हणजे कालस्थलाबाधित आहे ).– सारांश सर्व शास्त्रामध्यें श्रेष्ठ, सर्व गुह्यांचें गुह्य सर्वपवित्र, अनुभवानें सत्य ठरणारें, धर्माविरोधि, आचरणास सुकर व कधींही बाधित व्हावयाचें नाहीं असें ज्ञान तुला सांगतों.––

**राजविद्या विद्यानां राजा दीप्त्यतिशयत्वात् । दीप्यते हीयमतिशयेन ब्रह्मविद्या सर्वविद्यानाम् । तथा राजगुह्यं गुह्यानां राजा । पवित्रं पावनमिदमुत्तमं सर्वेषां पावनानां शुद्धिकारणमिदं ब्रह्मज्ञानमुत्कृष्टतमम् । अनेकजन्मसहस्रसंचितमपि धर्माधर्मादि समूलं कर्म क्षणमात्राद्भस्मीकरोति यतोऽतः किं तस्य पावनत्वं वक्तव्यम् । किंच प्रत्यक्षावगमं प्रत्यक्षेण सुखादेरिवावगमो यस्य तत्प्रत्यक्षावगमम् । अनेकगुणवतोऽपि धर्मविरुद्धत्वं दृष्टं न. तथाऽऽत्मज्ञानं धर्मविरोधि किंतु धर्म्यं धर्मादनपेतम् । एवमपि स्याद्दुःसंपाद्यमित्यत आह सुसुखं कर्तुं यथा रत्नविवेकविज्ञानम् । तत्राल्पायासानां कर्मणां सुखसंपाद्यानामल्पफलत्वं दुष्कराणां च महाफलत्वं दृष्टमितीदं तु सुखसंपाद्यत्वात्फलक्षयाद्व्येतीति प्राप्तमत अहाव्ययं नास्य फलतः कर्मवद्व्ययोऽस्तीत्यव्ययमतः श्रद्धेयमात्मज्ञानम् ॥ २ ॥**

गुरु—वत्सा ! हें अध्यात्मज्ञान सर्व शास्त्राचें आधिपत्य स्वीकारण्यास योग्य आहे; कारण त्याचें तेजच तसें अद्वितीय आहे. ब्रह्मविद्या आणि इतर विद्या यांमध्यें तेजाच्या संबंधानें अतीशय अंतर आहे. व्यवहारामध्येंसुद्धां इतर विद्वानांपेक्षां अध्यात्मवेत्त्यास अत्यंत मान मिळतो. असो; ज्या कांहीं अत्यंत विलक्षण म्हणून अत्यंत गुह्य वस्तु **आहेत, त्या** सर्वांचें हें मुकुटमणी आहे.

**शिष्य**––भगवन् ! तसेंच जगामध्यें ज्या पवित्र म्हणून वस्तु

आहेत, त्या सर्वांस पावनशीलत्व देणारें व सर्व पवित्र वस्तूंस शुद्ध करणारें हें ज्ञान आहे म्हणून तें पवित्रोत्तम असलेंच पाहिजे; नाहीं बरें? कारण मागें आपणच मला असें सांगितलें आहे कीं अनंत-जन्मांमध्यें जीं धर्माचीं अगर अधर्माचीं अनेक कर्में आपल्या हातून झालीं असतील, किंवा आपण केलीं असतील त्या सर्वांचें, सर्व संचित-क्रियमाणाचें भस्म क्षणएकांत करण्याचें सामर्थ्य या अध्यात्मज्ञानांत आहे. भगवन्! तेव्हां कारणासह म्हणजे वासनेसह सर्व कर्मांचें समूळ भस्म करणारा जो ज्ञानाग्नी त्याचें पवित्रत्व कोणास वर्णितां येणार?

गुरु—वत्सा! तसेंच हें ज्ञान प्रत्यक्ष अनुभवास येण्यासारखें आहेरे! नुसतें सांगोपांगीनें याचें फल अमुक आहे, त्याचें तमुक आहे असें सांगण्याचा केवळ भाग नाहीं. जें फल मिळतें म्हणून सांगितलें आहे तें प्रत्यक्ष अनुभवास येतें. पहा: साखर गोड आहे असा जिव्हेस अनुभव आला कीं साखरेच्या गोडीचें अज्ञान नष्टच होतें. हा प्रत्यक्ष अनुभव! स्वरूपानुभव व फलानुभव हे दोन्ही प्रत्यक्ष म्हणून प्रत्यक्षावगमं असें म्हटलें. मात्र हें ज्ञान प्रत्यक्ष संपादित होईल असा आपला प्रयत्न पाहिजे. साखरेची गोडी, सृष्टीचें सौंदर्य, कोकिलांचे मधुर कूजित, इत्यादिकांचा जसा आपल्याला प्रत्यक्ष अनुभव येऊन सुख होतें, तसाच प्रकार याचाही आहे.

शिष्य—इतकें अनेक गुणवंत जें ज्ञान आहे तें अर्थांतच धर्मास अनुकूल असलें पाहिजे. आतां मांसाहार, परधन व परकामिनी. या वस्तु सुख देणाऱ्या वाटतात खऱ्या, प्रियगुणमंडित आहेत खऱ्या पण त्या जशा पापमूलक आहेत, तसा आत्मज्ञानाचा प्रकार नसलाच पाहिजे. सारांश आत्मज्ञानाचा आणि विश्वप्रतिष्ठापक धर्माचा विरोध नसला पाहिजे. तात्पर्य; नाहींच. इतका विषय मला समजला. पण असें हें सर्वश्रेष्ठ, अति गूढ, पावनोत्तम, अनुभवयोग्य व धर्मानुकूल असें जें हें अद्वितीय ज्ञान तें समजण्याला अति कठिण असेल नाहीं बरें?

गुरु—छे: छे:! अरे हा हिरा, हें माणिक, ही पाच, अशीं रत्नांचीं नांवें समजलीं म्हणजे तें तें रत्न ओळखण्यास जसे कांहीं प्रयास लागत नाहींत, तसेंच सदसद्वस्तुविवेक एकदां निश्चित झाला म्हणजे त्याप्रमाणें

आचरण करण्यास काहींरे श्रम पडत नाहींत. धर्माला आश्रय देणारें हें ज्ञान आचरणांत आणणें अत्यंत सुकर आहे. यज्ञयागास देश, काळ, सामग्री, ऋत्विज इत्यादिकांची अपेक्षा असते. येथें तसें कांहीं नाहीं. गुरूमुखानें अज्ञाननाशक वस्तुज्ञान झालें कीं हें साध्य होतें.

**शिष्य**—गुरुजी! अल्पायासानें साध्य होणाऱ्या कर्मांचें फल जसें अल्पकालच टिकणारें असतें व अवघड कर्मांचें फल प्रायशः व दीर्घकालीन असतें हा जसा सामान्य नियम आहे, त्याला अनुसरून असें म्हणणें भाग पडतें कीं ह्या अल्पप्रयासानें साध्य होणाऱ्या ज्ञानाचें फलही कालभंगुरच असलें पाहिजे.

**गुरु**—नाहीं, नाहीं; कर्मांचा व कर्मफलांचा जसा कालानें नाश होतो, तसा अध्यात्मज्ञानाचा किंवा त्याचें मुक्तिनामक जें फल त्याचा नाश होत नाहीं. अध्यात्मज्ञान किंवा मुक्ति ही वस्तु कालास किंवा स्थलास वश होत नाहीं. ही अव्यय आहे. म्हणून या–अव्यय, सुकर, धर्मशील, पवित्र, अंतरंग, गुह्य आणि सर्वश्रेष्ठ अशा–या अध्यात्मविद्येवर प्रत्येकानें श्रद्धा ठेविलीच पाहिजे.

**प्रपाकार**—विद्या = अध्यात्मविद्या. धर्म्यं = सर्व धर्मफलें देणारें. सुसुखं = शरीरास क्लेश न देणारें. किंवा द्रव्यास क्षीण न करणारें.

**मधुसुदन**—सर्व अविद्येचा नाश करणारी म्हणून राजविद्या असें नांव दिलें. प्रायश्चित्त एका पापाची मात्र नाश करितें पण अध्यात्मज्ञान कारणांसह सर्व पापांचा नाश करितें. बृहदारण्यकांतील श्रुति ब्रह्मज्ञानाचें अविनाशित्व स्थापण्यासाठीं देतात.

**शंकरानंद**—इतर सर्व विद्या संसारवर्धक होतात; अध्यात्मज्ञान संसारनिवर्तक होतें. '**तदा विद्वान्पुण्यपापे विधूय**' (ब्रह्मज्ञान झाल्यावर पुण्यपापें स्वकारणांसह अस्तंगत होतात.) म्हणून ब्रह्मज्ञान पवित्र आहे. तत्काल फलप्रद होणारें, धर्माप्रमाणें कालांतरानें सफल होणारें नव्हे, तें प्रत्यक्षावगमं. लहानसा चंद्रही मोठा आल्हाद देतो, तसें हें सुकर ज्ञान ही अक्षय्य असतें.

**श्रीरामानुज**—मोठ्या मनाच्या लोकांसच समजणारी ती राजविद्या. हा श्लोक व हा अध्याय उपासनापर लावितात. जी उपा-

सना परमेश्वरप्राप्ति करून देऊनही संपत नाहीं ती अव्यय उपासना होय.

**द्वैतवादी**—धर्म = भगवान; त्यासंबंधीं तें धर्म्य. '**अक्षेषु प्रति प्रति स्थितः, प्रत्यक्षः**' = भगवान. ह्या भगवंतानें साक्षात् केलेलें तें प्रत्यक्षावगम !

**पंडित—हें प्रत्यक्ष जें स्थावर जंगम । स्वयें मीच साकार पुरुषोत्तम । ऐसें ज्ञान तें प्रत्यक्षावगम । यास राजविद्या राजगुह्य मी म्हणतों ॥** धर्म = पदार्थगुण. धर्म्य = सगुणब्रह्मसंबंधीं (विश्वासंबंधीं.)

**डेव्हिस**—धर्म्य = सात्विक, शुद्ध. ॥ २ ॥

मग सर्वांनाच हें ज्ञान मिळून मोक्षप्राप्ति व्हावी; पण असें होत नाहीं. कारण सांगतातः—

**ये पुनः**—

पण जे—

**अश्रद्दधानाः पुरुषा**
**धर्मस्यास्य परंतप ॥**
**अप्राप्य मां निवर्तन्ते**
**मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥**

**परंतप** (शत्रूंस व अश्रद्धेस ताप देणाऱ्या पार्था !) **अस्य धर्मस्य अश्रद्दधानाः पुरुषाः** (या पवित्र धर्मावर श्रद्धायुक्त व भक्तियुक्त विश्वास न ठेवणारे पुरुष आहेत)—त्यास—**मां अप्राप्य** (मला न मिळवितां, माझी प्राप्ति न होतां) **मृत्युसंसारवर्त्मनि निवर्तन्ते** (मृत्यूनें युक्त जो संसार, जन्ममरण, त्याच्या मार्गांत परिभ्रमण करित राहतात; यांत शंका नाहीं.)—सारांश ह्या सात्विक व धर्मशील ज्ञानावर, त्याच्या स्वरूपावर व फलावर ज्यांचा विश्वास नाहीं व म्हणून आचरणही शुद्ध नाहीं, त्या लोकांस परब्रह्मस्वरूपी जो परमेश्वर

**मया ततमिदं सर्वं**
**जगदव्यक्तमूर्तिना ॥**
**मत्स्थानि सर्वभूतानि**
**न चाहं तेष्ववस्थितः ॥ ४ ॥**

**मया अव्यक्तमूर्तिना इदं सर्वं जगत् ततं** ( इंद्रियांस अगोचर जो मी त्यानें, परमेश्वरानें, हें सर्व मूर्त विश्व कारणरूपानें व्यापून टाकिलेलें आहे; मी अव्यक्त स्वरूपानें सर्व विश्वामध्यें ओतप्रोत भरलेला आहे ) **सर्वभूतानि मत्स्थानि** (सर्वभूतें माझ्यामध्यें आहेत.) **अहं तेषु न च अवस्थितः** ( मी त्यांच्यामध्यें राहिलेला नाहीं. )– सारांश सर्व विश्वांत परमेश्वर भरलेला आहे. सर्व भूतें परमेश्वररूपी महासागरांत स्वकर्मानुसार हेलकावे खात आहे; पण भूतांच्या योगानें परमेश्वराला मात्र मर्यादा प्राप्त होत नाहीं.

मया मम यः परो भावस्तेन ततं व्याप्तं सर्वमिदं जगदव्यक्तमूर्तिना न व्यक्ता मूर्तिः स्वरूपं यस्य मम सोऽहमव्यक्तमूर्तिस्तेन मयाऽव्यक्तमूर्तिना करणागोचरस्वरूपेणेत्यर्थः । तस्मिन्मय्यव्यक्तमूर्तौ स्थितानि मत्स्थानि सर्वभूतानि ब्रह्मादीनि स्तम्बपर्यन्तानि । न हि निरात्मकं किंचिद्भूतं व्यवहारायावकल्पतेऽतो मत्स्थानि मयाऽऽत्मनाऽऽत्मत्त्वेन स्थितान्यतो मयि स्थितानीत्युच्यन्ते । तेषां भूतानामहमेवाऽऽत्मेत्यतस्तेषु स्थित इति मूढबुद्धीनामवभासतेऽतो ब्रवीमि न चाहं तेषु भूतेष्ववस्थितो मूर्तवत्संश्लेषाभावेनाऽऽकाशस्याप्यन्तरतमो ह्यहम् । न ह्यसंसर्गि वस्तु क्वचिदाधेयभावेनावस्थितं भवति ॥ ४ ॥

माझा जो श्रेष्ठ भाव, तो इंद्रियांस गोचर नाहीं, ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, मन, बुद्धि इत्यादिकांस गोचर नाहीं, हें तुला ठाऊक आहे. असो, तेव्हां माझें जें हें अव्यक्त, अगोचर स्वरूप त्यानें हीं सर्व विश्वें ओतप्रोत भरून गेलेलीं आहेत; तसेंच हिरण्यगर्भापासून तों गव-

ताच्या काडीपर्यंत जीं अनंत चराचरभूतें आहेत व भूतसमूह आहेत तीं सर्व या माझ्या अव्यक्त व अमर्याद स्वरूपांत स्वकर्मानुसार निरनिराळीं मूर्तस्वरूपें धारण करून राहिलेलीं आहेत.

**शिष्य**—कशावरून ?

**गुरु**—अरे! कोणतेंही यःकश्चित किंवा जगड्व्याळ भूत म्हणजे पदार्थ घेतलास तरी तुला आढळून येईल कीं त्यामध्यें व त्याच्या बाहेर, निरंजन व निर्विकार असें आत्मस्वरूप नाहीं असें केव्हांही दिसावयाचें नाहीं. प्राचीन व अर्वाचीन शास्त्रांचा, अनुभवसिद्ध प्रमेयांचा, ओघ पाहिलास तर येथून तेथून सर्वांचें म्हणणें तुला असें आढळून येईल कीं सर्वांचें मूळस्वरूप आहे तें एकच आहे, व तें मूळस्वरूप आहे म्हणून सर्वांस अस्तित्व प्राप्त होतें. अनात्मक वस्तुसंबंधानें कोणताही व्यवहारच करितां नाहीं, म्हणजे 'आहे' असें विधान ज्या वस्तुसंबंधें करितां येणार नाहीं, ती वस्तु असणें शक्य नाहीं; आणि जी वस्तु नाहीं तिच्याविषयीं आपल्यास काय बोलतां येणार ? एवंच जेथें म्हणून मूर्त किंवा अमूर्त, चर किंवा अचर पदार्थ आहे, त्याच्या आंत व त्याच्या बाहेर आत्मा ओतप्रोत भरलेला आहे, असेंच तुला विचारांतीं समजून येईल. तात्पर्य; पदार्थमात्र आत्म्याच्या अव्यक्त स्वरूपांत राहिले आहेत असें सिद्ध झालें.

**शिष्य**—भगवन्! यावरूनच दुसरा उपसिद्धांत असा करितां येईल कीं तो अव्यक्त व सच्चिदानंद परमात्माही या मूर्तस्वरूपी चराचर पदार्थमात्रांनीं मर्यादित झाला आहे; म्हणजे हे मूर्त पदार्थ कोणत्या तरी साधनानें नाहींसे करितां येतील अशी जर कल्पना केली तर आत्मस्वरूपही नष्ट होईल. कारण उघडच आहे कीं पदार्थांच्या आंत बाहेर राहणारा जो आत्मा, त्या आत्म्याचा आधारच काढून घेतल्यावर त्यास राहण्याला जागाच संभवत नाहीं! एवंच जगत् आहे ह्मणून आत्मा आहे, जगत् नष्ट झाल्याबरोबर आत्मा नष्ट होईल हें ठरलें!

**गुरु**—काय अद्यापि हें अज्ञान तुझें ? अरे! ह्म, तुझ्यापुढें असणाऱ्या रिकाम्या पंचपात्रींत जें आकाश आहे, किंवा पदार्थमात्रास

व्यापणारें जें आकाश आहे, तें आकाश, तुझी पंचपात्री किंवा तांब्या, किंवा घागर किंवा मठ, एवंच सर्व पदार्थ नाहींसे केले तर तें आकाश नष्ट होईल काय? समुद्राच्या लाटा बंद झाल्या तर समुद्र नष्ट होईल, सगळ्या घागरी फोडून टाकिल्या तर माती नाहींशी होईल, पाणी नाहींसें केलें तर पाणी अगर वाफ यांची शक्ति नष्ट होईल, असें भेकडपणानें बरळण्यांपैकींच तुझी शंका आहे! सर्व व्यापी आकाश जसें नष्ट होत नाहीं, त्याचप्रमाणें त्या तसल्या विश्वव्यापी आकाशालाही आंतर्बाह्य व्यापणारा आत्माही नष्ट होत नाहीं, व नष्ट होणें संभवनीयही नाहीं. शिवाय, आत्मा नष्ट झाला तर जाईल कोठें? असो; तेव्हां, मूर्त व अमूर्त चर व अचर पदार्थांस अस्तित्व देणारा आत्मा कोणत्याही पदार्थामध्यें मिश्र होत नसल्यामुळें इतर पदार्थांप्रमाणें त्याचा नाश होणें शक्य नाहीं. समजलें? म्हणून परमेश्वर म्हणतात कीं मी पदार्थांमध्यें नाहीं. अर्थ इतका कीं पदार्थांच्या, मूर्त पदार्थांच्या, भासिक अस्तित्वावर आत्म्याचें अस्तित्व अवलंबून नाहीं. उघडच आहे कीं निःसंग, निरंजन, निर्विकार वस्तूचा आधार, किंवा आधेय असणे म्हणजे संबंध संभवणें शक्य नाहीं. याप्रमाणें आत्म्यामध्यें सर्व आहे, पण आत्मा कशावर तरी अवलंबून आहे, **असें नाहीं**; हें समजलें?

**नीलकंठ**--कुंडलादिकांचें उपादान कारण, सुवर्ण आहे, तसाच परमात्मा विश्वाचें उपादान कारण आहे. मग हें सातव्या अध्यायांत सांगितलें; पुनः येथें कशाला? सातव्यांत कार्यकारणद्वारा उपदेश केला. येथें शुद्ध उपदेश आहे. ‘ जेथून सर्वांची उत्पत्ति होते, जेथें सर्व असतें, जेथें सर्वांचा लय होतो, तें ब्रह्म ’ असें सांगून ‘ अन्नब्रह्म, प्राणब्रह्म’ अशा रीतीनें आनंदब्रह्मापर्यंत जसा उपदेशाचा उपक्रम झाला तसेंच येथेंही ‘ शबलमायेच्या सहाय्यानें मी जगाच्या सर्गस्थितिलय करितों, ’ असें ७ व्यांत समजूत पडण्यासाठीं सांगून नवव्यांत शुद्धब्रह्माचा, कार्यकारणशून्य ब्रह्माचा, उपदेश करित आहेत.

**प्रपाकार, मधुसूदन**—हें गुह्यज्ञान ४ व ५ श्लोकांत सांगतातः— ‘ मीं हें नामरूपात्मक जगत विस्ताराला आणिलें आहे. माझ्या अज्ञानानें विस्ताराला पावलेलें जगत् माझ्यापासून उत्पन्न होतें व माझ्या-

ठिकाणींच लय पावतें ' असें योगवासिष्ठांत सांगितलें आहे. जरी शिंपल्याचे ठिकाणीं रजताचा ( रुप्याचा ) भास होतो, तथापि त्या रजतामध्यें शुक्तीचा एकही अंश असत नाहीं. जर शुक्त्यंश दिसेल तर भ्रांतीच होणार नाहीं.

**श्रीधर**—' **तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्** ( तें ( जग ) उत्पन्न करून त्यांत शिरला. ) '

**पर्वते**—येथें ' ब्रह्म हें सच्चिदानंदस्वरूप आहे ' असें सांगितलें. सातव्या अध्यायांतील ६ व्या श्लोकांत ' तटस्थलक्षण ' सांगितलें आहे.

**श्रीरामानुज**—' मी आंत राहून सर्व जग व्यापितों ' असा नियामकपणाचा संकुचित अर्थ करितात. परमेश्वर सर्व जगतांच्या आंत बाहेर आहे. म्हणजे तो नियामक असून उपादानकारण आहे. ' माझ्या स्वाधीन भूतें आहेत, मी त्यांच्या आधीन नाहीं ' असा या आचार्यांचा अर्थ आहे.

**द्वैतवादी**—चवथ्यापासून सोळाव्यापर्यंत ' ज्ञातव्य ' जें तें सांगितलें आहे. माझ्या आधारावर सर्वभूतें आहेत, मी त्यांच्या आधारावर उपजीवन करित नाहीं.

**ज्ञानेश्वर**—**हें अव्यक्तपणें थिजलें । तेंचि मग विश्वाकारें वोथिजलें** ( पातळ झालें ) । **तैसें अमूर्तमूर्ति मिया विस्तारिलें । त्रैलोक्य जाणें ॥ महदादि देहांतें** ( महत्तत्वापासून देहापर्यंत ) । **इयें अशेषें हीं भूतें । पै माझ्या ठायीं बिंबितें । जैसें जळीं फेण ॥ परि तया फेनाआंत पाहतां । जेवीं जळ न दिसे पंडुसुता ! । ना तरी स्वप्नींची अनेकता । चेइलिया** ( जागें झाल्यावर ) **नोहिजे ॥** या दृष्टांतानें तरी समजूत पडो !

**पंडित**—या व पांचव्या श्लोकांवर पंडितांची प्रचंड टीका आहे. या टीकेंत त्यांनीं व्यंग्योक्तीनें ज्ञानेश्वर व निर्गुणोपासक अद्वैती यांच्यावर आणि केव्हां केव्हां आचार्यांवरही कडाका उडविला आहे. अद्वैतज्ञान झाल्यावरही सगुणभक्तीनें ईशोपासना करावी हा पंडितांचा सिद्धांत आहे. अद्वैतज्ञानाचा साक्षात्कार झाला असतां सगुणत्व उरत नाहीं हें तत्त्व पंडितांच्या लक्ष्यांत कसें आलें नाहीं; न-

कळे. भक्ति हें साधन आहे व त्या साधनाचे योगानें अद्वैतसिद्धि होते. अद्वैत झाल्यावर आशा, वासना, कामना, आवड इत्यादि सर्व मनोवृत्ति लीन, नव्हे! नष्ट होतात. असो; पंडितांचें विस्तृततर व्याख्यान अवश्य वाचावें.

**डेव्हिस व टॉमसन**---अव्यक्तमूर्ति = प्रकृति. अर्थातच या मंडळीस चित्स्वरूपाचें पूर्ण ज्ञान नसल्यामुळें व 'अव्यक्त' याचा अर्थ प्रकृति होत असल्यामुळें 'अव्यक्तमूर्तीचा अर्थ प्रकृति असा यांच्या मतें झाला. हा अर्थ तेलंगांस संमत आहे! ही चूक होय. ईश्वर सर्वव्यापी आहे याचा अर्थ सत्तारूपानें तो सर्वत्र भरलेला आहे. नश्वरस्वरूपानें नव्हे. ईश्वर चित्स्वरूपी व जडस्वरूपी आहे असें यांच्या मनानें घेतलें आहे, जडस्वरूप मिथ्या, असत्य, नश्वर आहे हें यांस विदित नव्हतें कीं काय? माया हा परमेश्वराचा भाग नव्हे. ईशसत्तेनें माया आहे असें भान होतें. ज्ञान झाल्यावर माया नष्ट होते. हें विसरतां कामाचें नाहीं. ॥ ४ ॥

**अत एवासंसर्गित्वान्मम**—

याप्रमाणें मी, परमेश्वर, निःसंग आहे म्हणून--

**न च मत्स्थानि भूतानि**
**पश्य मे योगमैश्वरम् ॥**
**भूतभृन्न च भूतस्थो**
**ममाऽऽत्मा भूतभावनः ॥ ५ ॥**

**च** (आणि) **मत्स्थानि भूतानि न** (माझ्यामध्यें भूतें राहतात असें नाहीं.) **मे ऐश्वरं योगं पश्य** (सर्व शक्तिमान परमेश्वर जो मी त्या माझें योगसामर्थ्य विवेकतः पहा.) **भूतभृत् न च भूतस्थः** (माझा आत्मा पदार्थमात्राला स्वरूप, आश्रय, देणारा असूनही तो या पदार्थांत राहत नाहीं.) **मम आत्मा भूतभावनः** (माझा आत्मा, मी स्वतः, भूतांस कर्मानुसार जन्म देऊन वाढविणारा आहे.)--माझ्यामध्यें

पदार्थ राहत नाहींत! पहा माझें योगैश्वर्य कसें आहे तें! तसेंच भूतांस मी आश्रय देत असतांही मी त्यांमध्यें नाहीं; शिवाय मींच त्यांचा उत्पादक व नियामक आहे.

न च मत्स्थानि भूतानि ब्रह्मादीनि पश्य मे योगं युक्तिं घटनं मे ममैश्वरमीश्वरस्येममैश्वरं योगमात्मनो याथात्म्यमित्यर्थः । तथा च श्रुतिरसंसर्गित्वादसङ्गतां दर्शयति " असङ्गो न हि सज्जते " इति । इदं चाऽऽश्चर्यमन्यत्पश्य भूतभृदसङ्गोऽपि सन्भूतानि बिभर्ति न च भूतस्थो यथोक्तेन न्यायेन दर्शितत्वाद्भूतस्थत्वानुपपत्तेः । कथं पुनरुच्यतेऽसौ ममाऽऽत्मेति, विभज्य देहादिसंघातं तस्मिन्नहंकारमध्यारोप्य लोकबुद्धिमनुसरन्व्यपदिशति ममाऽऽत्मेति, न पुनरात्मन आत्माऽन्य इति लोकवदजानन् । तथा भूतभावनो भूतानि भावयत्युत्पादयति वर्धयतीति वा भूतभावनः ॥ ५ ॥

शिष्य—भगवन्! मागच्याच श्लोकांत सर्व पदार्थ माझ्यामध्यें आहेत असें सांगितलें आणि आतां ह्या श्लोकांत ब्रह्मादि सर्व भूतें माझ्यामध्यें नाहींत असें भगवान ह्मणतात हा आहे तरी काय घोंटाळा?

गुरु—ठीकच आहे. दोरीवर सर्पाचा आभास होतो हें तुला ठाऊकच आहे. आतां दोरीच नसेल तर सर्पाची भ्रांति होणार नाहीं, या न्यायानें सर्पाभास दोरीशिवाय नाहीं, सर्पाभास दोरीमध्यें आहे असें आपण ह्मणूं; पण वास्तविकच पाहतां सर्पाभास ही जर वस्तुतः भ्रांतिच आहे, तर, पारमार्थिकतः बोलावयाचें झालें ह्मणजे, दोरीमध्यें सर्प नाहीं असेंच ह्मटलें पाहिजे. याचप्रमाणें जगतांचा जो अभास होतो तो ब्रह्मावरच होत असतो; या न्यायानें जगतें ही ब्रह्मामध्यें राहतात, असें ह्मटलें. अर्थातच हें व्यावहारिक मनुष्यास समजेल अशा रीतीनें सांगितलें आहे. आतां परमार्थतःच बोलावयाचें झालें

ह्मणजे परब्रह्माचें ठिकाणीं अभासरूपी जगत् वस्तुतः नाहीं, आभासरूपानें मात्र, अज्ञानदशेंत आहे असें दिसतें. समजली ही फोड? यासाठींच भगवान अर्जुनास सांगतात कीं 'माझें अद्वितीय व विलक्षण योगसामर्थ्य कसें आहे तें पहाः परब्रह्माची अथवा परब्रह्माचें प्रकट स्वरूप जो परमेश्वर त्याची योगघटना व तिचें माहात्म्य अत्यंत विलक्षण आहे. बृहदारण्यकांत एक श्रुति आहे ती ही या निःसंग परब्रह्माचे निर्विकारत्व सांगतेः 'हा असंग परमात्मा कशाचाही संसर्ग पावत नाहीं. तो निर्लेप आहे.' आणखी हें एक दुसरें आश्चर्य पहाः मी निःसंग परमेश्वर भूतांचा आश्रय आहे! माझ्या व्यतिरिक्त भूतांचें कांहीं एक चालावयाचें नाहीं, किंबहुना, तीं असणेंच किंवा वाढणेंच शक्य नाहीं; तसेंच भूतांस माझा आश्रय असतांही त्यांमध्यें माझा वास नाहीं! येथें माझें वास्तव्य नाहीं हें कसें, ह्याची उपपत्ति आतांच सांगितली आहे.

आणखी पहाः माझाच आत्मा भूतभावन ह्मणजे भूतांची उत्पत्ति व त्यांची स्थिति व वृद्धि–संरक्षण–करणारा आहे; तथापि सच्चिदानंदघन, अद्वितीय, असंग असा जो माझा आत्मा तो त्या भूतांमध्यें अर्थातच नाहीं.

**शिष्य**—भगवन्! सर्वांचा आत्मा जो परमात्मा, प्रत्यक्ष परब्रह्म! त्याकडून 'माझा आत्मा' अशी वाणी कशी निघावी बरें? आत्म्यास आत्मा असतो काय?

**गुरु**—श्रीकृष्ण भगवान हे परब्रह्माचें प्रकट स्वरूप आहे तेव्हां श्रीकृष्णाचा आत्मा म्हणजे परब्रह्म हें तर सिद्धच आहे. आतां श्रीकृष्ण म्हणजे प्रत्यक्ष परब्रह्मच बोलत आहे अशी संभावना केली तरी कांहीं बाध नाहीं. कारण अज्ञानी लोकांस जर कांहीं समजून सांगावयाचें असेल तर त्यांना समजेल अशा युक्तीनें व अशा शब्दांनीं त्यांचें समाधान केलें पाहिजे. 'मी स्थूल आहें, कृश आहें, काणा आहें' 'हा माझा हात, माझें मन, माझा पुत्र' इत्यादि प्रकारांनींच अज्ञानी मनुष्याचा व्यवहार होतो; म्हणजे मन, इंद्रियें, देह इत्यादिकांच्या संमिश्रणामुळें नामरूपाप्रत प्राप्त झालेला जो संघात, समु-

दाय, तो निराळा करून व तोच मी असा अहंकार त्या देहाचे ठिकाणीं आरोपित करून 'ही माझी बुद्धि, हा माझा आत्मा' असा अज्ञानी मनुष्याचा व्यवहार होत असतो. तेव्हां हाच व्यवहार कायम ठेवून भगवंतांनीं 'माझा आत्मा' असें वाक्य उपयोजिलें आहे. 'राहूचें शिर' हा जसा प्रयोग आहे, तसाच 'माझा आत्मा' हा प्रयोग होय. असो; यावरूनही आत्मा भूतस्थ नाहीं असेंच सिद्ध होतें; कारण देहसंघातच मुळीं कल्पित आहे.

**प्रपाकार**—गेल्या श्लोकांत 'माझ्यामध्यें सर्व भूतें आहेत' असें सांगितलें व येथें 'तीं नाहींत.' असें सांगतात. चवथ्या श्लोकांत भासरूपानें जगत् परमेश्वराचे ठिकाणीं स्फुरण पावतें असें सांगितलें आणि ५ श्लोकांत परमार्थतः परमेश्वराचे ठिकाणीं जगत् नाहीं असें सांगतात. "**सौम्यांभसि यथा वीचिर्न चास्ति न च नास्ति च । तथा जगद्ब्रह्मणीदं शून्याशून्यपदं गतं** ( सौम्य ! पाण्यामध्यें जशी लाट असते असें नाहीं व नसते असेंही नाहीं; त्याचप्रमाणें हें जगत् ब्रह्मामध्यें आहे असें नाहीं व नाहीं असेंही नाहीं; म्हणजे तें अज्ञातकाळीं भासतें व ज्ञानकाळीं भासत नाहीं. )" 'ऐश्वरं योगं=ईश्वराबरोबर उत्पन्न झालेला अध्यासिक संबंध (माया;)' 'भूतभावनः=ज्याच्यामध्यें भूतें कल्पिली जातात असा.'

**मधुसूदन**—ऐश्वरं=अघटनघटना चातुर्य. मी कशाचा आधेय नाहीं, आधार नाहीं, तथापि सर्वांमध्यें मी आहें व माझ्यामध्यें सर्व आहे. अशा-प्रकारचें माझें मायावी स्वरूप आहे. **पर्वत** यांणीं केलेला विस्तार अवश्य वाचावा.

**श्रीधर**—भूतांचे पालन करणारा तो भूतभावन. ज्याप्रमाणें जीव हा देहाचें पालन पोषण अहंकार-वश होऊन करितो व देहाशीं संबद्ध होतो, तसा जगाचे पालन पोषण करणाऱ्या ईश्वरास अहंकार नसल्या-मुळें त्याच्याशीं तो संबद्ध होत नाहीं.

**शंकरानंद व द्विवेदी** यांनीं 'परमात्मा व जगत्, यांचा संबंध कोणता आहे यावर व्याख्यानें लिहिलीं आहेत तीं अवश्य वाचावीं.

**श्रीरामानुज**—मी आपल्या संकल्पानें सर्वांचा पोषक, धारक व नियामक आहे. हा अर्थ पुढील दृष्टांतास जुळत नाहीं.

**द्वैतवादी**—मम आत्मा = माझा चेतनायुक्त देह. भगवंतावर जर भूतें आश्रय धरून आहेत तर जसें भूतांचें स्पर्शादि ज्ञान होतें तसें भगवंताचेंही व्हावें; या शंकेचें निरसन येथें करितात. शिवाय **'अशब्दं, अस्पर्शं, अरूपं'** अशी भगवंतासंबंधें श्रुति आहे. या श्लोकावरून ईश्वरसामर्थ्याची कल्पना करितां येते. 'माझा देह भूतांची उत्पत्ति करणारा असून तो माझ्यासारखाच भूतस्थ नाहीं.' असा उत्तरपंक्तीचा अर्थ करितात.

**ज्ञानेश्वरांनीं** पुष्कळसे दृष्टांत दिल्यावर म्हणतातः **जरी सोनें लेणें** ( अलंकार ) **होऊनि घडे । तरी तयाचें सोनेंपण न मोडे । येर अलंकार हे वरिचिलीकडे** ( वर वर असणारे ) **। लेतयाचेनि भावें ॥** अंगावर घालणारास काय तें अलंकारपण वाटत आहे. बाकी सोनारास, विकत घेणारास व चोरास तें सोनेंच दिसणार! **तैसी इये निर्मळ माझ्या स्वरूपीं । जो भूतभावना आरोपी । तयासी तयाच्या संकल्पीं । भूताभास असे ॥ तेची कल्पिती** ( कल्पना करणारी ) **प्रकृति पुरे । तरी भूताभास आधीं सरे । मग स्वरूप उरे एकसरें । निखळ** ( शुद्ध ) **माझें ।**

**डेव्हिस**—योग = मायावीपणा. **तेलंग**-योग = सामर्थ्य ॥ ५ ॥

**यथोक्तेन श्लोकद्वयेनोक्तमर्थं दृष्टान्तेनोपपादयन्नाह—**

मागच्या श्लोकद्वयांत जो सिद्धांत सांगितला त्याची उपपत्ती स्पष्ट व्हावी म्हणून दृष्टांतरूपानें सांगतातः—

**यथाकाशस्थितो नित्यं**
**वायुः सर्वत्रगो महान् ॥**
**तथा सर्वाणि भूतानि**
**मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥**

**यथा नित्यं आकाशस्थितः महान् वायुः सर्वत्रगतः** ( ज्या प्रमाणें सदैव निरवयव आकाशामध्यें राहणारा सर्वगामी महावायु असतो ) **तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानि इति** ( त्याच प्रमाणें सर्व भूतें माझ्या ठिकाणीं राहतात असें ) **उपधारय** ( समजून घे ). सारांश स्पष्टच आहे.

**यथा लोक आकाशस्थित आकाशे स्थितो नित्यं सदा वायुः सर्वत्र गच्छतीति सर्वत्रगो महान्परिमाणस्तथाऽऽकाशवत्सर्वगते मय्यसंश्लेषेणैव स्थितानीत्येवमुपधारय जानीहि ॥ ६ ॥**

या विश्वांत काय चमत्कार दृष्टीस पडतो? तर सर्वगामी जो मर्यादाशून्य महावायु ( पंचमहाभूतांपैकीं एक ) तो सदैव म्हणजे उत्पत्ति, स्थिति व संहार या तिन्ही काळीं निरवयव आकाशामध्येंच राहतो. पण त्या आकाशास वायूचा संबंध असत नाहीं. त्याचप्रमाणें आकाशादि सर्व पंचमहाभूतें व अनंत सूक्ष्मभूतें हीं, निष्क्रिय, निराकारी, परिपूर्ण, निरंतर जो मी त्या माझ्यामध्येंच राहतात असें जाणून घे. मात्र माझा व त्यांचा संसर्गसंबंध नसतो; म्हणजे ह्या आकाशादिकांच्या संश्लेषापासून मला कोणत्याही प्रकारचा लेप उत्पन्न होत नाहीं. एवंच आधार आणि आधेय यांचा संबंधच हवा असतो असें नाहीं.

**शिष्य**—म्हणजे सूर्याच्या आधारानें पृथ्वी शून्याकाशांत फिरते, म्हणून पृथ्वीचा संपर्क जसा सूर्यास नाहीं तद्वतच ना हा संबंध?

**गुरु**—होय. ज्याप्रमाणें विशुद्ध आकाशांत सहसाच अभ्रमंडळ उत्पन्न होऊन लयही पावतें, त्याप्रमाणें आत्म्यामध्यें जगत् उत्पन्न होऊन लय पावतें. अर्थात हे सर्व दृष्टांत एकदेशी आहेत.

**शंकरानंद**—‘**एतावानस्य महिमाऽतो ज्यायांश्च पूरुषः। पादोऽस्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि**’ ही सर्वप्रसिद्ध श्रुति देतात.

**नीलकंठः**—४ व ५ श्लोकांत निरुपाधिक ब्रह्म सांगितलें. ६ व्यांत जीवाचें ब्रह्माशीं ऐक्य आहे हें सदृष्टांत सांगितलें. वायु

म्हणजे सूत्रात्मा हा जसा सर्वव्यापी असून आपल्या कारणामध्यें (अव्याकृत आकाशांत) त्रिकाल राहतो, त्याचप्रमाणें उपाधिशून्य जीव स्वकारणामध्यें म्हणजे, अव्याकृत ब्रह्मांत राहतो. सारांश ब्रह्मच असतो. म्हणून अध्यात्म म्हणजे स्वभाव असें ८ व्या अध्यायांत सांगितलें त्याचाच येथें विस्तार केला आहे असें म्हणावें. हा अर्थ **धनपतीस** संमत नाहीं. कारण शुद्ध त्वं पदार्थ दाखविणारें विशेषण या श्लोकांत नाहीं. स्थावर जंगम पदार्थ घेणेंच येथें इष्ट आहे आचार्यांचा अर्थच बरोबर आहे.

**पर्वते**—या श्लोकांत 'ब्रह्म' हे निर्विकार, निरूपाधिक व अक्षर कसें आहे तें सांगितलें. वायु म्हणजे सूत्रात्मा, हिरण्यगर्भ; आणि आकाश म्हणजे ब्रह्म असा दृष्टांताचा अर्थ घेतात.

**रामानुज**—'निरालंब आकाशांत वायु माझ्या सत्तेनें संचार करितो, त्याप्रमाणें माझ्या सत्तेनें सर्व भूतें माझ्या मध्यें असतात' असा अर्थ करितात. ही दृष्टांतयोजना ठीक नाहीं हें वर सांगितलेंच आहे.

**द्वैतवादी**—'आकाशांत राहणारा वायु सर्वत्र संचार करित असतांही त्याला जसा शैत्याचा अगर सुगंधाचा संपर्क होत नाहीं;' असा अर्थ करितात हा समंजस नव्हे; कारण आकाशांत राहणारा हें पद व्यर्थ होतें; आकाशाला वायूचा लेप होत नाही हा अर्थ हवा आहे.

**ज्ञानेश्वर—पै गगन जेवढें जैसें। पवनही गगनीं तेवढाच असे। सहजें हालविल्या वेगळा दिसे। येऱ्हवीं गगन तेंची तो॥** ह्यानें परब्रह्म आणि माया व तिचें कार्य प्रकृति यांचा काल्पनिक संबंध किती लवकर कळतो! पुढचें व्याख्यान उत्तम आहे.

**पंडित—कीं नभीं वायु तैसीं भूतें आत्म्यांत। जितकीं बुद्धीस विदित तीं प्रत्यया येतीं त्यांत। जैसा महावायु प्रत्यया असे येत। श्रवणेंद्रियां त्वगिंद्रियांसी॥ प्रत्यया येतां नुरला। तो वायु त्याच गगनीं असे भरला। जैसें हें सत्य वाटतें तुजला। तैसी तीं हीं भूतें त्याच आत्म्यांत हे समज॥....अगा**

मजशीं ऐक्य झालें । परी माझें ईश्वरत्व तुज नाहीं आलें । म्हणोनि सर्वसाक्षित्व राहिलें । त्यामुळें तुज हा संदेह ॥ या पंडितसिद्धांतावरून त्यांचा मतभाग कळून येईल ॥ ६ ॥

**एवं वायुराकाश इव मयि स्थितानि सर्वभूतानि स्थितिकाले तानि--**

याप्रमाणें वायु आकाशांत राहतो, त्याचप्रमाणें माझ्याठायीं जीं सर्व भूतें स्थित असतात तीं--

**सर्वभूतानि कौन्तेय**
**प्रकृतिं यान्ति मामिकाम् ॥**
**कल्पक्षये पुनस्तानि**
**कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ ७ ॥**

**कौन्तेय** ( कुंतीपुत्रा ) **कल्पक्षये सर्वभूतानि मामिकां प्रकृतिं यान्ति** ( कल्पाचा क्षय होण्याचा समय प्राप्त झाला असतां–तीं–सर्वभूतें माझ्या प्रकृतीचे ठिकाणीं लीन होतात; त्या प्रकृतीमध्यें अंतर्भूत होतात. ) **तानि पुनः कल्पादौ अहं विसृजामि** ( पुनः तींच भूतें मी कल्पाच्या आरंभीं उदयास आणितों. )–सारांश कर्मबद्ध भूतांची उत्पत्ति, स्थिति व लय ह्या गोष्टी परमेश्वराधीन आहेत.

**सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं त्रिगुणात्मिकामपरां निकृष्टां यान्ति मामिकां मदीयां कल्पक्षये प्रलयकाले । पुनर्भूयस्तानि भूतान्युत्पत्तिकाले कल्पादौ विसृजाम्युत्पादयाम्यहं पूर्ववत् ॥ ७ ॥**

अर्जुना! कल्पक्षयाचे वेळीं ब्रह्मदेवाचा प्रलयकाल प्राप्त झाला असतां हीं सर्व जड पंचमहाभूतें व तज्जन्य अनंत जड पदार्थ हे सर्व आपआपल्या कारणांसह माझी (माझ्या स्वाधीन असणारी) जी जड प्रकृति आहे ( अध्याय ७ श्लोक ४ व ५ पहा )–जेथें जडत्व आहे तेथें जन्ममृत्यु आहे. हीच प्रकृति होय—ह्या प्रकृतीमध्यें.

**शिष्य**—हीच प्रकृति त्रिगुणात्मक आहे नाहीं बरें ?

**गुरु**—होय. या कल्पित प्रकृतीमध्यें सर्व पदार्थ सूक्ष्मरूपानें अंतर्भूत होतात. आणि नवीन कल्पाला आरंभ झाला म्हणजे त्यांच्या त्यांच्या कर्मानुसार त्या लीन झालेल्या भूतांची उत्पत्ति मी करितों. 'धाता यथापूर्वं अकल्पयत्' हें वाक्य सर्वप्रसिद्धच आहे. शिवाय मी परमेश्वर सर्वज्ञ आणि सर्वशक्ति आहे. तेव्हां स्वकर्मानुसार ज्याला त्याला योग्य असा मी जन्म देतों.

**ज्ञानेश्वर**—एकच दृष्टांतः-ग्रीष्माच्या अतिरसीं (उष्णकाळीं) सबीजें तृणें जैसीं । मागुतीं भूमीसी । सुलीनें होतीं ॥

**पंडित**—एवंच अज्ञानयुक्त जे उरले । ते प्रकृतीतें पावले । तेची येथें बोलिले । सर्वभूतें म्हणोनि ॥....॥ ७ ॥

एवमविद्यालक्षणाम्--

या प्रकारची अविद्यानामक जी—

> **प्रकृतिं स्वामवष्टभ्य**
> **विसृजामि पुनःपुनः॥**
> **भूतग्राममिमं कृत्स्न-**
> **मवशं प्रकृतेर्वशात् ॥ ८ ॥**

**स्वां प्रकृतिं अवष्टभ्य पुनःपुनः इमं कृत्स्नं भूतग्रामं विसृजामि** (माझी जी प्रकृति आहे तिच्यावर सत्ता चालवून मी पुनः पुनः हा सर्व भूतसंचय निर्माण करितों.) **प्रकृतेः वशात् अवशं** (हा सर्व भूतसमूह प्रकृतिला, अविद्येला, कर्मजन्य फलाला, वश झालेला असल्यामुळें सर्वथा परतंत्रच आहे.)

प्रकृतिं स्वां स्वीयामवष्टभ्य वशीकृत्य विसृजामि पुनः पुनः प्रकृतितो जातं भूतग्रामं भूतसमुदायमिमं वर्तमानं कृत्स्नं समग्रमवशमस्वतन्त्रमविद्यादिदोषैः परवशीकृतं प्रकृतेर्वशात्स्वभाववशात् ॥ ८

माझी जो अविद्यालक्षणात्मक अपरानामक मी स्वसंकल्पानें उत्पन्न केलेली प्रकृति आहे तिला आपल्या ( माझ्या ) स्वाधीन ठेऊन मी हीं सर्व विश्वें व त्यांतील सर्व चतुर्विध भूतसमुदाय पुनः पुनः उत्पन्न करित असतों.

**शिष्य**--'पुनः पुनः' हें पद 'संसार अनादि आहे' हें दाखविण्यासाठींच घातलें आहे ना?

**गुरु**--होय. पुनः हीं सर्व विश्वें अविद्या, अहंकार, इत्यादि दोषांनीं परिपूर्ण असल्यामुळें सर्वथा प्रकृतीच्या स्वाधीन असतात. त्यांस कसलेंही स्वातंत्र्य प्रकृतीच्या राज्यांत असत नाहीं. म्हणजे जीवदृष्टीनें त्यांस स्वातंत्र्य असलें तरी पूर्वकर्मानें उत्पन्न झालेल्या स्वभावाचें जोरदार सामर्थ्यानें ही त्यांची स्वतंत्रता फलोत्पादक होत नाहीं. सारांश पूर्व कर्मानुसार पुनः पुनः संसारामध्यें प्राण्यास 'येरझाऱ्या' घालाव्या लागतात. सर्वशुद्धि होऊन परब्रह्मज्ञान होईपर्यंत जन्ममरणाच्या चक्रांत असलेंच पाहिजे, असा साक्षित्वानें असणाऱ्या विभूचा नियम आहे.

**मधुसूदन, रंगनाथ, पर्वते**--सृष्टि मायामय आहे असें सिद्ध करितात. मायेला स्वकल्पनेनें उत्पन्न करून व स्वसत्ता व स्वस्फूर्ति यांनीं तिला दृढ करून तिच्या करवीं अविद्या--अस्मिता--इत्याद्यात्मक जग मीं उत्पन्न करितों. सारांश स्वकर्मानें उत्पन्न होत असलेल्या विश्वाचा मी साक्षी आहें.

**शंकरानंद**--'**य एकवर्णः बहुधा शक्तियोगात्। वर्णाननेकान्निहितार्थान्दधाति। विचैति चान्ते विश्वमादौ स देवः। सनो बुद्ध्या शुभया संयुनक्ति॥** जो एकच परमात्मा अनेक प्रकारच्या सामर्थ्यानें अनंत विश्वें निर्माण करून लयाप्रत नेतों व प्रत्येकांकडून त्याच्यात्याच्या कर्मप्रमाणें भोग भोगवितो, तोच देव आपणास मंगलकारक बुद्धि देतो.) प्राण्याच्या कर्मनिमित्तानेंच मी स्रष्टा, धाता, भर्ता, नेता इत्यादि होतों.

**द्वैतवादी**--**न कुत्रचिच्छक्तिरनंतरूपा। विहन्यते तस्य महेश्व-**

रस्य । तथाऽपि मायामधिरुह्य देवः । प्रवर्तते सृष्टिविलापनेषु । ( त्या महादेवाची शक्ति अनंतरूप व अकुंठित आहे तथापि तो मायेचा स्वीकार करून सर्गविसर्गाचें काम करितो. पायानें चालणारा गृहस्थ जसा काठी घेऊन जातो तसा परमात्मा विष्णु मायेचा आश्रय करितो ). ' अवष्टभ्य=उपादानस्वरूपानें घेऊन ' ' स्वां=माझ्या स्वाधीन असणारी. '

ज्ञानेश्वर--....मी प्रकृती अधिष्ठीं तें कैसें । जैसा स्वप्नीं जो असे । मग तोचि प्रवेशे । जागृतावस्थे ॥ तरी स्वप्नौनि जागृती येतां । काय पाय दुखती पंडुसुता ? । कीं स्वप्ना माजी असतां । प्रवास होय ? ॥ .... जळीं चंद्रकेचिया वेली । ते वाढी चंद्रें नाहीं केली । तेवीं मातें पावोनि ठेलीं । दूरी कर्में ॥ इतर दृष्टांत चिरस्मरणीय आहेत.

पंडित—प्रकृतिं स्वां अधिष्ठाय ह्मणोनि । प्रकृति भिन्न नसें असें स्वशब्देंकरूनि । सुचवी कीं कार्यकारणावस्था दोन्ही । प्रकृतीच्या, मजवेगळ्या नसती हा भाव ॥

डेव्हिस, टामसन--अवष्टभ्य=माझ्या प्रकृतीचा आश्रय घेऊन हा अर्थ ईश्वरास कर्मीपणा आणणारा आहे. ॥ ८ ॥

तर्हि तस्य ते परमेश्वरस्य भूतग्रामं विषमं विदधतस्तन्निमित्ताभ्यां धर्माधर्माभ्यां संबन्धः स्यादितीदमाह भगवान्--

शिष्य—भगवन् ! याप्रमाणें अनंत भूतांस निरनिराळी उत्पत्ति, स्थिति, लय, देणाऱ्या परमेश्वराचा, संबंध अर्थात पुण्यकारी व पापकारी कृत्यांशीं येत असलाच पाहिजे; सारांश परमेश्वर विकारवंत होत असला पाहिजे.

गुरु—तसें नाहीं हें सांगण्यासाठीं भगवान म्हणतात—

**न च मां तानि कर्माणि**

**निबध्नन्ति धनंजय ॥**

उदासीनवदासीन-
मसक्तं तेषु कर्मसु ॥ ९ ॥

धनंजय (अर्जुना!) तेषु कर्मसु उदासीनवत् आसीनं, असक्तं मां तानि कर्माणि न च निबध्नन्ति (त्या कर्मांमध्यें उदासीनपणानें वागणाऱ्या निरंजनरूपी मला हीं उत्पत्ति इत्यादि कर्में मुळींच बद्ध करित नाहींत. मी या कर्मांपासून पूर्णतः व सर्वशः अलिप्त असतों.)

**न च मामीशं तानि भूतग्रामस्य विषमविसर्गनिमित्तानि कर्माणि निबध्नन्ति धनंजय। तत्र कर्मणामसंबन्धत्वे कारणमाह–उदासीनवदासीनं यथोदासीन उपेक्षकः कश्चित्तद्वदासीनमात्मनोऽविक्रियत्वादसक्तं फलासङ्गरहितमभिमानवर्जितमहं करोमीति तेषु कर्मसु। अतोऽन्यस्यापि कर्तृत्वाभिमानाभावः फलासङ्गाभावश्चाबन्धकारणमन्यथा कर्मभिर्बध्यते मूढः कोशकारवदित्यभिप्रायः॥ ९ ॥**

ह्या पंचमहाभूतात्मक सृष्टीमध्यें अनंतभूतें त्यांच्या त्यांच्या भिन्न व विषम कर्मानुसार निर्माण करित असतां ही सर्वाध्यक्ष जो मी ईश्वर, त्या मला हीं कर्में बद्ध करूं शकत नाहींत. पुण्यपापांचा संपर्क मला होत नाहीं. मी पुण्यपापातीत आहे; व तीं सुखदुःखें, पापपुण्यें, अनुग्रहनिग्रह मिथ्या आहेत. सर्वत्र पर्जन्य सारखाच पडला असतां कोठें बीज चांगलें उगवतें, कोठें त्याचा नाश होतो म्हणून पर्जन्याच्या ठिकाणीं जसें वैषम्य असत नाहीं, म्हणजे जशी जमीन असेल व जसें बीज असेल त्यात्याप्रमाणें फलोत्पत्ति होते, तसाच परमेश्वरी प्रकार आहे. कल्पवृक्षाखालीं हजारो लोक बसले असतांही प्रत्येक पुरुषास त्याच्या त्याच्या इच्छेनुसार जसें फल मिळतें, येथें कल्पवृक्षावर पक्षपाताचा जसा आपण आरोप करित नाहीं, त्याचप्रमाणें जगांत दिसणाऱ्या सुखदुःखाच्या संबंधानें ईश्वरावर दोष देणें

रास्त होणार नाहीं. ज्याच्या त्याच्या कर्मांप्रमाणें प्रत्येकांस सुखदुःख होत असतें. इच्छेनुसार कर्म होतें. इच्छा करण्याचें सामर्थ्य जीवास स्पष्ट आहे. ह्या स्वातंत्र्याचा सदुपयोग केलातर मोक्षमार्गांत मिळणारी शांति मिळते; दुरुपयोग केल्यास विकारवंत सुखदुःखें होतात. तात्पर्य, ईश्वरानें अनुग्रह केला किंवा त्यानें निग्रह, दंड, केला हें म्हणणें बरोबर नाहीं. सारांश स्वकर्माचें फल जीवास मिळतें, व तें ईश्वरी-न्यायानें मिळतें.

**शिष्य**—वरील कर्में करूनही परमेश्वराला कसें निर्लेपत्व मिळतें?

**गुरु**—कारण परमेश्वर उदासीन असतो. दोघांचा तंटा चालला असतां एखादा प्रेक्षक जसा विकारशून्य असतो, जसा तो वादी-प्रति-वादींमधील हर्षविषाद, जयापजय इत्यादि सर्वांची उपेक्षा करितो, तसाच परमेश्वरही उदासीन राहून साक्षित्वानें स्थित असतो. याप्रमाणें उदा-सीन आहे, विकारशून्य आहे म्हणून त्याला निःसंग म्हणावयाचें! फलाची आसक्ति व कर्तृत्वाचा अभिमान हीं दुकळ जेथें कायम असते तेथें विकार उत्पन्न होतात; त्या पुरुषास आपण 'सक्त' असें म्हणतों. परमेश्वराला फलेच्छा नाहीं किंवा कर्तृत्वाचा अभिमानही नाहीं म्हणून तो असक्त आहे व पूर्णस्वरूप आहे. **कर्मासक्तिर्हि बंधहेतुः**' (कर्माची आसक्ति हें बंधास कारण आहे). मी पूर्ण-काम आहें म्हणून मला आसक्ति नाहीं; म्हणून मी बद्ध नाहीं.

**शिष्य**—यावरून असाच एक उपसिद्धांत निघेलसा दिसतो कीं, परमेश्वराप्रमाणें जर दुसरा कोणी कर्तृत्वाभिमानशून्य व फले-च्छाशून्य ( वासनाविरहित ) असेल तर त्याला ही बंध व्हावयाचा नाहीं. बंध नको असेल, अबंध पाहिजे असेल, पारतंत्र्य नको असेल, व स्वातंत्र्य पाहिजे असेल तर वासनात्याग आणि कर्तृत्वाभिमानत्याग अवश्य असून अविक्रिय परमात्म्याचा साक्षात्कार करून घेतला पाहिजे. नाहीं तर ज्या प्रमाणें कोळी हा आपणच जाळें उत्पन्न करून त्या-मध्यें आपणच सांपडतो, त्याचप्रमाणें वासना व अभिमानयुक्त कर्म करून त्या कर्मांच्या जाळ्यांत प्राणी अडकतील. ह्याच न्यायानें प्राणी अडकतात हीं आहेतच नाहीं बरें?

गुरु--अगदीं बरोबर. सारांश वासना व अभिमान हीं दुःखास कारण आहेत. वासनाविरहित आणि अभिमानशून्य जें कर्म त्याला कर्तव्यस्वरूप, श्रेष्ठस्वरूप, चित्तशुद्धिस्वरूप येत असतें.

द्वैतवादी—' असक्ति = अनादर व अनायास. ' वस्तुतः अनुदासीन असतांही मी उदासीनपणानें, जें जें कर्म करितों त्यांत मला आसक्ति नसते. या कारणानें उत्पत्ति-स्थित्यादि कर्म मी करितों.

ज्ञानेश्वरांचे दृष्टांत वाचावे.

पंडितांचा अपसिद्धांतः भाव हा कीं उदासीन । मी होय परी जे भक्तजन । त्यांच्या ठायीं मी जगज्जीवन । उदासीन नव्हे सर्वथा ! ॥ पंडित अद्वैतवादी खरे, पण भक्तिची त्यांस अनावर आवड! म्हणून त्यांस पुष्कळ प्रसंगी शब्दांची भारी ओढाताण करावी लागते. ईश्वरत्व प्राप्त झाल्यानंतरच भक्तांस अगर ज्ञानी पुरुषांस निर्गुण मुक्ती मिळते हें पंडितांच्या लक्षांत आले नाहीं असें वाटतें. ॥ ९ ॥

तत्र भूतग्राममिमं विसृजाम्युदासीनवदासीनमिति च विरुद्धमुच्यत इति तत्परिहारार्थमाह--

शिष्य—तथापि भगवन् ! 'मी हा सर्व भूतग्राम उत्पन्न करितों' व 'मी उदासीनपणें राहतों' हीं वचनें विरोधिच आहेत.

गुरु–हा विरोधाचा आभास नष्ट करण्यासाठींच भगवान म्हणतात.–

**मयाऽध्यक्षेण प्रकृतिः**
**सूयते सचराचरम् ॥**
**हेतुनाऽनेन कौन्तेय**
**जगद्विपरिवर्तते ॥ १० ॥**

**मया अध्यक्षेण प्रकृतिः चराचरं सूयते** ( मी अध्यक्ष या नात्यानें आहे म्हणून प्रकृति स्थावरजंगम पदार्थांस उत्पन्न करित असते ) **कौन्तेय** ( अर्जुना ! ) **अनेन हेतुना जगत् विपरिवर्तते** ( याच कारणामुळें हें अनंतकोटी ब्रह्मांड जन्ममरणाच्या परिभ्रमणांत सांपडलेलें आहे ).—

मया सर्वतो दृशिमात्रस्वरूपेणाविक्रियात्मनाऽध्यक्षेण मम मायां त्रिगुणात्मिकाऽविद्यालक्षणा प्रकृतिः सूयत उत्पादयति सचराचरं जगत् । तथा च मन्त्रवर्णः—"एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा । कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षी चेता केवलो निर्गुणश्च" इति । हेतुना निमित्तेनानेनाध्यक्षत्वेन कौन्तेय जगत्सचराचरं व्यक्ताव्यक्तात्मकं विपरिवर्तते सर्वावस्थासु । दृशिकर्मत्वापत्तिनिमित्ता हि जगतः सर्वा प्रवृत्तिरहमिदं भोक्ष्ये पश्यामीदं शृणोमीदं सुखमनुभवामि दुःखमनुभवामि तदर्थमिदं करिष्याम्येतदर्थमिदं करिष्य इदं ज्ञास्यामीत्याद्याऽवगतिनिष्ठाऽवगत्यवसानैव "यो अस्याध्यक्षः परमे व्योमन्" इत्यादयश्च मन्त्रा एतमर्थं दर्शयन्ति । ततश्चैकस्य देवस्य सर्वाध्यक्षभूतचैतन्यमात्रस्य परमार्थतः सर्वभोगानभिसंबन्धिनोऽन्यस्य चेतनान्तरस्याभावे भोक्तुरन्यस्याभावात्किंनिमित्तेयं सृष्टिरित्यत्र प्रश्नप्रतिवचने अनुपपन्ने "को अद्धा वेद क इह प्रवोचत्कुत आजाता कुत इयं विसृष्टिः" इत्यादिमन्त्रवर्णेभ्यः । दर्शितं च भगवताऽज्ञानेनाऽऽवृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तव इति ॥ १० ॥

मी केवळ साक्षित्वानें राहणारा, विकारशून्य राहून अध्यक्षत्वानें असणारा आहे. मी साक्षी आहे म्हणून माझी जी त्रिगुणात्मक माया आहे, जी केवळ ज्ञानशून्य आहे, ती माया (प्रकृति) मत्सांनिध्यानें व मत्स्फूर्तीनें हें सर्व चराचर विश्वचक्र उत्पन्न करित आहे. श्वेताश्वतर उपनिषदामध्यें एक मंत्र आहे त्याचाही अर्थ वरील सिद्धांताला पुष्टिच देतोः "एक, प्रकाशात्मक, सर्व भूतांमध्यें गुप्तरीतीनें वास करणारा, सर्वव्यापी सर्व भूतांच्या अंतर्यामी राहून त्यांचें नियमन करणारा, सर्व कर्मांचा अध्यक्ष, सर्व भूतांचें आश्रयस्थान सर्वसाक्षी, चित्स्वरूप, केवलस्वरूप आणि गुणशून्य" असा परमात्मा आहे. तो साक्षीभूत असल्यामुळें प्रकृतीस

आभासिक अस्तित्व येऊन तिच्या करवीं जन्ममरणाचें चक्र फिरलें जात आहे. परब्रह्म साक्षीस्वरूपानें आहे म्हणून हें सर्व चराचर व मूर्तामूर्त विश्व अनेक अवस्था, अनंत स्वरूपें धारण करून संसार-सागराच्या प्रचंड लाटांवर हेलकावे खात राहिलें आहे.

**शिष्य**—हें नाहीं मला नीटसें समजलें. मला नव्हे; पण इत-रांस अशी सहज शंका येते कीं ह्या विश्वाच्या उत्पत्तिस्थितिलयास कोणीही कारण नसून केवळ तें आपल्या नैसर्गिकसामर्थ्यानें परिभ्र-मण करित आहे. येथें नियंता, नियामक कोणी असावा, किंवा आहे, असें पुष्कळांस वाटत नाहीं.

**गुरु**—ही शंका चांगली आहे. हिचा विचार आचार्यांनीं ब्रह्म-सूत्रभाष्यामध्यें उत्तम केला आहे. आतां येथें इतकेंच सांगतों कीं हेतु साध्य करणारें निश्चयात्मक कर्म ज्ञानवंतकर्ता असल्यावांचून होत नाहीं. केवळ जड वस्तूला हेतु असणें व तो हेतु साध्य करण्यासाठीं त्या जडानें प्रयत्न करणें ह्या गोष्टी साध्य नाहींत. सहेतुक कर्म करण्यास ज्ञानकलाच हवी असते. असो; या जगाचा उदयकालीन, स्थिति-कालीन व संहारकालीन व्यवहार पाहिला असतां असें स्पष्ट दिसतें कीं ह्या सर्व व्यवहारास ज्ञान हें निमित्तकारण किंवा निदान साक्षित्वानें असणारें तरी कारण आहे. पहा: आपणच व्यावहारांत ज्या अनेक क्रिया करितों त्याचेंच उदाहरण घेऊन पाहूंया: ‘ मी या विषयाचा उप-भोग घेतों, मी हें पाहतों; किंवा ऐकतों, हें मी सुख भोगितों, हें दुःखकारक आहे, ह्यासाठीं मी हें काम करीन, त्यासाठीं मी तें काम करणार नाहीं, हें मी माहित करून घेईन ’ इत्यादि सर्व भाव-निष्ठ, विचारनिष्ठ, वासनानिष्ठ, व ज्ञाननिष्ठ व्यवहार चिज्जन्य व चित्परिणामी ह्मणजे चैतन्यात्मक आहेत. ज्ञानानें त्यांचा उदय झाला आहे किंवा त्यांचें पर्यवसान ज्ञानांत होणार आहे. एवंच सर्व सहेतुक व निश्चित व्यवहार चैतन्यात्मक आहेत. केवळ जडात्मक मायेला स्वतः सहेतुक कर्म करण्याचें सामर्थ्य असणें शक्य नाहीं. जड वस्तूस ‘ चांगलें, वाईट ’ हा प्रश्न नाहीं; केवळ चैतन्यात्मक ब्रह्मा-च्या ठिकाणींही ‘ सर्वच चांगलें असल्यामुळें ’ चांगल्या वाइटाचा प्रश्न

नाहीं. पण चैतन्याधिष्ठित हें जें विश्व आहे, त्या विश्वांत चांगले वाइटाचा प्रश्न येतो व तदर्थक कर्म होतें; तें कर्म चैतन्याव्यतिरिक्त होणें शक्यच नाहीं. असो; 'जो निर्विकार या सर्व विश्वाचा अध्यक्ष असून अंतःकरणामध्यें वास करितो' इत्यादि मंत्र आहेत, यांचा तरी अर्थ हाच आहे. सारांश सर्वांचा अध्यक्ष असून चैतन्य मात्र असणारा जो एक प्रकाशवंत व ज्ञानवंत परमात्मा, ज्याला वास्तविक रीतीनें कोणत्याही भोगाची अपेक्षा नाहीं, व भोगसंबंध नाहीं, तो सदैव चैतन्यमात्रत्वानें स्थित असतो, त्याच्याशिवाय चैतन्यवंत असा दुसरा कोणी नाहीं, किंवा भोग भोगणारा ही वास्तविक रीतीनें कोणी नाहीं; अशी वस्तुस्थिति असतां 'ही सृष्टि कां उत्पन्न झाली, कोणीं केली' इत्यादि प्रश्न व त्यांचीं उत्तरें, सारांश हा सर्व खटाटोप व्यर्थच आहे. 'हें कोणास विदित आहे, कोण या संबंधीं बोलूं शकेल, ही सृष्टि कोठून आली? इत्यादि श्रुतिमंत्रान्वयें वरील प्रश्न व्यर्थ होत. कारण ह्या प्रश्नांचीं उत्तरें कोणालाही देतां येणार नाहींत.

**शिष्य**—परब्रह्माव्यतिरिक्त चैतन्य नाहीं,' परब्रह्माला भोग अगर भोगसंबंध नाहीं, हें मला समजलें; पण दुसरा कोणीही भोक्ता नाहीं, हें मात्र समजत नाहीं. कारण प्रपंचामध्यें सुखदुःख भोगणारे अनंत प्राणी आहेत, हें स्पष्ट दिसतें आहे.

**गुरु**—अरे! पांचव्या अध्यायाच्या १५ व्या श्लोकांत 'अज्ञानानें सर्व ज्ञान झांकून टाकल्यामुळें प्राण्यास मोह पडतो' हा विचार विसरलास वाटतें. 'मी सुखदुःखाचा भोक्ता आहें' हें भान अज्ञानजन्य आहे.

**शिष्य**—क्षमा करा भगवन्! 'ही सृष्टि कां व कोणीं उत्पन्न केली' हें अद्यापि मला समजलें नाहीं.

**गुरु**—आणि अज्ञान आहे तोंपर्यंत समजावयाचें ही नाहीं. वत्सा! ही सृष्टि कां व कोणी उत्पन्न केली?' इत्यादि अज्ञानजन्य प्रश्नांच्या योगानें मनुष्य प्राण्यास अत्यंत तळमळ लागून तो हे प्रश्न उकलण्याच्या सत्प्रयत्नांमध्यें सृष्टि-विषयक अनेक शोध लावून विषयाची व विषयज्ञानाची सीमा वाढवितो व वाढवील यांत शंका नाहीं. तथापि

हे प्रश्न निरुत्तर आहेत हें ही प्रत्येकानें समजून घेतलें पाहिजे. पहाः भोगासाठीं ही सृष्टि उत्पन्न केली असें म्हटलें तर भोगाचा अनुभव येण्यास चैतन्य हवें आणि तें चैतन्य एका परमात्म्यावांचून अन्यत्र आढळून येत नाहीं. परमात्मा भोगानुभव घेतो, असें म्हणावें तर तो कूटस्थ ( निर्विकार ) असल्यामुळें त्यानें भोग भोगणें हें विरोधात्मक होतें. मोक्षासाठीं सृष्टीची उत्पत्ति आहे, असें म्हणावें, तर इकडून ही विरोध येतो. कारण अज्ञानानें काल्पित झालेली सृष्टि ज्ञानपूर्ण मोक्ष कसा देणार? परमात्म्यानें सृष्टि उत्पन्न केली म्हणावें, तर जो असंग, कूटस्थ, सर्वसाक्षी व निष्कर्मशाली, तो ही सृष्टि कां उत्पन्न करील? एवंच केवळ युक्तिवादानें या प्रश्नांचा उलगडा होणें नाहीं. समजलें? ही सर्व माया आहे. पुरुषार्थदृष्टीनें सृष्टि ही अज्ञान कल्पित आहे. वास्तविक पहातां सृष्टिच नाहीं, मग उत्पत्ति अगर लय कोठून संभवणार? एवंच या प्रश्नाचा उलगडा श्रुतिवाक्यांशिवाय केवळ युक्तिवादानें होणें अशक्य आहे. **धनपतींचें** व्याख्यान सुंदर आहे.

**प्रपाकार, श्रीधरः**—लोहचुंबक जसा स्तब्ध राहून सांनिध्य मात्रानें लोखंडास गति देतो; तद्वत परमात्म्याचें उदासीनत्व व कर्तृत्व आहे. ऋक्शाखेतील मंत्र रावणभाष्यासहित देऊन चैतन्य हें सृष्टिकारण असलेंच पाहिजे असें सिद्ध करितात. **नीलकंठही** लोहचुंबकाचाच दृष्टांत घेतात.

**मधुसुदन**—सूर्याप्रमाणें परमात्मस्थिति आहे.

**द्विवेदीः** विपरिवर्तते = ब्रह्माचा विवर्त होऊन व प्रकृतीचा परिणाम होऊन हें जग अस्तित्वांत येतें. या सृष्टीला अज्ञान निमित्तकारण आणि प्रकृति उपादान कारण आहेत.

**चतरजी**—" सृष्टीचा उत्पादक कोण? प्रकृति असूं शकत नाहीं, कारण ती जड आहे. चैतन्य ही असूं शकत नाहीं, कारण, तें क्रियाशून्य आहे. एवंच हा प्रश्नच भ्रामक आहे.

सृष्टी कां उत्पन्न केली? मनुष्याच्या सुखासाठीं म्हणावी तर सृष्टयुत्पत्तिपूर्वी मनुष्य होता असें गृहीत धरावें लागेल! ईश्वरासाठीं

ह्मणाती तर असंग, कूटस्थ, पूर्ण, परमेश्वरास कांहीं नको आहे. एवंच हांहीं प्रश्न भ्रमोत्पन्न आहे.

सृष्टी केव्हां उत्पन्न केली ? येथें 'केव्हां' ह्या शब्दाचा दुरुपयोग होतो; कारण सृष्टीच्यापुर्वी जर कालच नव्हता ( काल ही स्थिति वैचित्र्य दाखविणारी आहे, सृष्टिनव्हती, तेव्हां वैचित्र्य कोठून येणार ? ) तर सृष्टी उत्पन्न केव्हां झाली हा प्रश्न ही भ्रमजन्यच होतो.

येणेंप्रमाणें कोणी, कां आणि केव्हां ( who, why and when ) हे व असे इतर प्रश्न असमंजस होत. परिच्छिन्नबुद्धीला ( मर्यादित बुद्धीला ) हे गूढप्रश्न उकलणें अशक्य आहे. वेदांतमतानें सृष्टी उत्पन्न झालीच नाहीं, तेव्हां कां, कोणी व केव्हां हे प्रश्नच अप्रस्तुत होतात. शिवाय पुरुषार्थसाध्य करून स्वरूप संपादावयाचें, या गोष्टीस वरील प्रश्नांच्या उत्तराशीं कांहीं संबंधही पोहोंचत नाहीं. "

स्पेन्सर साहेबांचे विचार असेच आहेत. कांट साहेबांचीं कूटें वाचणारास आपण वेदांतच वाचितों कीं काय असा भ्रम होईल खरोखर !

**श्रीरामानुज**—सत्यसंकल्प जो मी तो या माझ्या प्रकृतीचा अध्यक्ष द्रष्टा, आहे.

**द्वैतवादी**—मी द्रष्टा व कर्ता आहे. मीच सर्वचेष्टक आहे.

**पंडित**—सत्वगुणयुक्त होऊन मी मायेचा धनी होतों.....तिच्यायोगेंच तीतें । **ईश्वर प्रवर्तवी प्रकृतीतें । प्रजांचे धनें प्रजांतें । वर्तवी जैसा भूपति ॥ .... ब्रह्म आपण ऐसें अखंड जाणे । तेंची मायायोगें ब्रह्मी ईश्वरत्व बाणें । तेंची माया मी माया म्हणे । ब्रह्मयोगें, ती परदेवता शाक्तांची ॥ .... प्रथम स्फुरे ब्रह्म आपण । तो इश्वर, तें ब्रह्म सगुण । माया मी म्हणवोनि दुसरे स्फुरण । ते प्रकृति, तो ईश्वर तिचा अध्यक्ष ॥ तो तीकरूनी जे सृष्टी करी । ते होणाराचि तीपासुनी, परी । त्या वांचोनि तिच्या कुसरी । न प्रकटती तिच्या स्वसामर्थ्यें ॥ .... एवं जगत्कारण निर्गुण । तेंची आपण म्हणवोनि ज्यास वाटे तो सगुण । तो सर्व जाणे म्हणवोनि जनाचें द्विविधही कारण । ईश्वर ह्मणावा.** ॥ उपादानकारण व निमित्त कारण हीं दोन्हीं कारणें होत.

**एवं मां नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावं सर्वजन्तूनामात्मानमपि सन्तम्—**

असो; याप्रमाणें परमात्मा नित्य, शुद्ध, मुक्त व बुद्ध स्वभावाचा व सर्व प्राणीमात्राचा अंतर्यामी, सर्व प्राण्यांचा नियामक असतांही—

**अवजानन्ति मां मूढा**
**मानुषीं तनुमाश्रितम् ॥**
**परं भावमजानन्तो**
**मम भूतमहेश्वरम् ॥ ११ ॥**

**भूतमहेश्वरं मम परं भावं अजानन्तः** (सर्व भूतांचा स्वामी, हें माझें श्रेष्ठ स्वरूप न समजून घेऊन) **मूढाः मां मानुषीं तनुं आश्रितं अवजानन्ति** (मूर्ख व अज्ञानी लोक असें समजतात कीं मी केवळ मानवीतनु धारण करणारा प्राणी आहे; असें समजून ते माझा धिःकार करितात.)

**अवजानन्त्यवज्ञां परिभवं कुर्वन्ति मां मूढा अविवेकिनो मानुषीं मनुष्यसंबन्धिनीं तनुं देहमाश्रितं मनुष्यदेहेन व्यवहरन्तमित्येतत् । परं प्रकृष्टं भावं परमात्मतत्त्वमाकाशकल्पमाकाशादप्यन्तरतममजानन्तो मम भूतमहेश्वरं सर्वभूतानां महान्तमीश्वरं स्वमात्मानम् । ततश्च तस्य ममावज्ञानभावनेनाऽऽहता वराकास्ते ॥ ११ ॥**

अहंकार—वर्जित अशी मनुष्याची तनु धारण केल्यासारखा मी दिसतों व मनुष्यासारखा व्यवहार करितोसा दिसतों म्हणून तारतम्यशून्य पुरुष शुद्ध, मुक्तस्वभाव व आनंदघन जो मी त्या मला मनुष्यच समजून माझा अव्हेर करितात.

**शिष्य**—भगवन्! परमेश्वर मनुष्यांचें कल्याण करण्यासाठीं मानवीस्वरूप घेऊन अवतरला तेव्हांच तो मानवीस्वरूपी झाला! नव्हे काय?

**गुरु**—खरें; पण तो मनुष्य नव्हे. मनुष्यें मात्र त्यास मानव मानतात. त्या गरीब बिचाऱ्यांचें हें अज्ञान होय. व या अज्ञानामुळेंच सर्व पंचमहाभूतांचा आत्मा, साक्षी, स्वामी व नियामक व त्या सर्वांहून विलक्षण जो मी, त्या माझें स्वरूप त्यांस समजत नाहीं. तसेंच सर्व भूतांमध्यें श्रेष्ठ जें आकाश त्या आकाशासारखा, किंबहुना त्या आकाशाच्याही अंतर्यामीं राहून आकाशाचें नियमन करणारा जो मी त्या माझें परमतत्व, मूळस्वरूप, त्यांस कळत नाहीं. आणि या प्रमाणें मत्स्वरूपाविषयीं सर्वथा अज्ञानी राहिल्यामुळें माझी अवहेलना करितात व तेणेंकरून जन्ममरणादि दुःखसागरामध्यें हेलकावे खात पडतात. अर्थातच माझ्यासंबंधीं त्यांचें अज्ञान कायम आहे, तोंपर्यंत त्यांचा पुरुषार्थ साध्य होत नाहीं. इतकेंच नाहीं, पण अज्ञानानें अज्ञान वाढून त्यांची सुटका होणें हें अत्यंत संशयास्पद होतें. (पहा; अ० ७ श्लो. २४ )

**प्रपाकार**—श्रीधर—' विश्वप्रकाशमपि योजनषट्सहस्रविस्तारमुक्तमृषिभिर्यदिहार्कबिंबम् । मर्त्यैर्वितस्तिमितमीक्षत एतदेव, पश्यन्ति मर्त्यमिव विश्वविभुं विमूढाः '॥ ऋग्वेदश्रुतिही एक देतात.

**चतरजी**—श्रीकृष्णाचा अवतार ह्मणजे जीव आणि शिव यांचें ऐक्य दाखविणारी मूर्ति हा भाव सामान्य लोकांस कळत नाहीं.

**श्रीरामानुज**—मी अत्यंत उदार, सुशील, दीनवत्सल, परम कारुणिक आहे हें विसरून जाऊन मला केवळ मनुष्य समजतात.

**द्वैतवादी**—अज्ञानानें मी मनुष्य आहें असें समजणारे. भूत = सदा असणारा.

**समन्वयभाष्यः**—' मानुषीं तनुं आश्रितम् ' यावर समन्वय भाष्यांत पुष्कळ विचार केला आहे. येथें ' परमेश्वरानें मानवी तनूचा आश्रय करून व्यक्त स्वरूप धारण केलें ' असा अर्थ घ्यावयाचा नाहीं; सर्वत्र समभावानें राहणारें ब्रह्मतत्व भक्तिसन्निध प्रकट होतें; अज्ञानी जनांस तें प्रकट होणारें स्वरूप दिसत नाहीं. सर्वव्यापी

ब्रह्मानें मानवी तनूचा आश्रय केला असें म्हणणें अन्याय्य आहे. भक्तांस मानवी किंवा इतर स्वरूपानें प्रकट दर्शन होतें असा तात्पर्यार्थ आहे.

**ज्ञानेश्वरः**—देहच आत्माराम आहे असें जे मानितात त्यांची गति .... **मी ह्मणोनि प्रपंची। जिहीं बुद्धी दिधली कृतनिश्चयाची। तिहीं चंद्रासाठीं जेविं जळींची। प्रभा धरिली!॥ .... स्थूळाकारीं नाशिवंतें। भरंवसा बांधोनि चित्तें। पाहसी मज अविनाशातें। तरी कैंचा दिसे?॥ ११॥**

**कथम्**—

हें कसें तें सांगतात—

**मोघाशा मोघकर्माणो**
**मोघज्ञाना विचेतसः॥**
**राक्षसीमासुरीं चैव**
**प्रकृतिं मोहिनीं श्रिताः॥ १२॥**

**मोघाशाः, मोघकर्माणः, मोघज्ञानाः, विचेतसः, राक्षसीं च आसुरीं मोहनीं प्रकृतिं एव श्रिताः** (हे लोक व्यर्थ वासना बाळगणारे, व्यर्थ कर्में करणारे, व्यर्थ ज्ञानाचा संचय करणारे, तारतम्यशून्य, असे असून राक्षसांचा व असुरांचा जो मोहपूर्ण स्वभाव तो धारण करणारे असतात.)—असे असतात म्हणूनच दुःखत्रयांच्या तापामध्यें पडतात.—

**मोघाशा वृथाऽऽशा आशिषो येषां ते मोघाशाः। तथा मोघकर्माणो यानि चाग्निहोत्रादीनि तैरनुष्ठीयमानानि कर्माणि तानि च तेषां भगवत्परिभवात्स्वात्मभूतस्यावज्ञानान्मोघान्येव निष्फलानि कर्माणि भवन्तीति मोघकर्माणः। तथा मोघज्ञाना निष्फलज्ञाना ज्ञानमपि तेषां निष्फलमेव स्यात्। विचेतसो विगतविवेकाश्च ते भवन्तीत्यभिप्रायः। किंच ते भवन्ति राक्षसीं रक्षसां प्रकृतिं स्वभावमासुरीमसुराणां च**

**प्रकृतिं मोहिनीं मोहकरीं देहात्मवादिनीं श्रिता आश्रिता-श्छिन्धि भिन्धि पिब खाद परस्वमपहरेत्येवंवदनशीलाः क्रूरकर्माणो भवन्तीत्यर्थः । " असूर्या नाम ते लोकाः " इति श्रुतेः ॥ १२ ॥**

ज्यांच्या ठायीं पूर्ण अज्ञान भरलेलें असल्यामुळें, सर्वात्मस्वरूपी परमेश्वराचा अनादार होत आहे; ज्यांच्या सर्व आशा, सर्व वासना, सर्व कामना, व्यर्थ ह्मणजे अर्थशून्य होतात; कारण त्यांच्या प्रार्थनाच अनर्थकारी असतात. तसेंच अज्ञानवशात् आणि सकामबुद्धि प्रबल झाल्यामुळें त्यांनीं स्वात्मस्वरूपी परमात्म्याचा जो तिरस्कार व अनादर केला असतो, त्या दुर्बुद्धीमुळें त्यांनीं केलेलीं अग्निहोत्रादि जीं कर्में असतात तीं निष्फळच होतात आणि म्हणून त्यांच्या प्रार्थना फलप्रद होत नाहींत. पुनः त्यांचें ज्ञान अज्ञानजन्य असल्यामुळें निरर्थक होतें व त्यांचीं कर्में अज्ञानवशत्वानें होत असतात. ज्ञानच नाहीं तेव्हां तें विवेकशून्य होतात हें सांगावयासच नको. विवेकभ्रष्टांचा विनिपात सहस्त्रशः मुखांनीं होतो हें तुला विदितच आहे. सारांश ज्यांच्या प्रार्थना निरर्थक, कर्म अनर्थक, ज्ञान व्यर्थ आणि विवेकशून्यवत् अशी स्थिति आहे ते लोक संसाराच्या भोंवऱ्यांत सांपडतात यांत काय आश्चर्य आहे ?

शिष्य—त्याचें पुढें होतें तरी काय ?

गुरु—पुढील जन्मीं ते राक्षसांचा किंवा असुरांचा मोहपूर्ण स्वभाव धारण करून दुष्ट कृत्यें करण्यासाठीं जगांत येतात. हा मोहपूर्ण स्वभाव म्हणजे 'माझा देह हाच माझा आत्मा, देहसौख्य हाच माझा पुरुषार्थ' असा दुष्ट निश्चय होणें होय. हा निश्चय अत्यंत मोह उत्पन्न करणारा आहे. राक्षसांचे सर्व व्यवहार क्रोधपूर्ण म्हणजे 'नाश कर, फोड, खा, पी' असे इतरांस त्रासदायक असावयाचे. असुरांचे व्यवहार म्हणजे 'देऊं नको, यज्ञ करूं नको, दुसऱ्याचा अपहार कर' असे स्वार्थपर असावयाचे. यांचीं कर्में हीं अर्थात क्रूरपणाचींच असावयाचीं. एक परमात्मज्ञान सुटलें कीं केवढा घों-

टाळा होतो तो पहा. 'हे असले लोक असूर्य (राक्षसी) योनींत जातात' असें **ईशावास्यांत** सांगितलें आहे.

**धनपती**—'उत्तम धर्मानुष्ठान केलें; पण ईशकथेमध्यें भक्ति उत्पन्न झाली नाहीं तर तो धर्म व्यर्थ होय.' ईशभक्तिविरहित निष्काम कर्म केलें तरी तें व्यर्थ होतें.

**प्रपाकार, श्रीधर**—क्षुद्रदेवतांच्या उपासनेनें क्षणभंगुर अशा क्षुद्रफलांची आशा करणारे ते 'मोघाश' होत.

**मधुसूदन, रंगनाथ**—ईश्वराशिवायच आह्मांस कर्मफल मिळेल अशी व्यर्थ आशा करणें 'ते मोघाश', ईश्वरविन्मुखतेमुळें मोघ कर्म करणारे होतात व वितंडवादानें व्यर्थज्ञानी होतात.

**शंकरानंद**—जिव्होपस्थ सुखासाठीं मात्र कर्म करणारे ते मोघकर्मकार होत. '**दया सत्यं च शौचं च राक्षसानां न विद्यते**' अर्थ स्पष्ट आहे. 'राक्षसी किंवा असुरी प्रकृतीचा अवलंब करून मोहपूर्ण होतात त्यांची आशा, त्यांचीं कर्में व त्यांचें ज्ञान इत्यादि सर्व व्यर्थ होतें;' असा दुसरा अर्थ देतात.

**चतरजी**--विचेतस = व्यवहारशून्य. (थेसेलोनियन्स अ० २ श्लोक ८-१२ पहा)

**ज्ञानेश्वर**--येथील दृष्टांत वाचावे ॥ १२ ॥

**ये पुनः श्रद्दधाना भगवद्भक्तिलक्षणे मोक्षमार्गे प्रवृत्ताः—**

परंतु श्रद्धायुक्त अंतःकरणानें ज्यांनीं भगवद्भक्तिपूर्वक मोक्ष मार्गाचा अवलंब केला ते—

**महात्मानस्तु मां पार्थ**
**दैवीं प्रकृतिमास्थिताः ॥**
**भजन्त्यनन्यमनसो**
**ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ १३ ॥**

**तु** ( पण ) **पार्थ** ( अर्जुना ! ) **दैवीं प्रकृतिं आस्थिताः महात्मानः** ( दैवी प्रकृतीचा आश्रय करणारे महात्मे जे आहेत ते ) **अनन्यमनसः** ( अनन्यभावपूर्ण होत्साते ) **भूतादिं अव्ययं ज्ञात्वा** ( मी सर्व भूतांचा आदि, जनक, आहे, व मी अविनाशी आहे असें जाणून ) **मां भजन्ति** ( माझी—अनन्यभावानें—भक्ति करितात. ) सारांश—दैवी ह्मणजे कामक्रोधादिकांस नष्ट करून व शम, दमादि युक्त स्वभावाचा आश्रय करून व माझें स्वरूप जाणून महात्मे लोक माझी अनन्यभावानें भक्ति करितात.—

**महात्मानस्त्वक्षुद्रचित्ता मामीश्वरं पार्थ दैवीं देवानां प्रकृतिं शमदमदयाश्रद्धादिलक्षणामाश्रिताः सन्तो भजन्ति सेवन्तेऽनन्यमनसोऽनन्यचित्ता ज्ञात्वा भूतादिं भूतानां वियदादीनां प्राणिनां चाऽऽदिं कारणमव्ययम् ॥ १३ ॥**

परंतु अर्जुना ! पूर्वसंस्कारांनीं ज्यांचें चित्त शुद्ध झालें आहे, ज्यांचें चित्त क्षुद्र नाहीं, देहाच्या पलीकडे आणखी पुष्कळ वस्तु आहेत, पण नित्यवस्तु एकच आहे असें शास्त्रद्वारा जाणणारे, परोपकारी, उदार मनाचे, लोक दैवी प्रकृतीचा आश्रय करितात म्हणजे शम, दम, दया, श्रद्धा इत्यादि अनेक उदारलक्षणी गुणांचा अंगीकार करितात; आणि मलाच शरण येऊन माझी अनन्यभावानें सप्रेम व निरंतर सेवा करितात. मी सर्व पशु पक्षी इत्यादि चौऱ्यांशीं लक्ष योनींचा, आदिकर्ता आहे व नियामक आहे, आणि कर्ता व नियामक असून ही अविकार्यस्वरूपाचा आहे, कार्य ( विश्व ) नष्ट झालें तरी कारण ( मी ) नष्ट होणार नाहीं अशा स्वरूपाचा आहे, असें शास्त्रद्वारा व अनुभवद्वारा सोपपत्तिक ज्ञान ज्यांस झालें त्यांचीच अखंड भक्ति अनन्यभावाची होते व तेच लोक मला पूर्णत्वानें भजतात व भजूं शकतात हें तुला सांगावयास नकोच आहे. एवंच दैवी प्रकृति, स्वार्थत्यागाची पद्धति मोक्षदायक आहे हें स्पष्ट आहे.

**प्रपाकार**—निष्काम सगुणभक्ति अनन्यभावानें करणारे किंवा आत्मस्वरूप ओळखून निर्गुणब्रह्माचा साक्षात्कार अनुभवणारे ते महात्मे होत.

**शंकरानंद**—ह्या श्लोकांत सांगितलेले भक्त उत्तम कोटींतील होत.

**द्विवेदी**—भजन म्हणजे अपरोक्षानुभव. येथें ज्ञान आणि भक्ति एकच. श्रवण, कीर्तन होतां होतांच निदिध्यासन पूर्ण होऊन आत्मानुभवाचा प्रवाह मात्र राहतो, एवंच ब्रह्मानुभव येतो. याप्रमाणें ज्ञानमार्गानें मुक्ति मिळते. हा साक्षात् मुक्तीचा किंवा सद्योमुक्तीचा उत्तम प्रकार आहे.

**चतरजी**—'अव्यय, भूतादिः=स्वतः अविकृत राहून उत्पत्ति-स्थिति-लय उत्पन्न करणारा.

**श्रीरामानुज**—'मनाला, वाणीला, अगोचर आहे कर्म व स्वरूप ज्याचें व जो परमवात्सल्यानें साधु संरक्षणासाठीं अवतीर्ण होतो त्या परमेश्वराचें, माझें अनन्य प्रेमानें भजन करितात.'

**ज्ञानेश्वर**—महात्म्यांचें वर्णन मनोहर आहे.

**पंडित**—जे माझें (परब्रह्माचें) सगुणस्वरूप व निर्गुणस्वरूप जाणून सगुणत्वानें माझें भजन करितात ते महात्मे आहेत. ॥ १३ ॥

**कथम्**—

कशी सेवा करितात तें पहा—

> **सततं कीर्तयन्तो मां**
> **यतन्तश्च दृढव्रताः ॥**
> **नमस्यन्तश्च मां भक्त्या**
> **नित्ययुक्ता उपासते ॥ १४ ॥**

**सततं मां कीर्तयन्तः** ( अहोरात्र माझ्या स्वरूपाचें कीर्तन करणारे, माझें स्वरूप विशद करून दाखविणारे ) **यतन्तः च दृढव्रताः** ( यतिव्रतानें अभ्यास करणारे व दृढनिश्चयी ) **मां भक्त्या नमस्यन्तः** ( मला भक्तिपूर्वक नमस्कार करणारे ) **नित्ययुक्ताः** ( सदैव समाधिष्ठ असणारें )—लोक—वरील प्रकारांनीं—**उपासते** ( माझी उपासना करितात )—कीर्तन, मनःसंयमन, दृढनिश्चय, प्रणाम, सदैवचिंतन, हीं परमेश्वराच्या उपासनेचीं साधनें होत.—

**सततं सर्वदा भगवन्तं ब्रह्मस्वरूपं मां कीर्तयन्तो यतन्तश्चेंद्रियोपसंहारशमदमदयाहिंसादिलक्षणैर्धर्मैः प्रयतन्तश्च दृढव्रता दृढं स्थिरमचाञ्चल्यं व्रतं येषां ते दृढव्रता नमस्यन्तश्च मां हृदयेशयमात्मानं भक्त्या नित्ययुक्ताः सन्त उपासते सेवन्ते ॥१४॥**

निर्गुण, एकरस अशा ब्रह्माचें स्वरूप जो मी षडगुणैश्वर्य भगवान त्या माझ्या वेदप्रतिपाद्य स्वरूपाचें कीर्तन करणारे, नामघोष करून त्याची कीर्ति पसरविणारे; इंद्रियांस स्वाधीन ठेऊन शम, दम, दया, अहिंसा ( परोपकारशून्यत्व ) इत्यादि लक्षणांनीं युक्त असें आचरण करणारे; एकदां धारण केलेलें अहिंसा, सत्य, अस्तेयादि व्रतें कधींही सोडावयाचीं नाहींत, असा ज्यांचा निश्चय असतो; हृदयामध्यें वास करणारा व अंतःकरणाचें नियमन करणारा जो मी परमात्मा त्यास भक्तिपूर्वक सप्रेम व दंभशून्यत्वानें नमस्कार करणारे; सदैव ब्रह्माशीं तादात्म्य पावलेले लोक माझी उपासना करितात. त्यांचे आयुष्यांतील सर्व व्यवहार हें माझी उपासनाच होय. श्रवण, मनन, निदिध्यास हाच त्यांचा नित्य व सप्रेम व्यवहार असतो.

**मधुसूदन, रंगनाथ, पर्वते,** वामन पंडित.—' यतन्तः = गुरूपदिष्ट मत्स्वरूपाचें धारण होण्यासाठीं नित्य महावाक्याचें मनन करणारे. कालत्रयीं ही ज्यांचें व्रत कसल्याही कठीण प्रसंगीं भंग पावत नाहीं ते दृढव्रत् होत. श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य, आणि आत्मनिवेदन ही नवविद्या भक्ति ' च आणि ' या उभयान्वयी अव्ययानें सुचविली आहे. सगुण ब्रह्माची भक्ति येथें सांगितली. असो; याप्रमाणें अनन्यभक्तीनें चित्तप्रसन्नता प्राप्त झाली व गुरूपदिष्ट वेदांतवाक्याच्या अखंड निदिध्यासानें साक्षात्कार झाला म्हणजे मोक्ष मिळतो हा प्रतिज्ञात सिद्धांत येथें गूढ भावानें सांगितला. ( पहा श्लोक १ अध्याय ९. )

**शंकरानंद**—मध्यमांची उपासना येथें सांगितली आहे. '**आसुप्तेः, आमृतेः कालं नयेत् वेदांतचिंतया,** (जागृतकाळीं व जिवंत असे तोंपर्यंतचा काल वेदांतविचारांत घालवावा.) हेही मोक्षोपास-

कच आहेत. येथें नामसंकीर्तन नाहीं तर मोक्षसिद्धीचें साधन जो वेदांतघोष तो सांगितला आहे.' हा आम्हीही अर्थ होय.

**श्रीरामानुज**—" सद्गदित अंतःकरणानें, व सरोमांच होऊन 'श्रीराम, नारायण, वासुदेव' इत्यादि गुणविशिष्ट नामांचा घोष, अर्चन इत्यादिक दृढसंकल्पपूर्वक प्रयत्न, आहेत ज्यांचे, भक्तीच्या भारानें लवलें आहे मन, बुद्धि, अभिमान ज्यांचे, अशा भक्तांचें साष्टांग नमन इत्यादिकांनीं माझी नित्य उपासना होते. नित्ययुक्तः = 'सदैव भगवत्संगति मिळण्याविषयीं उत्सुक."

**द्वैतवादी**—पूर्ण सगुण उपासना येथें सांगितली.

सततं = वीण्यासहित कीर्तन करणारे असा अर्थ या पंडितंमन्यांनीं काढिला आहे!

**ज्ञानेश्वर—यमदमा अवकळा आणिली। तीर्थें ठायावरूनि उठविलीं। यमलोकींची खुंटविली। राहाटी आघवी** ( यमलोक ओसाड केला! ) ॥ **यम ह्मणे काय यमावें? । दम ह्मणे कवणातें दमावें? । तीर्थें ह्मणतीं काय खावें?। दोष औषधासी नाहीं! ॥ ऐसें माझेनि नामघोषें। नाहींच करिती विश्वाचीं दुःखें। अवघें जगाचि महासुखें। दुमदुमित भरलें** ॥ हा नाममहिमा अत्यंत उज्ज्वल होय. हे नामोपासक सदा प्रकाशणारे सूर्य, नित्यपूर्ण असणारे चंद्र, सतत अमृत वर्षाव करणारे मेघ, कृपाळु सिंह आहेत.....**तयांपासी पांडवा। मी हरपला गिंवसावा । जेथ नामघोष बरवा। करिती माझाः** यततः=योगाभ्यास करणारे.—हें सर्व व्याख्यान वाचल्यावांचून राहूं नये.

पंडितांनीं नाममाहिमा उत्तम वर्णिला आहे. यततः= स्वरूपसमाधि लावणारे' समाधि लावून कीर्तन करण्यास सांगितलें आहे यावरून ज्ञानी पुरुषास सगुणभक्ति सांगितली आहे, असें यांचें मत आहे.

**रंगनाथ**—इतर प्रायश्चितांचें वैफल्य दाखवितात ॥ १४ ॥

**ते केन केन प्रकारेणोपासत इत्युच्यते—**

आणखी दुसऱ्या कोणकोणत्या प्रकारांनीं हे महात्मे उपासना करितात तें सांगतात—

**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये**
**यजन्तो मामुपासते ॥**
**एकत्वेन पृथक्त्वेन**
**बहुधा विश्वतोमुखम् ॥ १५ ॥**

**च** ( आणि ) **अन्ये ज्ञानयज्ञेन अपि यजन्तः मां उपासते** ( दुसरें कांहीं महात्मे ज्ञान हाच कोणी एक यज्ञ, त्या यज्ञाचे द्वारां यजन करून माझी उपासना करितात. )–त्यांतही कोणी–**एकत्वेन** ( सर्वब्रह्म एकच असें समजून )–दुसरे–**पृथक्त्वेन** ( द्वैतभावानें )–आणि कांहीं–**बहुधा विश्वतोमुखं** ( अनेक, अनंत प्रकारांनीं विश्वव्यापी आहे )–असें समजून उपासना करितात. येथें अद्वैतभक्ति, आणि विश्वभक्ति असे निरनिराळे प्रकार सांगितले.–' च अपि=दुसऱ्या साधनांचा त्यागच करून ' असा **मधुसूदन व पर्वते** अर्थ करितात.

**ज्ञानयज्ञेन ज्ञानमेव भगवद्विषयं यज्ञस्तेन ज्ञानयज्ञेन यजन्तः पूजयन्तो मामीश्वरं चाप्यन्येऽन्यामुपासनां परित्यज्योपासते। तच्च ज्ञानमेकत्वेनैकमेव परं ब्रह्मेति परमार्थदर्शनेन यजन्त उपासते। केचिच्च पृथक्त्वेनाऽदित्यचन्द्रादिभेदेन स एव भगवान्विष्णुरादित्यादिरूपेणावस्थित इत्युपासते। केचिद्बहुधाऽवस्थितः स एव भगवान्सर्वतोमुखो विश्वतोमुखो विश्वरूप इति तं विश्वरूपं सर्वतोमुखं बहुधा बहुप्रकारेणोपासते ॥ १५ ॥**

सर्वेश आणि सर्वसाक्षी जो मी परमेश्वर त्याचें ज्ञान यथार्थ, शास्त्रद्वारा, करून घेणें, व मननिदिध्यासानें साक्षात्काराचें विज्ञान संपादणें हें जें ज्ञानविज्ञान तोच एक यज्ञ आहे असें समजून ते दुसऱ्या तिसऱ्या उपासना टाकून देतात आणि ज्ञानयज्ञानें माझी ( परमेश्वराची ) उपासना करितात.

**शिष्य**—हें ज्ञानविज्ञान एकच असेल ?

**गुरु**—परमार्थदृष्टीनें एकच; पण परमार्थदृष्टि सर्वांस एकदम साध्य होत नाहीं म्हणून ज्ञानविज्ञानवंत व उपासक, यांत भिन्नता आढळून येते. कांहीं पूर्णज्ञान संपादन केलेले लोक 'श्रेष्ठ ब्रह्म एकच आहे' असें सम्यक् ज्ञान संपादून घेऊन साक्षात्कारप्रीत्यर्थ ब्रह्मरूपानें माझी उपासना करितात. इतर कांहीं लोकांस हें परमार्थज्ञान स्पष्ट झालेलें नसल्यामुळें 'हा आदित्यस्वरूपानें स्थित राहणारा सर्वव्यापी भगवान आहे, हा चंद्रस्वरूपानें स्थित असणारा भगवान आहे' अशा निरनिराळ्या स्वरूपांनीं, व्यक्त स्वरूपांनीं, माझी आराधना करितात. आणि ही देवपूजा, पितृपूजा इत्यादि होय. आणि कांहीं लोक 'एकच परमेश्वर अनेक व अनंत स्वरूपांनीं विश्व व्यापून राहिला आहे' अशी कल्पना करून माझें आराधन करिता त.

**प्रपाकार**—'**'हंसः शुचिषत्'** इत्यादि त्रिसुपर्णांतर्गत श्रुति देतात. या श्रुतीचा अर्थ सर्वांनीं मनन करण्यासारखा आहे. ( **गं. वा. लेले** कृत त्रिसुपर्ण पहा. )

**श्रीधर**—' एकत्वेन'=अभेदबुद्धीनें, मी व परमेश्वर भिन्न असा भेदभाव न ठेवितां पृथक्त्वानें=मी परमेश्वराचा दास आहे अशा बुद्धीनें.' ' बहुधा ब्रह्मरुद्रादिरूपांनीं.

**मधुसूदन, शंकरानंद**,—एकत्व धारण करणारे उत्तम, भेदबुद्धि धारण करणारे मध्यम व क्षुद्र देवतांच्या उपासनेचें धारण करणारे कनिष्ठ, असे ज्ञानाचे तीन प्रकार व तीन उपासक सांगतात. ' मीच परमेश्वर व परमेश्वरच मी' असें अभेदचिंतन ती अहंग्रहोपासना, ही करणारे भक्त उत्तम होत. प्रतीकाची उपासना करणारे मध्यम आणि भिन्न मूर्तित्वानें उपासना करणारे कनिष्ठ उपासक.' ' जें पाहिलें तें भगवद्रूप, ऐकिलें तें भगवन्नाम, अशी जी उपासना ती विश्वतोमुख उपासना ' असा पर्वत्यांनीं एक अर्थ दिला आहे. ब्रह्मोपासक, हिरण्यगर्भोपासक व विराजोपासक असे तीन प्रकारचे ज्ञानीउपासक असतात. **धनपतींस मधुसूदनाचा** अर्थ संमत नाहीं. ज्ञानयज्ञ म्हणजे 'पातंजल योग' असें **नीलकंठ** म्हणतात तेंही **यांस** पसंत नाहीं.

**श्रीरामानुज**—' जगामधील अनंत पदार्थांचें स्वरूप धारण करणारा वासुदेव एकच आहे, असें समजून हे लोक माझी ज्ञानयज्ञानेंही उपासना करितात. ' हा संकुचित अर्थ ज्ञानयज्ञाचे अनेक प्रकार दाखवूं शकत नाहीं.

**समन्वयभाष्यः**—' **एकंसद्विप्रा बहुधा वदन्ति** ' ( एकच परपरमार्थतत्व असतांना अनेक मुमुक्षु आपआपल्या अधिकाराप्रमाणें त्या एकरसात्मकतत्त्वाचें अनेक प्रकारें चिंतन करितात. )

**द्वैतवादी**—' नित्य श्रवणमननादि स्वतः करून दुसऱ्याकडून करविणारे व भगवन्माहात्म्याचें ज्ञान संपादण्यामध्ये निमग्न असणारे माझे भक्त परमेश्वर सर्वव्यापी आहे अगर जगाहून विलक्षण असा परमेश्वर आहे अशा स्वरूपानें माझी भक्ति करितात. ' बहुधा = बहुत प्रकारचा; अनेक भक्त; किंवा नारायण हा एकरूपी आहे, वासुदेव, संकर्षण इत्यादि चार रूपाचा आहे, किंवा अनंत रूपाचा आहे; असें समजून मदुपासना करितात.

**ज्ञानेश्वरांनीं** संकल्परूपी यूपापासून अमरस्वरूपी अवभृथ स्नानापर्यंत उत्तम रूपक केलें आहे. विश्वतोमुख = कोणीकडून पाहिलें तरी परमेश्वरच दिसणार, असें.

**पंडित**—पृथक्त्वानें भजन करितात ते अद्वैत जिज्ञासु म्हणावे; एकत्वानें भजन करणारे अपरोक्ष साक्षात्कार युक्त म्हणावें; विश्वतोमुखाचा विस्तार पुढें आहे.

**टामसन**—माझें स्वरूप पूर्णत्वानें कळल्यामुळें प्रत्येक पूज्य पदार्थांत माझें आस्तित्व पाहतात. डेव्हिस व **टामसन**ः—मी सर्वश्रेष्ठ ईश्वर आणि किंवा विश्वांतील पदार्थांत निरनिराळ्या तऱ्हेनें दिसणारा अनेक रूपी ईश्वर, असें भजन करितात.

**तेलंग** -' भक्ति = अतिरिक्त प्रेम. ' ॥ १५ ॥

**यदि बहुभिः प्रकारैरुपासते कथं त्वामेवोपासत इत्यत आह**—

**शिष्य**—जर अनेक दैवतें कल्पून ही उपासना होते, तर ही परमेश्वराची उपासना कशी ?

गुरु—त्याचेंच स्पष्टीकरण खालील श्लोकांत केलें आहे तें ऐक—

अहं क्रतुरहं यज्ञः
स्वधाऽहमहमौषधम् ॥
मन्त्रोऽहमहमेवाऽऽज्य-
महमग्निरहं हुतम् ॥ १६ ॥

अहं क्रतुः, अहं यज्ञः, अहं स्वधा, अहं औषधं, अहं मंत्रः, अहं एव आज्यं, अहं अग्निः, अहं हुतं ( ज्योतिष्टोमादि पंचमहायज्ञादि श्रौत यज्ञ मी, स्मार्तयज्ञ मी, पितृयज्ञांतील अन्न मी, मनुष्यांचें अन्न किंवा औषध मी, देवांस व पितरांस हवि जो म्हणून देतात तो मंत्र मी, घृत ही मी, अग्नि मी,—आणि आहुति ही मीच होय. ) स्पष्ट आहे. परमेश्वराचें सर्वरूपत्व दाखवावयाचें आहे, तें कांहीं वस्तु घेऊन उपलक्षणानें सांगितलें.

अहं क्रतुः श्रौतकर्मभेदोऽहमेवाहं यज्ञः स्मार्तः । किंच स्वधाऽन्नमहं पितृभ्यो यद्दीयते । अहमौषधं सर्वप्राणिभिर्यदद्यते तदौषधशब्दवाच्यम् । अथवा स्वधेति सर्वप्राणिसाधारणमन्नमौषधमिति व्याध्युपशमार्थं भेषजम् । मन्त्रोऽहं येन पितृभ्यो देवताभ्यश्च हविर्दीयते अहमेवाऽऽज्यं हविश्चाहमग्निर्यस्मिन्हूयते सोऽग्निरहमेवाहं हुतं हवनकर्म च ॥ १६ ॥

श्रौतकर्मामध्यें सांगितलेला जो यज्ञ तो मी आहे; स्मार्त यज्ञ मी आहे; किंबहुना, पितरांस श्राद्धसमयीं जें अन्नसमर्पण करितात तें पित्रन्न मी आहे; प्राणी जें काय खातात तें वनस्पतिजन्य तिळतांदुळादिही मी आहे.

शिष्य—किंवा स्वधा म्हणजे सर्व प्राणी जें काय खातात तें अन्न अर्थ म्हणावें व औषध म्हणजे रोगाचा उपशम होण्यासाठीं ज्याची योजना होते तें--औषध—म्हणावें; असा अर्थ केला तर ?

**गुरु**—कांहीं बाध नाहीं. पंचमहायज्ञांचा संभव आहे म्हणून वरील पहिला अर्थ ठीक. असो; पितरांस व देवतांस ज्या मंत्राच्या साहाय्यानें (जे मंत्र म्हणून) हवि देतात ते मंत्र मी, त्याचप्रमाणें हवि (होमद्रव्य ही) मी; ज्यामध्यें हवि अर्पण करितात तो अग्नि मीच; आणि हवनकर्मही मीच असतों. ज्ञानी व दैवी संपत्तीच्या लोकांची ही उपासना आहे बरें काय?

**मधुसूदन**—सारांश कोणतें ही कर्म, कर्ता व कर्मफल ईश्वर व्यतिरिक्त नाहींत हें स्पष्ट करण्यासाठीं 'अहं' शब्दाचा पुनरुच्चार आहे. विश्वतोमुखद्वारा ही उपासना आहे असें नीलकंठ म्हणतात.

**शंकरानंद**—माझ्या मायेच्या योगानें मी अनंतरूपें धारण करितों. 'इंद्रो मायाभिः पुरुरूपं (अनेक रूपें) ईयते' एवंच शिव, विष्णु ब्रह्मा, इंद्र हीं माझीं मायिक रूपें आहेत. क्रतु व यज्ञ हे ब्रह्म तेव्हां त्यांतील अंगदेवता व यजमान ही ब्रह्मच होत.

**समन्वदभाष्य**—येथें एकत्वानें उपासना कशी होते, तें सांगितलें. 'क्रतु, यज्ञ इत्यादि वस्तुच ईश्वरस्वरूपी आहेत' असा नाहीं अर्थ घ्यावयाचा; तर ज्या अंतर्यामी प्रभूच्या सत्तामात्रेंकरून मात्र इतर पदार्थांचें अस्तित्व शक्य होतें त्या अंतर्यामी प्रभूचें चिंतन करावयाचें; हा वास्तविक अर्थ आहे. '**अजस्रमुच्चरन्तं स्वं**' (अहोरात्र अवाग्वाणीनें, अप्रकटवाणीनें 'सोहं,' हंस जप भक्तिज्ञान पुरःसर चालला असला म्हणजे साधकाला परमात्मस्वरूप प्रकट होतें.

**द्विवेदी, चतरजी**—हा जो विस्तार सांगितला त्यांत कर्ता, कर्म आणि कारण ही त्रिपुटी ब्रह्मरूपच आहे. ह्या परब्रह्माच्या विभूति आहेत. विभूति असल्या ह्मणजे विभु=प्रभु आहे असें झालेंच.

**द्वैतवादी**—यज्ञ=देवतांस उद्देशून केलेला द्रव्यत्याग.

**पंडित**—क्रतु=यूपस्तंभ जेथें उभारिती। यज्ञ=यूपस्तंभावांचून जेथें यजिती! 'या श्लोकांत दृष्ट अदृष्ट सृष्टि मीच आहे, मीच मनःसंकल्पानें निर्माण केली आहे, असें परमेश्वरानें सुचविलें आहे.'

**हेव्हिस**—'क्रतु व यज्ञ या शब्दांत आचार्यादिकांनीं दाखविलेला

भेद विशेष, रूढ नाहीं;' क्रतु=यज्ञ. यज्ञ=देवतांस उद्देशून केलेला द्रव्यत्याग. **टामसन**--हुत=धूप. हा अर्थ प्रामाणिक नाहीं.

**गेलेनास**-क्रतु ह्मणजे श्रौत ह्मणजे प्राणीमेध. यज्ञ=द्रव्यमेध. ॥१६

**किंच**—

आणखी---

पिताऽहमस्य जगतो
माता धाता पितामहः ॥
वेद्यं पवित्रमोंकार
ऋक्साम यजुरेव च ॥ १७ ॥

**अस्य जगतः अहं पिता, माता धाता, पितामहः** (या जगाचा मी पिता, माता, फलदाता व पितामह-आजा-आणि) **वेद्यं पवित्रं ओंकारः ऋक् साम यजुः एव च** (जाणण्यासारखी वस्तु, अत्यंत पवित्रवस्तु, ओंकार, आणि ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद हें सर्व मीच आहे).---सूक्ष्मप्रपंचरूपीही परमेश्वरच आहे.

**पिता जनयिताऽहमस्य जगतो माता जनयित्री धाता कर्मफलस्य प्राणिभ्यो विधाता पितामहः पितुः पिता वेद्यं वेदितव्यं पवित्रं पावनमोंकारश्च ऋक्साम यजुरेव च ॥ १७ ॥**

परमात्म्याचें सर्वात्मकत्व कसें आहे हें पहा: सर्व जगतांचा व ब्रह्मादि सर्व जीवांचा उत्पत्तिकर्ता, उत्पत्तिस्थान, कर्मानुसार ज्याचें त्यास फल देणारा व पोसणारा-अध्यक्ष,-ब्रह्मदेवाचाही जनकपिता, मी आहें. ज्ञेय म्हणजे जाणण्यासारखें कायतें मीच आहें. सर्वांस पूत करणारा मीच होय. ब्रह्म जाणण्याचें साधन जो ओंकार तो मीच आहें. ऋक्, साम, यजु हे तिन्ही वेद मीच आहें.

**शिष्य**--हा ओंकार मनांत ह्मटलेला व स्पष्ट उच्चार केलेला, असे दोन्ही घ्यावयाचेना ?

**गुरु**—होय. येथील 'च' कारानें अथर्ववेद, इतिहास, पुराणें घ्यावीं असें कांहीं टीकाकार म्हणतात तें श्लोकानुरोधानें योग्य होय; पण कालानुरोधानें असमंजस होय.

**मधुसूदन, पर्वते, चतरजी**—'ऋक्' मध्यें नियमित अक्षरें असतात; तीच गातां आली म्हणजे साम; आणि गातां येत नाहीं व नियमित अक्षरें नाहींत, तो यजु. 'च' कारानें अथर्वणवेदही घ्यावा." हें योग्य नव्हे; कारण गीता प्रकट झाली त्यावेळीं अथर्ववेद निराळा झाला नसावा.

**नीलकंठ**—तप आदि तें पावन होय.

**शंकरानंद**—'पितामहः = अक्षर नांवाचा मायोपाधि ईश्वर.'

**चतरजी**—पिता = चैतन्य; माता = प्रकृति; धाता = कार्यकारणसंबंधाचा नियामक; पितामह = परब्रह्म (ज्ञाता व ज्ञेय हे विशेष येथें नष्ट होतात.)

येथें 'पृथकत्व', सांगितलें. परमात्म्याहून मी कसा भिन्न आहें व तो माझा बाप, आई इत्यादि स्वरूपानीं कसा उपासावा हें खालील दोन श्लोकांत ठरविलें असें **समन्वयभाष्यकार** म्हणतात.

**ज्ञानेश्वर**—इयें प्रकृति पुरुषें दोन्ही। उपजलीं जयाच्या अमनमनीं (संकल्पशून्य मन)। तो पितामह त्रिभुवनीं। विश्वाचा मी ॥ .... जेथ नाना मतां बुझावणी (समजूत) आली। एकमेकांशास्त्रांची अनोळखी फिटली। चुकलीं ज्ञानें जेथ मिळों आलीं। जें पवित्र म्हणिजे ? ॥ सर्व शास्त्रांचें एकीकरण वेदांतांत कसें होतें हें येथें समजेल.

**पंडित**—पितमह = आजा; मानवसृष्टीचा बाप जो मनु व आई जी शतरूपा, या मानसजन्यदंपत्याचा बाप, तो मनुष्यांचा आजा. हा आजा ब्रह्मदेव होय.

**डेव्हिस**—प्लेटोनें ही असाच सिद्धांत काढिला आहे. प्रकृति ही आई, चैतन्य हा बाप आणि सृष्टि हीं मुलें असेंच प्लेटोचें मत आहे. (**हिमीयस ग्रंथ** पहा.)

**टामसन** = पिता = निमित्तकारण. माता = उपादानकारण. वेद्य = ब्रह्मशास्त्र. पवित्र = आचार. ओंकार = जपाचीं स्तोत्रें व सूक्तें १७

**किंच—**

आणखी पुनः—

**गतिर्भर्ता प्रभुः साक्षी**
**निवासः शरणं सुहृत् ॥**
**प्रभवः प्रलयः स्थानं**
**निधानं बीजमव्ययम् ॥ १८ ॥**

**गतिः, भर्ता, प्रभुः, साक्षी, निवासः, शरणं, सुहृत्, प्रभवः, प्रलयः, स्थानं, निधानं, अव्ययं बीजं** ( इष्टतमवस्तु, पोषण करणारा, स्वामी, द्रष्टा, सर्वाधार, सर्वाश्रय, खरा व निष्काम स्नेही, उत्पत्तिस्थान, लयस्थान, स्थान, भांडागार आणि अविनाशी बीज, असा मी आहें. )

**गतिः कर्मफलं, भर्ता पोष्टा, प्रभुः स्वामी, साक्षी प्राणिनां कृताकृतस्य, निवासो यस्मिन्प्राणिनो निवसन्ति, शरणमार्तानां मत्प्रपन्नानामार्तिहरः, सुहृत्प्रत्युपकारानपेक्षः सन्नुपकारी, प्रभव उत्पत्तिर्जगतः, प्रलयः प्रलीयते यस्मिन्निति । तथा स्थानं तिष्ठत्यस्मिन्निति, निधानं निक्षेपः कालान्तरोपभोग्यं प्राणिनां, बीजं प्ररोहधर्मिणाम् । अव्ययं यावत्संसारभावित्वादव्ययम् । न ह्यबीजं किंचित्प्ररोहति । नित्यं च प्ररोहदर्शनाद्बीजसंततिर्न व्येतीति गम्यते ॥ १८ ॥**

सर्व कर्माचें फल, सर्वांचा पुरुषार्थ, मी आहें. सुख होईल असें मी सर्वांचें पोषण करितों. मी सर्वांचा स्वामी आहें. सर्व जीव जें काय शुभाशुभ करितात त्याचा द्रष्टा मी आहें. सर्व प्राण्यांचें माहेरघर मी आहें. मला अनन्यभावानें जे शरण येतील त्यांचीं संकटें मी

दूर करितों. मी सर्वांचा सुहृद् आहे, ह्मणजे मी जो उपकार करितों, तो उपकृत पुरुष माझे उपकार फेडील या लालसेनें करित नाहीं. सर्व जगत् मीच उत्पन्न करितों; सर्व जगत् माझ्यामध्येंच प्रलयकाळीं अंतर्भूत होतें. मीच सर्वांचें सृष्टिपूर्वी, सृष्टि असतांना व सृष्टिनंतरचें वसतिस्थान आहें. काळांतरानें उपयोगास येणारी सर्वांची ठेव ह्मणजे मीच होय. वृद्धीस पावणाऱ्या वस्तूंच्या वृद्धीचें कारण, बीज, मीच आहें.

**शिष्य**—बरें कार्यकारण हा प्रकृतिधर्म आहे. होयना? मग प्रकृति विनाशी ह्मणजे सांत आहे हें ठरलें! तेव्हां या जगद्वृद्धीचें कारण अविनाशी कसें बरें? तांदुळाचें, गव्हांचें, बीज तर उत्पत्तिकाळीं नष्ट होतें! म्हणजे अंकुर उत्पन्न झाला कीं बीज नष्ट होतें असा अनुभव आहे.

**गुरु**—म्हणूनच भगवंतांनीं अविनाशी बीज असें म्हटलें बरें! कार्य उत्पन्न करूनही जें कारण अविकृत राहतें, तेंच अविनाशी होय. असो; जोंपर्यंत हा संसार आहे, मायाभासित जगत् आहे, तोंपर्यंत हें बीज अविनाशीच असतें व असलें पाहिजे. आतां कारणावांचून तर कार्य ( वृद्धि पावणें ) हें संभवत नाहीं. म्हणून सर्व वृद्धीला परमात्माच कारण आहे असें म्हटलें पाहिजे. आपण वृद्धीचा भाग नित्यशः पाहतों; तेव्हां वृद्धीचें कारण ही नित्यच असलें पाहिजे. अर्थातच ही वृद्धि आभासिक आहे, संसार संपला म्हणजे ही वृद्धि संपते व तेव्हांच परमेश्वराचें कारणत्वही संपतें.

**नीलकंठ**—'गति = मोक्षनगरी' 'भर्ता = कर्मफल देऊन पोषण करणारा.' 'प्रभु=अंतर्यामी.' 'निवास= आश्रयस्थान; यजमान.' 'निधान = कर्मफलसमर्पणाचें स्थान.' 'प्रभव व प्रलय = स्रष्टा व संहर्ता' हे अर्थ आचार्यकृतच आहेत.

**समन्वयभाष्यकार** म्हणतात कीं १७ व १८ श्लोकांत ईश्वराहून मी निराळा आहें अशा दृष्टीनें म्हणजे पृथक्त्वानें परमेश्वरोपासना सांगितली.

**प्रपाकार**—गति=चरणादिकर्मेंद्रियव्यापाराचें कारण; निवास= भोगभोगण्याचें ठिकाण, प्रपंचाचें वसतिस्थान; प्रभवः = उत्तम देह पुनः

प्राप्त होतो, त्याचें कारण; प्रलयः = पुनर्जन्म न येण्याचें कारण; पंडितांचा ही ' प्रभव प्रलय ' शब्दांचा असाच अर्थ आहे.

**मधुसूदन**--गति = जाण्याचें फल. **पंडित**---गति = कर्मफल.

**चतरजी**—गति = पुरुषार्थ;

**द्वैतवादी**---येथपर्यंत ज्ञान झालें. आतां येथून विज्ञानास ( विशिष्ट ज्ञानास ) आरंभ झाला आहे. निवासः = सर्वशरण; शरण = मुक्तांचा आश्रय. मी यज्ञ म्हणजे मी यज्ञकर्ता; मी हवि म्हणजे मी यज्ञभोक्ता; असें जाणावें. " कृतिस्वरूप आहे म्हणून ' क्रतु यज्ञ ' शब्दांची व्युत्पत्ति पहाः '**यदस्ति प्रामाणिकतया तज्जानातीति यज्ञनामा** ( वस्तुतः जें आहे तें जो जाणतो तो यज्ञ ' ) ! **आत्मानं धत्ते इति स्वधा; उष्टाः तापत्रयदग्धाः तेषां निधिः इति औषधनामा; मानात् ( ज्ञानात् ) त्रातीति मंत्रः; आसमंतात् जायस्त्वात् आज्यनामा; अगस्य ( स्वतः गतिहीनस्य जगतः ) नेता इति अग्निनामा; अर्च्यत्वात् ( पूज्यत्वात् ) ऋक्; सर्वरूपेषु समत्वात् साम;** ह्या सर्व व्युत्पत्तिवाचून संस्कृत पंडितांच्या अगाध कौशल्याबद्दल कोणास सखेदाश्चर्य वाटणार नाहीं ?

**ज्ञानेश्वर**—प्रभु=सर्वकर्ता; सर्वनियामक. प्रभु शब्दावर ज्ञानेश्वरांचें व्याख्यान शानदार आहे.

**पंडित**—साक्षित्व व प्रभुत्व ह्या ईश्वराच्या उपाधि आहेत म्हणून तो जगताची कर्मानुसार गति व निवास होतो. जे भक्त शरण येतात त्यांचें रक्षण करितो. आतां सर्व कां शरण जात नाहींत; यास उत्तर सर्वांस ज्ञान नसतें हें आहे. ज्ञानप्रेरक ईश्वर आहे व करुणाघनही आहे म्हणून ईश्वरानें सानुकंपेनें सर्वांस ज्ञान द्यावें व त्याकरवीं भक्ति करवावी असें कोणी म्हणेल तर '**मोक्ष सकळांस द्यावा । तरी नाश होणार स्ववैभवा । स्वरूपच स्ववैभवा देवाधिदेवा । न नाशवे सर्वथा, कीं तें अभंग ॥**' असें उत्तर देतात. हें उत्तर समाधानकारक नाहीं; ईश्वराचें स्ववैभव राहण्यासाठीं जीवांस मोक्षप्रेरणा होऊं नये; ही विचारमाला अविचारजन्य आहे. पण दयाघन परमेश्वराच्या येथें कोणास प्रेरणा होते व इतरास होत नाहीं असा

अनुभव आहे. म्हणनच आणि यावरूनच विचारस्वातंत्र्य व इच्छा-स्वातंत्र्य परमेश्वरानें प्राणीमात्रास दिलें आहे असें सिद्ध होतें. प्रयत्नाअंतीं परमेश्वर आणि प्रयत्न हा इच्छाजन्य आहे; हें तत्व गृहण केल्यावांचून दृश्य विश्वांतील विषमतेचा उलगडा होत नाहीं. असो; पंडितांचें व्याख्यान अवश्यमेव वाचावें ॥ १८ ॥

**किंच—**

आणखी

> **तपाम्यहमहं वर्षं**
> **निगृह्णाम्युत्सृजामि च ।**
> **अमृतं चैव मृत्युश्च**
> **सदसच्चाहमर्जुन ॥ १९ ॥**

**अहं तपामि** ( मी—आदित्यरूपानें—ऊन पाडतों ) **अहं वर्षं निगृह्णामि च उत्सृजामि** ( मी पर्जन्य ओढून घेतों व सोडतों ) **च** ( आणि ) **अहं एव अमृतं, मृत्युः च सत् च असत्; अर्जुन** ( मीच अमृत, मृत्युजनक, सत आणि असत आहें बरें, अर्जुना ! ) सारांश सर्व ऋतूंचें मृत्यूचें, सतासतांचें आदिकारण मीच आहें.

**तपाम्यहमादित्यो भूत्वा कैश्चिद्रश्मिभिरुल्बणैरहं वर्षं कैश्चिद्रश्मिभिरुत्सृजाम्युत्सृज्य पुनर्निगृह्णामि कैश्चिद्रश्मि-भिरष्टभिर्मासैः पुनरुत्सृजामि प्रावृषि । अमृतं चैव देवानां मृत्युश्च मर्त्यानाम् । सद्यस्य यत्संबन्धितया विद्यमानं तद्विपरीतमसच्चैवाहमर्जुन । न पुनरत्यन्तमेवासद्भगवान्स्वयं कार्यकारणे वा सदसती । ये पूर्वोक्तैरनुवृत्तिप्रकारैरेकत्व-पृथक्त्वादिविज्ञानैर्यज्ञैर्मां पूजयन्त उपासते ज्ञानविदस्ते यथा-विज्ञानं मामेव प्राप्नुवन्ति ॥ १९ ॥**

सर्वात्मक भगवानच आहे, ह्या सिद्धांताविषयीं शंका येऊं नये

म्हणून सांगतातः"अर्जुना! मी आदित्याचें स्वरूप घेऊन अनेक स्पष्ट, स्वच्छ व व्यक्त अशा किरणांनीं प्रखर प्रकाश पाडितों, व उष्णता उत्पन्न करितों. त्याचप्रमाणें 'आदित्यापासून वृष्टि उत्पन्न होते' या स्मृतिवचनाप्रमाणें कित्येक किरणांच्या साहाय्यानें पर्जन्यास मोकळा सोडतों ( पर्जन्य पाडितों ) आणि पुढील आठ महिनेपर्यंत त्या पर्जन्यास आपल्या स्वाधीन ठेवितों. प्रावृट्काळीं पर्जन्य असतो हें सर्व विश्रुतच आहे. देवांस अमरत्व ( अत्यंत दीर्घायुष्य ) व मनुष्यांस मर्त्यत्व देणारा मी आहें. आणखी; कार्यकारणसंबंधाच्या योगानें विद्यमान असणारें जें **कार्य** म्हणजे सत् तें मी आहें व त्याच्या उलट म्हणजे कार्योन्मुख न झालेलें (नामरूपाप्रत न आलेलें) **कारण** तेंही मीच आहें.

शिष्य–भगवन्! एवंच भगवान अत्यंत असत् वस्तु झाली तर मग?

गुरु—नाहीं. तसें झालें तर कार्यकारणकल्पना आश्रयशून्य होईल. शिवाय कार्यकारणसंबंध हा शुद्ध सद्वस्तुही नाहीं व असद्वस्तुही नाहीं.

शिष्य—मला कांहीं एक बोध झाला नाहीं.

गुरु—परमेश्वरास असें सांगावयाचें आहे कीं या विश्वांत जेवढ्या दृश्य म्हणजे इंद्रियगोचर वस्तु आहेत, सद्वस्तु आहेत, त्यांचें आदिकारण भगवान आहेत. त्याचप्रमाणें ज्यांपासून अद्यापि कांहीं कार्य उत्पन्न झालें नाहीं. अशा कारणांचें आदिकारणही भगवानच आहेत; म्हणजे कार्यांचें व कारणाचें ( मग ह्यांपासून कार्य झालेलें असो वा नसो ) आदिकारण परमेश्वर आहे. समजलें? तसेंच कार्य हें नेहमीं सत् म्हणजे विद्यमान असतें असें नाहीं व सर्वदां अविद्यमान असतें असेंही नाहीं; केव्हां तें अभिव्यक्त झालेलें असतें व कधीं नसतें. कारणाचाही हाच प्रकार आहे. तेव्हां, केव्हां केव्हां सत आणि इतर प्रसंगीं असत असणारी जी कार्यकारणमालिका ही जर प्रत्ययास येत आहे व ही जर स्वतः आपलेंच कारण होऊं शकत नाहीं, तर या मालिकेचें नित्य, अखंड, असें एक कारण असलेंच पाहिजे. हें जें कारण तोच परमेश्वर होय.

असो; याप्रमाणें १९ व्या श्लोकापासून येथपर्यंत सांगितलेल्या प्रकारांपैकीं कोणत्या तरी प्रकारच्या ( एकत्वमूलक अगर पृथक्त्व-मूलक ) यज्ञानें निष्काम ज्ञानी माझी जशी आराधना व उपासना करितात, त्याप्रमाणें त्यांस फलप्राप्तिही होते. सारांश त्यांस त्यांच्या उपासनेप्रमाणें क्रममुक्ती अगर सद्योमुक्ती मिळते.

**प्रपाकार**—' तपामि = प्रलयकालीं द्वादशार्क होऊन मी भूतांचें शोषण करितों. नारायणोपनिषद् ' आर्द्रं **' आर्द्रं ज्वलति ज्योतिर-हमस्मि '** (प्राणिजाताचें दहन करणारा मीच तेजोरूपी विराट् असतो.)'

**मधुसूदन, रंगनाथ**—' मी आठ महिने आदित्यरूपानें पृथ्वीं-तील जलाचें शोषण करून मग तें जल पृथ्वीवर चार महिने पर्जन्य-रूपानें आणितों. ' ' अमृत = जीवनकारण.

**समन्वयभाष्य**—येथें बहुधोपासना सांगितली आहे.

**पर्वते**—सत्=सुखकारक; असत् = दुःखकारक.

**श्रीरामानुज**—' सत् = वर्तमान; असत् = भूत, भविष्य.

**द्वैतवादी**—**' सदभिव्यक्तरूपत्वात्कार्यमित्युच्यते बुधैः '** ( अ-भिव्यक्त ( स्पष्ट ) रूप ज्याचें तें सत् ह्मणजे कार्य. ) याच्या उलट तें असत् ह्मणजे कारण. **सत्येंद्रस्वामीः** क्रतु, यज्ञ इत्यादि शब्दांचे व्युत्पत्त्युनुसार अनेक अर्थ ठरवून विष्णूचें विश्वरूपत्व, सर्वकर्तृत्व, स्वतंत्रत्व प्रकट करितात. **राघवेंद्रयतिः** ' सत्=साधुगुणपूर्ण. आणि असत्=साधुगुणपूर्णत्वानें अन्यपुरुषाचा अभाव !

**ज्ञानेश्वरांचा**—सारांशः **ह्मणोनि अर्जुना ! मी नसे । ऐसा कवण ठाव असे? । परी प्राणी यांचें दैव कैसें । जे मातें न देखती ! ॥**

**पंडित** या श्लोकांत ईश्वराचें अस्तित्व, नियंतृत्व, व निःपक्षपातित्व स्थापितात.

**टामसन**—' सत्=चिद्रुप; असत्=जडरूप. **डेव्हिड** ' सत्=व्यक्त असत्=अव्यक्त. ॥ १९ ॥

**ये पुनरज्ञाः कामकामाः**—

परंतु जे अज्ञ आहेत, ज्यांची वासना अद्यापि शांत झाली नाहीं—

त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा
यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते ॥
ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोक-
मश्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान् ॥२०

**त्रैविद्याः, सोमपाः, पूतपापाः मां यज्ञैः इष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते** ( तिन्ही वेदांचें अध्ययन करून यज्ञ करणारे, यज्ञामध्यें सोमरसाचे प्राशन करणारे व या प्राशनानें पापशून्य झालेले जे याज्ञिक यज्ञ करून माझी आराधना करितात व स्वर्गसुखाची अपेक्षा करितात. ) **ते पुण्यं सुरेन्द्रलोकं आसाद्य दिवि दिव्यान् देवभोगान् अश्नन्ति** ( ते लोक पुण्यशील व सुखदायक अशा इंद्र लोकाप्रत जाऊन स्वर्गामध्यें अनेक दिव्य व अमरभोग्य सुखांचा उपभोग घेतात. )

**त्रैविद्या ऋग्यजुःसामविदो मां वस्वादिदेवरूपिणं सोमपाः सोमं पिबन्तीति सोमपास्तेनैव सोमपानेन पूतपापाः शुद्धकिल्बिषा यज्ञैरग्निष्टोमादिभिरिष्ट्वा पूजयित्वा स्वर्गतिं स्वर्गगमनं स्वर्गतिस्तां प्रार्थयन्ते । ते च पुण्यं पुण्यफलमासाद्य संप्राप्य सुरेन्द्रलोकं शतक्रतोः स्थानमश्नन्ति भुञ्जते दिव्यान्दिवि भवानप्राकृतान्देवभोगान्देवानां भोगास्तान् ॥ २० ॥**

पण सकाम उपासना करणारे लोकांचा जन्ममृत्युप्रवाह थांबत नाहीं हें दर्शविण्यासाठीं म्हणतातः—ऋग्वेद, साम व यजुर्वेद यांचें साग्र अध्ययन करून जे कामुक लोक अग्निष्टोमादि यज्ञांच्या द्वारें—

**शिष्य**—हे लोक अग्नि, आदित्य, वसु अगर इतर देव यांस (वस्तुतः भगवंतास ) स्वस्वरूपाप्रमाणेंच समजून तसेंच ( मर्यादित रूपानेंच ) आराधनही करित असतील नाहीं बरें ? वस्तुतः भगवदाराधन होत असतां ह्या लोकांस तें समजत नाहीं.

**गुरु**—होय. उत्तम समजलास. असो; परमेश्वरास वसुरूपानें आळवून हे यज्ञ करितात, यज्ञांत सोमरसाचें पान करितात आणि त्या सोमपानानें निष्कलंक होतात. याप्रमाणें मोक्षप्रतिबंधक पापें नाहींशीं झाल्यामुळें शुद्ध झाल्यावर ज्ञान प्राप्त करून घ्यावें, तें न घेतां हे लोक स्वर्गलोकांचीं सुखें आपल्यास मिळावीं अशा आशेनें प्रार्थना करितात. असो; यज्ञादिकांनीं ते शुद्ध झालेले असतात व पुण्यसंचयही पुष्कळच झालेला असतो; त्यामुळें त्या पुण्याचें समग्र फल त्यांस मिळतें, म्हणजे ते इंद्र लोकांस जातात. शंभर अश्वमेध यथासांग झाले म्हणजे इंद्रत्व प्राप्त होतें. असो; याप्रमाणें इंद्र लोकास गेल्यावर तेथील स्वर्गसुखांचा यथेच्छ आस्वाद त्यांस मिळतो. सारांश देवांस मात्र जे दिव्य भोग मिळतात ते उत्तम भोग यांसही मिळतात. परंतु हे सर्व अप्राकृतसे वाटणारे भोग प्राकृतच होत. कारण त्यांस अंत आहे म्हणून ते दुःखमिश्रित आहेत. शिवाय आत्मज्ञान नाहीं तें नाहींच. एवंच ह्या कामुकांचे सर्वही भोग प्राकृतच होत. **छांदोग्य** उपनिषदांत हेंच सांगितलें आहे.

**द्विवेदी**—जशी वासना तसें कर्म होतें. कर्माप्रमाणें फल मिळतें. कर्म कायमचें नसल्यामुळें फळही कालभंगुर असतें; ह्मणून मृत्युलोकीं यावें लागतें.

**ज्ञानेश्वर**—**जैसे कल्पतरू तळवटीं। बैसोनि झोळिये देतसे गांठी!। मग निदैव** ( हतभाग्य ) **निघे किरीटी!। दैन्यचि करूं** ( भिक्षा मागावयास हा हतभाग्य निघतो! )॥ **तैसें शतक्रतु यजिलें मातें। कीं ईप्सीताती स्वर्ग सुखातें। आतां पुण्य कीं हें, निरुतें। पाप नोहे?** ॥ पुण्यात्मक पापानें स्वर्ग मिळतो व पापात्मक पापानें नरक; एवंच पुण्यपाप हीं दोन्हीं दुःखाचीं माहेरें आहेत. यांनीं स्वर्गाचें वर्णन मनोहर केलें आहे.

**रंगनाथ**—**जैसा कोणी परिस विकुनिया। कोंडा घेतसे उदर भराया। तेवीं सत्कर्मातें विकोनिया। घेती विषय सुखालागी!॥ २०॥**

ते तं भुंक्त्वा स्वर्गलोकं विशालं
क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ॥
एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना
गतागतं कामकामा लभन्ते ॥२१॥

**तं विशालं स्वर्गलोकं भुक्त्वा, ते क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति** ( तो विस्तृत, अत्यंत सुखकारक, असा स्वर्गलोक भोगून, तेथील सुखाचा उपभोग घेतल्यावर, आणि पुण्याचा अंश नष्ट झाल्यावर हे लोक पुनः मृत्युलोकीं जन्म पावतात. ) **एवं त्रयीधर्मं अनुप्रपन्नाः कामकामाः गतागतं लभन्ते** ( या प्रमाणें तीन वेदांत सांगितलेल्या विधींचें अनुपालन करणारे कामुक लोकांस जन्ममृत्युचें फळ मिळतें. ) सारांश, कामुक लोकांनीं सकामतेनें कोणताही प्रकार अंगीकृत करून उपासना केली तरी त्यांचा जन्ममृत्यु सुटत नाहीं.—

ते तमिति । ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं विस्तीर्णं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकमिमं विशन्त्याविशन्ति । एवं हि यथोक्तेन प्रकारेण त्रैधर्म्यं केवलं वैदिकं कर्मानुप्रपन्ना गतागतं गतं चाऽऽगतं च गतागतं गमनागमनं कामकामाः कामान्कामयन्त इति कामकामा लभन्ते गतागतमेव न तु स्वातन्त्र्यं क्वचिल्लभन्त इत्यर्थः ॥ २१ ॥

स्वर्गलोक मिळाला ह्मणजे सर्व पुरुषार्थ साध्य झालें असें नाहीं हें सांगण्यासाठीं ह्मणतातः हे कामुकयाज्ञिक विस्तीर्ण अशा स्वर्गलोकाचा उपभोग घेत असतां कालांतरानें क्षीणपुण्य होतात; ह्मणजे त्यांचें पुण्य संपून जातें. हें पुण्य संपल्याबरोबर त्यांस पुनः मृत्युलोकीं जन्म प्राप्त होतो! देव-देह सुटून त्यांस लिंगदेह प्राप्त होतो. या प्रमाणें तीन वेदांतप्रणीत केलेलें वैदिक कर्म मात्र जे कामुक बुद्धीनें करितात, त्यांच्या मागचें, ज्ञानशून्य कर्माचें, जाणें ,येणें, जन्ममृत्यु, संपत नाहीं. नुसत्या कर्माचें फल जन्ममृत्यु आहे. इच्छेची तृप्ति

व्हावी, कामपूर्ति व्हावी अशी वासना धरणारे लोकांस जन्ममृत्यूचें चक्र सुटत नाहीं. ज्ञानानें मात्र आशेचा नाश होतो व स्वातंत्र्य मिळतें. पण आत्मज्ञान व आत्मविज्ञान जोंपर्यंत नाहीं, तोंपर्यंत आशा कर्म करविते व कर्म जन्ममृत्यु उत्पन्न करितें. सारांश आशा आहे तोंपर्यंत हें जन्ममृत्यूचें रहाटगाडगें नित्य चालणार. अनुप्रपन्न = अनादिकालापासून मिळत आलेलें.

**प्रपाकार**—'विशालं=स्थूलफल देणारा.' 'आत्मलोकांची मात्र उपासना करावी; आत्मोपासकाचें कर्म चित्तशुद्धि करितें; अशा अर्थाची शातपथी श्रुति आहे.

**नीलकंठ**—'**प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपाः। अष्टादशोक्तमवरं येषु कर्म॥ एतच्छ्रेयो येऽभिनन्दति मूढाः। जरामृत्युं ते पुनरेवाऽपि यान्ति॥**

( यज्ञयागादिक ज्या कर्मसंपादित नौका आहेत त्या छिद्रपूर्ण व सपाटून हलणाऱ्या आहेत. यांचा आश्रय ज्या मूर्खांनीं धरिला ते जन्ममरणांत सांपडतात. ) **धनपतींस** 'त्रयोधर्म' हा पाठ आदरणीय वाटत नाहीं. ' हि त्रैधर्म्य ' असा यांचा पाठ आहे. तात्पर्य एकच.

**समन्वयभाष्यकार**—'**विशालं**' हें विशेषण मृत्युलोकाकडेही जोडतात. मृत्युलोकही विस्तीर्णच आहे.

**मधुसूदन**—'**एवं हि त्रैधर्म्यमनुप्रपन्नाः**' असा पाठ यांस मिळाला असावा. तात्पर्य एकच.

**शंकरानंद**—' त्रयीधर्म=तीन वेदांत सांगिततलेलें कर्मकांड. ' '**त्रिकर्मकृत्तरति जन्ममृत्यू**' (वेदप्रणीत कर्मकरणारा जन्ममृत्यूपासून सुटतो) ही श्रुति अर्थवादपर (स्तुतिपर) आहे; पण कर्मठ लोक ' कर्मच मोक्षदायक आहे ' असें अज्ञानानें म्हणतात. हे कर्मठ अनीश्वरवादी आहेत असें हे स्वामी म्हणतात.

**ज्ञानेश्वरांचा** एक दृष्टांत घेतों; हा भारदस्तपणास सुमार परंतु वस्तुस्थितिदर्शक म्हणून घेतला आहे. **जैसा वेश्याभोगीं कवडा वेचे** ( सर्व द्रव्य वेचून टाकिलें )। **मग दारही चेपूं नये तियेचें** (दाराला

स्पर्श सुद्धां करितां येतनाहीं ! ) । तैसें लाजीरवाणें दीक्षितांचें । काय सांगो ? ॥ कामुकाची ही दशा आहे ना ?

**टामसन**—' गतागतं = सुखाचें जाणें येणें. ॥ २१ ॥

**ये पुनर्निष्कामाः सम्यग्दर्शिनः—**

परंतु सद्वस्तूचें ज्ञान होऊन जे निष्काम झाले व निष्काम झाल्यामुळें ज्यांस सद्वस्तुचा परिचय झाला ते —

**अनन्याश्चिन्तयन्तो मां**
**ये जनाः पर्युपासते ॥**
**तेषां नित्याभियुक्तानां**
**योगक्षेमं वहाम्यहम् ॥ २२ ॥**

**अनन्याः, चिन्तयन्तः, ये जनाः मां पर्युपासते** ( दुसरा तिसरा पृथकपणाचा भाव न ठेवितां, एकरूप होऊन, दुसऱ्या कोणासही शरण न जाणारे, सदैव आत्मचिंतनामध्यें निमग्न झालेले जे निष्काम भक्त, सर्वव्यापी जो मी त्या माझें एकनिष्ठेनें व आत्मस्वरूपानें आराधन करितात ) **नित्याभियुक्तानां तेषां योगक्षेमं अहं वहामि** ( त्या नित्यसमाधिमग्न भक्तांचा योगक्षेम मी स्वतःच चालवित असतों. ) सारांश एकनिष्ठ, ज्ञानी भक्तांचा योगक्षेम परमेश्वर चालवितो.—

**अनन्या अपृथग्भूताः परं देवं नारायणमात्मत्वेन गताः सन्तश्चिन्तयन्तो मां ये जनाः संन्यासिनः पर्युपासते तेषां परमार्थदर्शिनां नित्याभियुक्तानां सतताभियोगिनां योगक्षेमं योगोऽप्राप्तस्य प्रापणं क्षेमस्तद्रक्षणं तदुभयं वहामि प्रापयाम्यहम् । ज्ञानी त्वात्मैव मे मतं स च मम प्रियो यस्मात्तस्मात्ते ममाऽऽत्मभूताः प्रियाश्चेति । नन्वन्येषामपि भक्तानां योगक्षेमं वहत्येव भगवान् । सत्यमेवं वहत्येव । किं त्वयं विशेषोऽन्ये ये भक्तास्ते स्वात्मार्थं स्वयमपि योगक्षेममीहन्तेऽनन्यदर्शिनस्तु नाऽऽत्मार्थं योगक्षेममीहन्ते । न हि**

**ते जीविते मरणे वाऽऽत्मनो गृद्धिं कुर्वन्ति केवलमेव भगवच्छरणास्ते। अतो भगवानेव तेषां योगक्षेमं वहतीति ॥२२॥**

**शिष्य**—निष्कामतेनें परमेश्वराचें आराधन एकनिष्ठतः करणाऱ्या ज्ञानी लोकांच्या योगक्षेमाची काय वाट? आधीं पोटोबा आणि मग विठोबा अशी म्हण आहेना?

**गुरु**—किती प्राकृत मनाचा आहेस अद्यापि तूं? असो; तुझ्या सारख्यांचें समाधान होणें नाहींच; पण भगवान सामान्य सिद्धांत सांगतात तो ऐक:

सर्वश्रेष्ठ, नित्य, सर्वव्यापी, सर्वांतरात्मा जो नारायण तोच आपण आत्मस्वरूपानें आहों, ईश्वरामध्यें व आपल्यामध्यें भिन्नभाव कांहींच नाहीं असा निश्चय करून जे पूर्ण निष्काम ( सन्यासीच ते! ) आत्मस्वरूपाचें सदैव ध्यान करितात व येणेंकरूनच सर्वव्यापी आत्मस्वरूपाची दृढ उपासना करितात; त्या ब्रह्मज्ञान झालेल्या व नित्य समाधिसुखामध्यें मग्न असणाऱ्या निर्विकल्प योग्यांचा योगक्षेम मी भगवानच चालवित असतों.

**शिष्य**—योगक्षेम म्हणजे असेंचना? मिळालेलें नसतें तें मिळणें ह्मणजे योग आणि मिळाल्याचें संरक्षण करणें ह्मणजे क्षेम. असाचना अर्थ? ह्मणजे भगवान असेंच सांगताततना, कीं वरील एकनिष्ठज्ञानी भक्तांस अवश्य असणाऱ्या गोष्टींची तर्तूद प्रत्यक्ष भगवानच स्वतः करीत असतात.

**गुरु**—बरोबर; ऐक भगवद्वाणीः ज्ञानी भक्त ह्मणजे मदात्मस्वरूप होय; माझा तो आत्माच होय. असा माझा सिद्धांत आहे ज्ञानी मला अत्यंत प्रिय असतो ह्मणून हे माझे भक्त आत्मभूत होऊन मला प्रिय होतात. ( अध्याय ७ श्लोक १८ पहा )

**शिष्य**—भगवन्! यांत विशेष काय? इतर भक्तांचाही योगक्षेम भगवानच चालवित असताततना?

**गुरु**—होय. पण हा विशेष आहे तो ध्यानांत ठेव. **अन्य** जे भक्त असतात, परमेश्वरास भिन्नस्वरूपानें मात्र जे जाणतात त्यांची

परमेश्वरावर अशी अनन्य निष्ठा नसते; आणि म्हणून ते भक्त **आपल्या स्वतःचा** ( सोपाधिक जीवाचा ) **योगक्षेम चालावा म्हणून कांहीं तरी कर्म करितात.** सारांश त्यांची वासना व कर्तृत्वाभिमान हीं नाहींशीं झालेली नसतात; म्हणून कर्मफलदात्या भगवंताला त्यांचा कामुक योगक्षेम चालवावा लागत नाहीं. पण जे ईश्वराशींच तादात्म्य पावले, ज्यांस आपलें असें कांहींच राहिलें नाहीं ( किंवा ज्यांस सर्व विश्व आपलेसेंच झालें ), ते आपल्या देहासाठीं, अगर अंतःकरणासाठीं, कशासाठींच कर्म करितनासे होतात; सारांश योगक्षेमाची खबरही त्यांस नसते. जिवंत राहणें किंवा मरणें यांचा आत्म्याशीं कांहीं संबंध नाहीं, असा त्यांचा निश्चय असल्यामुळें ते जीविताची अगर इतर वस्तूंची अपेक्षा करित नाहींत ! ते केवळस्वरूपी भगवंतांस शरण जातात म्हणजे तत्वरूपी होतात. म्हणून भगवंतास त्यांचें बरेंवाइट पहावें लागतें. समजलें ?

**प्रपाकार**—' अनन्य = माझ्याशिवाय अन्य उपास्य ज्याला नाहीं तो अनन्य होय. ' .

**श्रीधरास** प्रपाकारांचा व आचार्यांचा अर्थ संमत आहे. ' क्षेम = मोक्ष ' असाही अर्थ करितात.

**मधुसूदन**—' अनन्य = सर्व भोग निस्पृह; अद्वैतदर्शी. '

**समन्वयभाष्यकार** :—' **अनन्तं बत मे वित्तं, यस्य मे नास्ति किञ्चन । मिथिलायां प्रदीप्तायां नैव दह्यति किञ्चन** ' ( **माझें** असें कांहींच नसल्यामुळें माझें **वित्त अनंत** आहे. प्रत्यक्ष मिथिला नगरी पेटली, तरी कांहीं एक जळत नाहीं ! ) ही **जनक** राजाची उक्ति प्रखरवैराग्यदर्शक होय. ( शां. पर्व. महाभारत ). भागवताच्या १० व्या स्कंदांत भगवान ह्मणतात: ' ज्यावर मी अनुग्रह करितों तो निर्धन होतो; आणि माझा भक्त द्रव्यहीन झाल्यावर त्याचे इष्टबांधव त्याला सोडून जातात ! अर्थातच तो माझ्या ठायीं पूर्ण रत होतो ' ' पुत्रदारादिक सर्व विषय सोडून माझे भक्त झाले त्यांस मी कसा बरें सोडीन ? ही भगवदुक्ति ९ व्या स्कंधांत आहे. पुढील ३१ श्लोकही पहा.

**शंकरानंद**--' योग = निरंतर ब्रह्मनिष्ठा. क्षेम = अध्यात्मिकादि, उपद्रवशून्य ' असा दुसरा अर्थ सांगतात. द्विवेदींस हाही अर्थ संमत आहे. येथें द्विवेदींनीं परमेश्वरावर येणारे कर्तृत्वाचा निरास केला आहे. 'जशी भक्ति असेल तसा साक्षात्कार होतो' हा सिद्धांत ध्यानांत ठेऊन मुमुक्षु जीवानें ब्रह्मसाधककर्म (निवृत्तीचें कर्म) करून भाक्तिपूर्वक ज्ञानविज्ञान मिळविलें पाहिजे.

**श्रीरामानुज**--' मां = हिरण्यरूपी, सकल गुणान्वित, सर्व विभूतियुक्त असा सगुण परमेश्वर. ' योग = माझी प्राप्ति. क्षेम = जन्ममृत्युशून्यत्व.

द्वैतवादींचा अर्थ केवळ उपासनापर आहे. **राघवेंद्रयतींनीं** '**त्रैविद्या मां**' ह्या व '**अनन्याश्चिन्तयंतो मां**' ह्या श्लोकांतील विशेष दाखविला आहे. याज्ञिकही विष्णुभक्तच आहेत, कारण यज्ञसमाप्तीच्या वेळीं सर्व कर्म विष्णूस समर्पण करितात असा यांचा अभिप्राय आहे. असो; याज्ञिक व भागवत उभयतांही वैष्णव असून भगवंतास भोग्य असें कर्म उभयतांही करणारे असतांना केवळ एक याज्ञिक व स्वर्गसुख मागणारे झाले व दुसरे अनन्य आणि परमेश्वरोपासक झाले म्हणून याज्ञिक संसारी होतात व भागवतमुक्त होतात. अंतीं परमेश्वरास फल समर्पण करणें हें यांस संमत नाहीं.

**ज्ञानेश्वर--आपली ताहानभूक नेणे। तान्हया निकें तें मापेसीच करणें। तैसे अनुसरले मज प्राणें। तयांचें सर्व मी करीं॥**

पंडितांच्या व्याख्यानाचा मासला: अगा अर्जुना! अनन्य म्हणजे **मजवेगळें नसें ज्यांस अन्य। कीं शाश्वत मोक्षही न इच्छिती ते धन्य। तव्हां नश्वर पदार्थ इच्छिती तें काय?....॥** ' योगक्षेम= **कीं नव्हतें तें ज्ञान देवोनि। बिंबवितों, करितों जतन तें ॥२२॥**

**नन्वन्या अपि देवतास्त्वमेव चेत्तद्भक्ताश्च त्वामेव यजन्ते सत्यमेवम्**—

**शिष्य**—भगवान्! अन्य देवता तरी पण भगवानच. तेव्हां जे अन्य देवतांचें भक्त तेही परमेश्वराचें भक्त आहेत. मग असा पंक्तिभेद कां?

गुरु—एक कां तें—

> येऽप्यन्यदेवताभक्ता
> यजन्ते श्रद्धयान्विताः ॥
> तेऽपि मामेव कौन्तेय
> यजन्त्यविधिपूर्वकम् ॥ २३ ॥

**अपि ये अन्यदेवताभक्ताः श्रद्धया अन्विताः यजन्ते** (आतां जे इतर देवतांचे भक्त आहेत ते जे श्रद्धायुक्त, आस्तिक्य व पूज्य-बुद्धीनें यजन करितात ) **ते अपि कौन्तेय अविधिपूर्वकं मां एव यजन्ति** ( ते सुद्धां, हे अर्जुना ! माझेंच आराधन करितात खरें, पण त्यांची आराधना अज्ञानपूर्वक होत असतें. )

येऽप्यन्यदेवताभक्ता अन्यासु देवतासु भक्ता अन्यदेवता-भक्ताः सन्तो यजन्ते पूजयन्ते श्रद्धयाऽऽस्तिक्यबुद्ध्याऽन्विताः अनुगतास्तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकमविधि-रज्ञानं तत्पूर्वकमज्ञानपूर्वकं यजन्त इत्यर्थः ॥ २३ ॥

पार्था ! जे लोक देवतेहून आपण निराळे आहोंत अशा भावानें, सर्वव्यापी परमेश्वराव्यतिरिक्त अन्य देवतांचें भजनपूजन मोठ्या आस्तिक्यबुद्धीनें व पूज्यबुद्धीनें, पण सकाम बुद्धीनें करितात, ते वास्तविक पाहिलें असतां जशी माझीच आराधना करितात; तथापि त्यांस सम्यग्वस्तूचें ज्ञान झालेलें नसल्यामुळें व वासना व अभिमान नष्ट झाले नसल्यामुळें त्यांचें हें मदाराधन अविधिपूर्वक होतें. सारांश जशी आराधना व्हावयास हवी तशी ती होत नाहीं. सर्वात्मत्वानें जें भजन होतें तें विधिपूर्वक असतें.

**प्रपाकार व नीलकंठ**—अविधिपूर्वक म्हणजे मोक्षदायक अद्वैतउपासन.

**धनपतिः** ‘ वासुदेवाशिवाय दुसरें कांहीं नाहीं ’ अशा **दृढभा-**

वनेनें जी उपासना होते ती विधिपूर्वक उपासना होय. विश्वनाथांचा हाच आशय आहे.

**श्रीरामानुज**---' इंद्रादिक देव हे परमपुरुषाचे अवयव आहेत. वरील अज्ञ लोक अवयवांची पूजा करितात; अवयवी जो परमेश्वर त्याची पूजा करित नाहींत म्हणून भ्रष्ट होतात.

**ज्ञानेश्वर**--अन्य देवताभजन हें परमेश्वर भजनच खरें पण-**पाहे पां शाखा पल्लव रुखाचे** ( झाडाचे ) **। हे काय नव्हती एकाच बीजाचे? । परी पाणी घेणें मुळाचें । तें मुळींचि घाणें** ( घातले जाते ) **॥** ....सारांश....**कर्माचे डोळे ज्ञान । तें निर्दोष हो आवे ॥**

पंडितांनीं येथें विस्तार करून उपाधिभेदानें फलभेद होतो असें दाखविलें आहे. वैष्णव पंथाचा या स्वामीवर बराच पगडा बसला असावा असें येथें स्पष्ट दिसतें.

**कस्मात्तेऽविधिपूर्वकं यजन्त इत्युच्यते यस्मात्**--

**शिष्य**--कशावरून त्यांचें भजन अविधिपूर्वक होतें?

**गुरु**---भगवानच त्याचा उलगडा करित आहेत तो ऐक--

**अहं हि सर्वयज्ञानां**
**भोक्ता च प्रभुरेव च ॥**
**न तु मामभिजानन्ति**
**तत्त्वेनातश्च्यवन्ति ते ॥ २४ ॥**

—ज्या अर्थी—हि (हें प्रसिद्ध आहे कीं) **अहं सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुः एव च** ( मी सर्व यज्ञांचा उपभोक्ता व स्वामी आहे ) **तु** ( पण )—हे लोक—**मां तत्त्वेन न अभिजानन्ति** ( मला स्वस्वरूपानें ओळखत नाहींत ) **अतः** ( म्हणून ) **ते च्यवन्ति** ( ते स्वरूपापासून भ्रष्ट होतात. )—सारांश सर्व यज्ञादिक कर्मांचा मीच भोक्ता व स्वामी आहें हें माझें स्वरूप त्यांस समजत नाहीं. म्हणून ते पतित होतात.

**अहं हि सर्वयज्ञानां श्रौतानां स्मार्तानां च सर्वेषां यज्ञानां देवतात्मत्वेन भोक्ता च प्रभुरेव च। मत्स्वामिको हि यज्ञोऽधियज्ञोऽहमेवात्रेति ह्युक्तम्। तथा न तु मामभिजानन्ति तत्त्वेन यथावत्। अतश्चाविधिपूर्वकमिष्ट्वा यागफलाच्च्यवन्ति प्रच्यवन्ते ते ॥ २४ ॥**

अर्जुना! हें सर्वविश्रुत आहे कीं मी सर्व श्रौत व स्मार्त, सारांश **सर्व, यज्ञांचा** उपभोक्ता व स्वामी आहे. यज्ञांतील ज्या विशिष्ट देवता **असतात** त्या मत्स्वरूपी व मदधीन असल्यामुळें सर्व कर्मांचा उप**भोक्ता,** फलदाता व नियामक मीच आहें. ‘मी यज्ञाचा अध्यक्ष **आहें**’ ( अ० ८ श्लो० ४ ) म्हणून माझें स्वामीत्व यज्ञावर असतें **हें** सांगितलेंच आहे.

**शिष्य**—हें सर्व ठीक; पण यावरून इतर देवतांचें भजन केलें असतां परमेश्वरदृष्टीनें तें अविधिपूर्वक कसें होतें?

**गुरु**—हें पहा भगवंत काय म्हणतात तें:—सर्व यज्ञांचा, सर्व **याज्ञिक** देवतांचा भोक्ता व स्वामी मी परमेश्वर आहें; हें माझें स्वरूप **त्यांस** कळत नाहीं आणि म्हणून हे अज्ञानी लोक स्वतःचीं कर्में **मला अर्पण** करित नाहींत. सारांश क्षुद्र देवतांच्या उपासनेनें वासना **व अभिमान** नष्ट होत नाहींत. म्हणून ज्ञानशुद्ध यज्ञाचें उत्तम फल **जो** मोक्ष किंवा जें स्वस्वरूप तें त्यांस प्राप्त होत नाहीं. सारांश ते **भ्रष्ट, पतित,** होतात; म्हणजे जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडतात.

**प्रपाकार**—सर्व नानारूपी विश्वगत पदार्थ हे ईश्वरोपाधि आहेत. **त्या सर्वांचा** अंतर्यामी **परमात्मा** आहे. हें ज्यांस कळत नाहीं त्यांचें यजन अविधिपूर्वक होतें. ‘**अथ यो हाऽन्यां देवतां उपास्ते अन्यः असौ, अन्यः अहं अस्मि इति; न स वेद; यथा पशुः एवं**’(शातपथी श्रुति)—**अर्थ** स्पष्ट आहे. सारांश परमेश्वराशिवाय असणारे इतर देवतांचें भजनपूजन जन्ममरणांतून सोडविण्यास असमर्थ आहे.

**मधुसूदन**—प्रत्येक देवतेच्या अंतर्यामीं परमेश्वर आहे असें सम**जून** आराधन करितात व त्यास कर्में समर्पितात,, ते क्रममुक्तीप्रत पावतात असा येथें विवेक आहे.

**शंकरानंद**—'मी यज्ञभोक्ता, फलदाता, नेता आहे, असें समजून ही त्यांस मीच अर्पण, मीच हवि, हें किंवा सर्व ब्रह्म आहे, हें तत्त्व समजत नाहीं.'

**चतरजी**—'यज्ञकर्ता मी व यज्ञभोक्ताही मीच आहे.' असें समजत नाहीं. यज्ञ करणारा जो पुरुष त्याचा आत्मा मी व यज्ञभोक्ता जो देव त्याचा आत्माही मीच; हें त्यांस समजत नाहीं.

**द्विवेदी**—'साखर न समजून खाल्ली तरी गोड लागते, तद्वत् न समजून ईश्वरीभजन झालें म्हणजे मोक्ष मिळावा!' या शंकेचें समाधान असें कीं ज्याप्रमाणें भाव असेल त्याप्रमाणें वासना नियमानें असतील व असतात; आणि वासनांप्रमाणें कर्म होऊन फलप्राप्ति होईल. साखरच ताप आलेल्या मनुष्यास कडू लागते. एवंच भाव शुद्ध हवा, म्हणजे कर्म विधिपूर्वक होऊन ज्ञान होतें व पुढें क्रमानें मोक्ष मिळतो.

**पंडित**—'मी यज्ञांचा स्वामी आहे म्हणजे देवांचा स्वामी आहे.' या वाक्यांवरून सगुणाचें व्याख्यान करितात. ॥ २४ ॥

**येऽप्यन्यदेवताभक्तिमत्त्वेनाविधिपूर्वकं यजन्ते तेषामपि यागफलमवश्यंभावि; कथम्**—

**शिष्य**—म्हणजे इतर देवतांची भक्ति केल्यामुळें ज्यांचें भजन अविधिपूर्वक झालें त्यांस कांहींच फळ मिळत नाहीं?

**गुरु**—तसें नव्हे: त्यांसही स्वकर्मानें अवश्य फल मिळतें; तें कसें तें ऐक—

यान्ति देवव्रता देवा-
न्पितॄन्यान्ति पितृव्रताः ॥
भूतानि यान्ति भूतेज्या
यान्ति मद्याजिनोऽपि माम् ॥२५॥

देवव्रताः देवान् यान्ति, पितृव्रताः पितॄन् यान्ति; भूतेज्याः भूतानि यान्ति; अपि मद्याजिनः मां यान्ति (देवांचे भक्त

देवलोकास जातात; हे सात्विक भक्त होत. पूर्वजांचें आराधन करणारे पितृलोकास जातात; हे राजस होत. भूतांची पूजा करणाऱ्यांस भूतत्व प्राप्त होतें; आणि हे तामस होत. त्रिगुणातीत जो मी त्या माझें भजनपूजन करणारे लोक माझ्याकडे येतात. )

**यान्ति गच्छन्ति देवव्रता देवेषु व्रतं नियमो भक्तिश्च येषां ते देवव्रता देवान्यान्ति पितॄनग्निष्वात्तादीन्यान्ति पितृव्रताः श्राद्धादिक्रियापराः पितृभक्ताः। भूतानि विनायकमातृगणचतुर्भगिन्यादीनि यान्ति भूतेज्या भूतानां पूजकाः। यान्ति मद्याजिनो मद्यजनशीला वैष्णवा मामेव। समानेऽप्यायासे मामेव न भजन्तेऽज्ञानात्। तेन तेऽल्पफलभाजो भवन्तीत्यर्थः ॥ २५ ॥**

देवतांच्या प्रसन्नतेसाठीं जे लोक देवतांचीं व्रतें ( अवदानें देणें, प्रदक्षिणा घालणें, उपवास करणें इत्यादि ) व भक्ति करितात, ते लोक देवलोकांप्रत जातात; पूर्वजभक्त जे असतात व जे श्राद्धादिकांनीं पितरांची प्रसन्नता संपादून घेतात ते लोक पितृलोकांस जातात. ( ज्यांनीं मृत्युलोकीं अग्नीची उपासना केली नाहीं ते लोक अग्निष्वात्त नामक पितरलोक आहे, तेथें जातात. ) भूतांचे जे भक्त आहेत ते लोक विनायक, मातृगण, चतुर्भगिनी इत्यादि भूतदेवतांप्रत जातात. आणि माझें पूर्णस्वरूप आत्मज्ञानानें ओळखून जे सर्वव्यापित्वानें माझें आराधन करितात, सारांश जे वैष्णव आहेत, ते माझ्याप्रत येतात.

**शिष्य**--सर्वत्र सारखेच श्रम असतांही लोक सर्वव्यापी परमेश्वराचें भजन कां बरें करित नाहींत?

**गुरु**---अज्ञानामुळें! असो; या अज्ञानामुळें त्यांची उपासना विधिशून्य होते. त्यांस उपासनाफल मिळतें, पण तें चिरस्थायी नसतें. कालभंगुर फल त्यांस मिळतें. एवंच इतर देवतांचे भक्त संसारांत पडतात.

**प्रपाकार** —' परमेश्वराचें संतर्पण झालें म्हणजे सर्व देवता तृप्त होतात.'

**मधुसूदन**—' यथा यथोपासते तदेव भवतीति श्रुतेः ' (जशी उपासना तसें फल. ज्याची उपासना करावी तें स्वरूप प्राप्त होतें.)

**धनपति**—देवतोपासना व वासुदेवोपासना या दोहोंस श्रम सारखेच लागत असून व वासुदेवोपासना अत्यंत उत्तम फल ( मोक्ष ) देणारी आहे असें असूनही येथील लोक अल्पफल देणाऱ्या देवतांची उपासना करितात ! काय म्हणावें लोकांच्या या मूर्खपणाला ?

**द्विवेदी**—येथें 'मी देतों' ' मला येऊन मिळतात.' वगैरे ठिकाणीं सावयव, सगुण ब्रह्माचा आभास होतो. वस्तुतः ज्ञानी बुद्धिवंताला असा आभास होणें इष्ट नाहीं. मोक्ष मिळविणें आहे तर अभेदवृत्ति अखंड हवी. श्रीकृष्णपरमात्मा हें परब्रह्माचें प्रकट स्वरूप होय. हें खरें आहे; पण मुळाशीं अभेदपूर्ण असें एकच ब्रह्म आहे.

**श्रीरामानुज**—' देवव्रत=इंद्रादि देवतांस दशपौर्णमासादि यज्ञांनीं तृप्त करीन असा संकल्प करणारा.' व्रत = संकल्प ॥ २५ ॥

**न केवलं मद्भक्तानामनावृत्तिलक्षणमनन्तफलं सुखाराधनश्चाहं कथम्**—

अर्जुना ! माझ्या भक्तांस अनंतफल, मोक्षफल मिळतें, इतकेंच नाहीं तर अत्यंत मोठें फल मिळतें; शिवाय माझ्या आराधनेला श्रमही फारसे लागत नाहींत. माझी भक्ति सोपी आहे. कशी ती ऐक.—

पत्रं पुष्पं फलं तोयं
यो मे भक्त्या प्रयच्छति ॥
तदहं भक्त्युपहृत-
मश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥

**यः मे पत्रं, पुष्पं, फलं, तोयं भक्त्या प्रयच्छति** ( जो कोणी शुद्ध भक्तिपूर्वक मला कोणतीही वस्तु मग ती पान, फुल, फळ, पाणी, कांहींही असो; अर्पण करितो)-त्यानें अर्पित अशी-**भक्त्युपहृतं तत्** ( ती भक्तिपुरःसर मला दिलेली वस्तु ) **अहं अश्नामि** ( मी स्वीकृत करितों, घेतों). **प्रयतात्मनः** ( मात्र त्याचें अंतःकरण निर्मळ पाहिजे )-सारांश निर्मळ मनानें परमेश्वरास जें जें आपण अर्पण करितों त्याचा तो स्वीकार आदरपूर्वक करितो.--

**पत्रं पुष्पं फलं तोयमुदकं यो मे मह्यं भक्त्या प्रयच्छति तदहं पत्रादि भक्त्योपहृतं भक्तिपूर्वकं प्रापितं भक्त्युपहृतमश्नामि गृह्णामि प्रयतात्मनः शुद्धबुद्धेः ॥ २६ ॥**

ज्याचें अंतःकरण निर्मळ, वासनाशून्य, अभिमानरहित व ज्ञानस्वरूप झालें आहे अशा आत्मस्वरूपी भक्तानें मला एकनिष्ठ भक्तिपूर्वक पान दिलें, फूल वाहिलें, फळ अर्पण केलें किंवा पाणी पुढें केलें, एवंच कांहीं दिलें तरी तो भक्तीनें अर्पण केलेला शुद्ध व विहित नैवेद्य मी आदरपूर्वक स्वीकारितों. सारांश माझ्या आराधनाला दंभाची, अवडंबराची अवश्यकता नाहीं. शुद्धचित्त मला हवें, खरा भाव हवा; आत्मस्वरूपी ज्ञान असलें म्हणजे माझें आराधन संपूर्ण होतें.

**प्रपाकार**—परमेश्वराची पूर्ण प्रसन्नता केवळ भक्तीनें मात्र प्राप्त व्हावयाची आहे.

**मधुसूदन, पर्वते, रंगनाथ**—' वासुदेवाव्यतिरिक्त कांहीं नाहीं, वासुदेवाचेंच सर्व कांहीं आहे.' ' वासुदेवाचा मी भृत्य वासुदेवाचेंच सर्व वासुदेवरूपी यजमानास देतों; ' असा निश्चय करून जो भक्तिपूर्वक आणिलेली वस्तु भक्तिपूर्वक अर्पितो, तो मला प्रिय आहे. अभक्ताचें ब्राह्मणत्व किंवा तपस्वीत्व मला प्रिय नाहीं.

**शंकरानंद**—' धिगनीशार्चनं जन्म ' ( ईश्वराचें आराधन करीत नाहीं त्याचें जन्म व्यर्थ होय. )

**श्रीरामानुज**—सगुणपर अर्थ सर्वत्र लावितात. **' याः क्रियाः संप्रयुक्ताः स्युरेकान्तगतबुद्धिभिः । ताः सर्वाः शिरसा देवः प्रति-**

गृह्णाति चै स्वयं ' ( एकनिष्ठभावानें अर्पण केलेल्या सर्व क्रिया परमेश्वर मोठ्या आदरानें स्वीकारितो ).

द्वैतवादी—एतावानेव लोकेऽस्मिन् पुंसां स्वार्थः परः स्मृतः। एकांतभक्तिर्गोविंदे यत्सर्वत्रात्मदर्शनम् ॥ ' (या लोकीं मनुष्याचा उत्तम स्वार्थ म्हणजे गोविंदाचे ठिकाणीं एकनिष्ठभक्ति आणि सर्वत्र आत्मदर्शन हीं होत ). आत्मदर्शन = परमेश्वरदर्शन असा द्वैतवाद्यांचा अर्थ आहे. ब्रह्मवादी ' ब्रह्मदर्शन ' असा अर्थ करितील.

ज्ञानेश्वरांचें २१।२६ श्लोकांवरील व्याख्यानांत अभिमानशून्यतेची थोरवी व भक्त्यर्पित पुष्पफळाचें सौभाग्य हें अत्यंत रसाळ वाणीनें ओतप्रोत भरलें आहे.

यत एवमत

असें आहे म्हणूनः—

# यत्करोषि यदश्नासि
# यज्जुहोषि ददासि यत् ॥
# यत्तपस्यसि कौन्तेय
# तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ २७ ॥

**यत् करोषि; यत् अश्नासि; यत् जुहोषि; यत् ददासि कौन्तेय, यत् तपस्यसि** ( अर्जुना ! तूं जें काय करितोस, ज्याचा उपभोग घेतोस; ज्याचें हवन करितोस; जें दान करितोस; जी तपश्चर्या करितोस, सारांश जें जें काय करितोस ) **तत् मदर्पणं कुरुष्व** ( तें सर्व मला, परमेश्वराला, अर्पण कर. )

यत्करोषि स्वतः प्राप्तं यदश्नासि यच्च जुहोषि हवनं निर्वर्तयसि श्रौतं स्मार्तं वा, यद्ददासि प्रयच्छसि ब्राह्मणादिभ्यो हिरण्यान्नाज्यादि यत्तपस्यसि तपश्चरसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणं मत्समर्पणम् ॥ २७ ॥

म्हणून जें कांहीं धार्मिक अगर व्यावहारिक कर्म तूं करशील, ज्याचा उपभोग घेशील ( खाशील, पिशील इत्यादि ), श्रौतस्मार्त यज्ञांमध्यें जें कांहीं हवन करिशील ( हव्यकव्य करिशील ), ब्राह्मणांस अगर इतर अनाथांस जें कांहीं द्रव्यरूपानें, अन्नरूपानें, घृतरूपानें, दान करिशील, तसेंच जी कांहीं यमनियमादि द्वारा तपश्चर्या करिशील, सारांश जें कांहीं काम्य, विहित, नित्यनैमित्तिक किंवा व्यावहारिक स्वरूपानें करिशील, तें सर्व हे अर्जुना! मला, सर्वव्यापी, सर्वान्तरात्मा जो परमेश्वर त्याला, शुद्ध मनानें अर्पण कर. एवंच अर्पिलेल्या वस्तुपेक्षां अर्पण करणाऱ्या अंतःकरणाची किंमत विशेष आहे.

**प्रपाकार**—संकल्पमात्रानें सुद्धां मला भक्त्यर्पित वस्तु प्राप्त होते.

**श्रीधर**—यज्ञयागादिकांची खटपट करण्याचेंही कारण नाहीं. केवळ आपण जें काम करितों तें ईश्वरास भक्तिपूर्वक अर्पावयाचें आहे.

**शंकरानंद**—हीं कर्में विहित व लोकविद्वेषशून्य पाहिजेत.

**चतरजी**—( १ कारि. अ० १० श्लो० ३१, व काल० अ० ३ श्लो० १७ पहा. जें काय आपण करितों तें ईश्वराचें महत्त्व प्रकट करण्यासाठीं करावें ).

**द्विवेदी**—सर्व कर्म ब्रह्मार्पण करावें; व कर्म करणें तें ब्रह्मदृष्टीनें करावें.

**श्रीरामानुज**—कर्ता, कर्म, करण, फळ हीं सर्व परमेश्वरास समर्पण करावीं.

**ज्ञानेश्वर**—परी सर्वथा अपुले जीवीं। कोलियाची से (स्मृति) कांहींचि नुरवीं। ऐसीं धुवोनि कर्में द्यावीं। माझीया हातीं॥

**पंडितांनीं** भागवतधर्माचा 'ओनामा' असा ठरविला आहे कीं 'जें काय आपण अष्टोप्रहर करितों तें सर्व परमेश्वरास भक्तिपूर्वक निष्कामबुद्धीनें समर्पावें.' गोष्ट खरी आहे. ॥ २७ ॥

**एवं कुर्वतस्तव यद्भवति तच्छृणु**

असें केलें असतां काय फलप्राप्ति होते ती ऐक—

शुभाशुभफलैरेवं
मोक्ष्यसे कर्मबंधनैः ॥
संन्यासयोगयुक्तात्मा
विमुक्तो मामुपैष्यसि ॥ २८ ॥

**एवं** ( याप्रमाणें ) **शुभाशुभफलैः कर्मबंधनैः मोक्ष्यसे** (मंगल किंवा अमंगलफलें देणारीं धर्मयुक्त व अधर्मयुक्त कर्मे असतात, त्यांच्या बंधनापासून तूं मुक्त होशील. )—आणि—**संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तः मां उपैष्यसि** ( सर्व कर्माचें कर्तृत्व व भोक्तृत्व टाकून दिल्यामुळें संन्यासयोगच साध्य झाला आहे ज्याच्या आत्म्याला, असा जो तूं तो मुक्त होत्साता माझ्या स्वरूपाप्रत पावशील. )

शुभाशुभफलैरेवं शुभाशुभे इष्टानिष्टफले येषां तानि शुभाशुभफलानि कर्माणि तैः शुभाशुभफलैः कर्मबन्धनैः कर्माण्येव बन्धनानि तैः कर्मबन्धनैरेवं मत्समर्पणं कुर्वन्मोक्ष्यसे । सोऽयं संन्यासयोगो नाम संन्यासश्चासौ मत्समर्पणतया कर्मकर्तृत्वाद्योगश्चासाविति तेन संन्यासयोगेन युक्त आत्माऽन्तःकरणं यस्य तव स त्वं संन्यासयोगयुक्तात्मा सन्विमुक्तः कर्मबन्धनैर्जीवन्नेव पतिते चास्मिञ्शरीरे मामुपैष्यस्यागमिष्यसि ॥ २८ ॥

याप्रमाणें मला, विश्वात्म्याला, सर्व कर्में व सर्व कर्मफलें, कर्तृत्व व भोक्तृत्व अर्पण करणारा झालास म्हणजे त्यांचा तुला स्पर्श न होतां कर्मबंधनांपासून तूं मुक्तच होशील. कर्मांपासून उत्पन्न होणारीं जीं चांगलीं वाईट, पापपुण्यात्मक, सुखदुःखात्मक फलें आहेत तींच अज्ञानी पुरुषास संसारांत ढकलितात. अथवा कर्मफलांची कारणें जीं कर्में तींही कामुक पुरुषास जन्ममरणाच्या बंधांत दाबून टाकितात. एतदर्थ ज्याला

कर्मपाशांतून सुटावयाचें आहे त्यानें कर्मबंधाचा पाश म्हणजे वासना व अभिमान यांचा निश्चयपूर्वक त्याग केला पाहिजे. यालाच संन्यासयोग म्हणावें, काम्य कर्मांचा त्याग करून सर्व कर्मांचें कर्तृत्व व भोक्तृत्व परमेश्वरास एकनिष्ठेनें व ज्ञानपूर्वक समर्पण करणें व शुद्धचित्त होणें हाच संन्यासयोग होय. मुमुक्षूच्या अंतःकरणाशीं या योगाची पूर्ण एकतानता ज्ञानविज्ञानपूर्वक झाली म्हणजे त्यास सन्यासयोगयुक्तात्मा म्हणावयाचें. जिवंत असतांनाच कर्मपाशांतून तो सुटतो. ही जीवन्मुक्त स्थिति होय. नंतर, हें शरीर पडल्यानंतर, तो पुरुष परमेश्वराप्रत जातो. हें सांगणें नकोच. येथें सर्वकर्मत्याग अर्जुनदृष्ट्या इष्ट नाहीं, असें धनपति म्हणतात.

**प्रपाकार**—भाजलेलें बीं जसें उगवत नाहीं, तशींच ब्रह्मार्पणबुद्धीनें केलेलीं कर्मं फलप्रद होत नाहींत.

**मधुसूदन** व **रंगनाथ**,—सम्यग्दर्शन होऊन अज्ञान नष्ट झाल्यावर 'मीच ब्रह्म आहें' असा साक्षात्कार होईल आणि प्रारब्धभोग संपल्यावर मुक्ति मिळेल.

**शंकरानंद**—'मी असंग, कूटस्थ, सर्वव्यापी ब्रह्म आहें' असें ज्ञान झालें ह्मणजे विदेहकैवल्य मिळेल.

**श्रीरामानुज**—'माझ्या आराधनपर सर्व वैदिक व लौकिक कर्म कर. ईश्वराचा अंश तूं आहेस व ईश्वरतंत्र आहेस असें जाण.'

**पंडित**—विमुक्त = विपरीतापासून मुक्त.

**रंगनाथ**—**अथवा सगुणरूपें जे ध्याती। त्यांचे ठायीं वसे श्रीकृष्णमूर्ती। आणि मी तयांतें अखंड चिंतीं। अनन्य प्रीति करूनिया॥**

**टामसन**—यांनीं संन्यास व योग यांचा वियोग असा अर्थ विषयसंबंध न कळल्यामुळें केला आहे! ॥ २८ ॥

**रागद्वेषवांस्तर्हि भगवान्यतो भक्ताननुगृह्णाति नेतरानिति तन्न—**

**शिष्य**—पुनः पुनः मला अशी शंका येते कीं सर्वसाक्षी भगवान हा पक्षपाती असून लोभद्वेषयुक्त आहे; कारण तो आपल्या भक्तांवर मात्र अनुग्रह करितो; पण इतरांवर निग्रह चालवितो!

गुरु—तसें नाहीं. ऐक—प्रत्यक्ष भगवानच सांगतात—

**समोऽहं सर्वभूतेषु**
**न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः**
**ये भजन्ति तु मां भक्त्या**
**मयि ते तेषु चाप्यहम् ॥ २९ ॥**

**अहं सर्वभूतेषु समः** ( मी सर्व ब्रह्मादि स्तंबपर्यंत भूतांस सारखाच आहे ) **मे द्वेष्यः न अस्ति; न प्रियः अस्ति** ( माझा कोणी शत्रु नाहीं व मित्रही नाहीं; मी कोणाचा द्वेष करित नाहीं, किंवा कोणावर लोभही करित नाहीं. ) **तु** (परंतु) **ये मां भक्त्या भजन्ति** ( जे माझी भक्तिपूर्वक आराधना कारितात ) **ते मयि च तेषु अपि अहं** ( ते माझ्यामध्यें राहतात, माझ्याशीं तादात्म्य पावतात; व त्यांच्यामध्यें मीही असतों म्हणजे आत्मस्वरूप मीच होतों. )—सारांश परब्रह्मास किंवा परमात्म्यास कोणी शत्रु नाहीं, किंवा मित्रही नाहीं. जे त्याची ज्ञानपूर्वक आराधना करितात ते परब्रह्माशीं तादात्म्य पावतात व परमात्माही त्यांचा आत्मा होऊन राहतो. एवंच अभेदवृत्ति होते.

**समस्तुल्योऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियोऽग्निवदहं दूरस्थानां यथाऽग्निः शीतं नापनयति समीपमुपसर्पतामपनयति तथाऽहं भक्ताननुगृह्णामि नेतरान्। ये भजन्ति तु मामीश्वरं भक्त्या मयि ते स्वभावत एव न मम रागनिमित्तं मयि वर्तन्ते। तेषु चाप्यहं स्वभावत एव वर्ते नेतरेषु नैतावता तेषु द्वेषो मम ॥ २९ ॥**

सर्व भूतांशीं मी सारखेपणानेंच वागतों; कारण मला ममत्वच नसल्यामुळें माझा कोणी प्रिय असूं शकत नाहीं किंवा द्वेष्यही असणें संभवत नाहीं. ‘ **अप्राणो ह्यमनाः** ’ ( याला प्राण नाहीं, मन नाहीं, अशी श्रुतिच आहे.

**शिष्य**—असें झालें तर भगवंताचें भजन तरी कशाला करावें? जर तो अनुग्रह करित नाहीं किंवा निग्रहही करित नाहीं, तर त्याची सेवा तरी काय म्हणून करावी?

**गुरु**—पडलास फलाभिलाषाच्या पाशांत पुनः! अरे! ज्याप्रमाणें अग्नि हा जवळ येणाऱ्या लोकांची थंडी नाहींशी करितो, पण दूरच असतील त्यांचें शीतापहरण करित नाहीं, त्याप्रमाणेंच भगवंतास जे शरण जातील त्यांच्यावर सहजच अनुग्रह होतो, इतरांवर होत नाहीं. अग्नि जसा इष्टमित्र ओळखीत नाहीं, मात्र जवळ येणाऱ्यांचा शीतोपद्रव निवारण करितो, तशीच भगवंताची सहजवृत्ति आहे. एवंच स्वतःचें अंतःकरण प्रयत्नानें शुद्ध करून जे आत्मज्ञान संपादन करणारे एकनिष्ठ भक्त असतात, ते आपल्या भक्तिबलानेंच, सहजच, भगवान म्हणतातः माझ्या स्वरूपामध्यें राहूं लागतात. माझ्या प्रेमाचा येथें संबंध नाहीं; त्यांच्या निष्काम कर्माचा हा प्रभाव आहे. तसेंच आपल्या निरतिशय भक्तीनें मात्र ते मला स्वस्वरूपांत नेतात. ही साहजिक स्थिति आहे. इतरांस ज्ञान नाहीं, म्हणून हा लाभ नाहीं. एवंच इतरांवर माझा कोप नसतो. बरें?

**शिष्य**—म्हणजे सर्वप्रकाशक सूर्याचा प्रकाश जसा स्वच्छ आरशावर पूर्णत्वानें पडतो व प्रतिबिंब स्वच्छ उठतें, तसा मलीन आरशावर पडत नाहीं व प्रतिबिंबही विसदृश पडतें; याला कारण आरशाची स्वच्छता आहे. तसेंच परमेश्वराचा अनुग्रह संपादण्यास स्वच्छता व निर्मळ मन असणें हें अवश्यक आहे; व तें पुरुषकृत आहे, ईशनिर्मित नव्हे; असेंचना?

**गुरु**—बरोबर समजलास. हें स्वच्छ मन संपादण्यास ज्ञानपूर्वक कर्मफलत्याग व कर्माभिमानशून्यता अगत्य हवींत.

**प्रपाकार**—मार्गावरील वृक्ष जसा कोणाचा लोभद्वेष न करितां पानें, फुलें, फळें, व मुळें देऊन जसे ज्यांचे मनोगत असतील तसे त्यांचे ते पूर्ण करितो, तसाच ईश्वरी प्रकार आहे. याच अर्थाची ऋग्वेद श्रुति देतात. '**या ते धामानि परमाणि**' इत्यादि.

**नीलकंठ**—अभक्तांच्या चित्तांत असणाऱ्या मीझें त्या दुष्टांस ज्ञान नसतें.

**मधुसूदन व रंगनाथ**—सद्रूपानें, आनंदरूपानें व नियंतृत्वरूपानें मी सर्वांस सारखा आहें.

**शंकरानंद**—ज्यांस माझें ज्ञान होतें, तें सुटतात; ज्यांस होत नाहीं ते बंधांत पडतात.

**चतरजी**—( माथ्यु अ० ९ श्लो० ४९; जान अ० १४ श्लो० २३; जोब अ० ३३ श्लो० ६।७ इ० पहा.)

**द्विवेदी**—जसें ज्ञान व जशी भक्ति, तितक्याच प्रमाणानें शांति व साक्षात्कार होतात.

**श्रीरामानुज**—माझ्या भजनाशिवाय प्राणधारण करणें ज्यांस संकट वाटतें ते माझे भक्त.

**द्वैतवादी**—'**ये वै भजंते परमं पुमांसं तेषां वशः स तु ते तद्वशाश्च**' ( देवभक्तांचा दास व ते देवाचे दास होतात ).

**ज्ञानेश्वर**—**जैसा दीपें दीप लाविजे । तेथ आदील** (पहिला) **कोण हें नोळखिजे । तैसा सर्वात्मत्वें जो मज भजे । तो मीच होऊनि ठाके ॥ २९ ॥**

**शृणु मद्भक्तेर्माहात्म्यम्**—

माझ्यावरील एकनिष्ठभक्तीचें अवितर्क्य माहात्म्य तर ऐक.—

**अपि चेत्सुदुराचारो**
**भजते मामनन्यभाक्**
**साधुरेव स मन्तव्यः**
**सम्यग्व्यवसितो हि सः ॥ ३० ॥**

**सुदुराचारः अपि चेत् मां अनन्यभाक् भजते** ( एखादा कोणी दुर्वृत्त असून पूर्वकर्मानें उपरति पावला व अनन्यभावानें यथाशास्त्र भक्ति करूं लागला )—तर—**स साधुः एव मन्तव्यः** ( त्याला साधुत्वपदवी प्राप्त होते. ) **हि** ( कारण ) **सः सम्यग्व्यवसितः** ( त्या-

च्या बुद्धीला स्थिरता येऊन तो सन्मार्गाला लागलेला असतो. )— सारांश वाईट मनुष्यास उपरति होऊन तो जर भगवद्भजनास लागला तर तोही स्वयोग्यतेनुसार पवित्र होतो.—

**अपि चेद्यद्यपि सुष्टु दुराचारः सुदुराचारोऽतीव कुत्सिताचारोऽपि भजते मामनन्यभक्तिः सन्साधुरेव सम्यग्वृत्त एव स मन्तव्यो ज्ञातव्यः सम्यग्यथावद्व्यवसितो हि यस्मात्साधुनिश्चयः सः ॥ ३० ॥**

**अर्जुना!** अत्यंत निंद्य व गर्हणीय असें आचारण जातिस्वभावानें अगर स्वतःच्या दुष्टत्वानें करणाऱ्या एखाद्या पुरुषाला पश्चात्ताप होऊन तो जर एकनिष्ठभावानें व आत्मस्वरूपानें सर्वात्मक परमेश्वराचें ज्ञानपूर्वक आराधन पूर्वसंचितबलानें करूं लागला तर त्या पुरुषाला ही त्याच्या सदाचरणानें साधुपदवी प्राप्त होते; कारण नित्य, अखंड, व निर्विकार वस्तुस्थिति कशी आहे ही समजून घेऊन व परमात्मभजनानेंच मोक्ष मिळेल असा निश्चय करून त्याप्रमाणें आचरण करण्याचा त्याचा निश्चय झालेला असतो.—हें व्याख्यान आगंतुक दोषानें दुष्ट असलेल्या पुरुषांसंबंधें झालें.—

**शंकरानंद**—ह्या श्लोकांत ज्ञानाचें पवित्रत्व वर्णिलें आहे. ब्रह्मविद्यतीनें कोणतेंही कर्म केलें तरी तो शुद्धच राहतो असाही एक आग्रहाचा अर्थ करितात. आचार्यांचा अर्थ संदर्भास धरून आहे.

**चतरजी**—(इसाया अ० १ श्लो० १८।१९ पहा.) पापी पुरुषास ईशभक्ति हेंच मोक्षसाधन आहे.

**श्रीरामानुज**—'**सगुण ब्रह्माचा निश्चय झाला आहे**' तो साधुनिश्चय, सम्यग्निश्चय, होय.' ॥ ३० ॥

**उत्सृज्य च बाह्यां दुराचारतामन्तःसम्यग्व्यवसायसामर्थ्यात्**

अंतःकरणाचा दृढनिश्चय सद्वस्तु संपादन करण्याचा झाल्यामुळें त्याचें बाहेरील ( कृतिमध्यें प्रकट होणारें ) दुराचरण, दुर्विचार व दुष्टइच्छा परित्यक्त होतात आणि—

**क्षिप्रं भवति धर्मात्मा**
**शश्वच्छान्तिं निगच्छति ॥**
**कौन्तेय प्रतिजानीहि**
**न मे भक्तः प्रणश्यति ॥ ३१ ॥**

**क्षिप्रं धर्मात्मा भवति** ( तो लवकरच पुण्यशील होतो ),–आणि **शश्वच्छान्ति निगच्छति** ( निरंतर राहणाऱ्या शांतीला संपादन करितो. ) **कौन्तेय** ( अर्जुना ! ) **मे भक्तः न प्रणश्यति प्रतिजानीहि** ( माझा भक्त कधींही नाश पावत नाहीं अशी प्रतिज्ञा तूं नित्य प्रकट करित जा. )– सारांश तुला असें निश्चितपणानें समजण्यास हरकत नाहीं कीं परमेश्वराचा भक्त जन्ममरणाच्या नाशरूपी चक्रांत कधींही सांपडत नाहीं. तो लवकरच साधुवृत्त होऊन अखंड शांतीच्या धामामध्यें जाऊन राहतो. हें तूं खुशाल प्रसिद्ध कर.–

**क्षिप्रं शीघ्रं भवति धर्मात्मा धर्मचित्त एव शश्वन्नित्यं शान्तिं चोपशमं निगच्छति प्राप्नोति । शृणु परमार्थं कौन्तेय प्रतिजानीहि निश्चितां प्रतिज्ञां कुरु न मे मम भक्तो मयि समर्पितान्तरात्मा मद्भक्तो न प्रणश्यतीति ॥ ३१ ॥**

तो लवकरच पुण्यकर्मा, निर्मळचित्त व शास्त्रविहित आचरण करणारा होऊन पुढें एकनिष्ठ निष्कामभक्त होतो. कारण दुराचारानें उत्पन्न होणारी तळमळ क्रमानें नाहींशी होऊन, त्याचें दुराचरण संपल्यामुळें, व तो विषयविन्मुख झाल्या कारणानें व भगवद्भक्तीचा प्रसाद त्यास झाल्यामुळें, त्यास अखंड व अबाधित अशी शांति निश्चितरीत्या मिळते. अर्जुना ! तुला एक परमार्थतत्त्वाची गोष्ट सांगतो ती ऐकून ठेवून कंठरवानें प्रकट व प्रसृत ही करः अर्जुना ! ज्या भक्तानें आपलें चित्त मला, सर्वव्यापी, सर्वात्मक परमेश्वराला सर्वथा अर्पण केलें आहे, असा माझा भक्त कधींही नाश पावत नाहीं, जन्ममरणाच्या

चक्रांत कधींही सांपडत नाहीं; कारण माझ्या भक्तीनें त्याचा सर्व पापमल व मळाचें कारण धुवून टाकिलेलें असतें.

**मधुसूदन व रंगनाथ**—' **न वासुदेवभक्तानां अशुभं विद्यते क्वचित्**' अजामिळ, प्रल्हाद, ध्रुव हे दृष्टांत होत.

**चतरजी**—( जान अ० ९ श्लो० २४ पहा. )

**श्रीरामानुज**—माझ्या भक्ताची भक्ति पूर्णत्वास पावते असें अर्जुना! सर्वत्र सांग.

ज्ञानेश्वरांनीं भक्तिहीनाचें जिणें व्यर्थ आहे हें दृष्टांतांनीं सुविशद केलें आहे. भगवद्भक्ति झाल्यावर दुराचार राहत नाहीं. ॥ ३१ ॥

**किंच**—

आणखी जातिस्वभावेंकरून दुष्ट असतात त्यासंबंधें म्हणतात—

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य**
**येऽपि स्युः पापयोनयः ॥**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रा-**
**स्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥३२॥**

**हि** ( प्रसिद्ध आहे कीं ) **ये अपि पापयोनयः, स्त्रियः, वैश्याः तथा शूद्राः स्युः** ( स्त्रिया, वैश्य, शूद्र, इत्यादि साहजिकतःच पापापासून उत्पन्न झालेले जे लोक असतील ) **ते अपि मां व्यपाश्रित्य, पार्थ, परां गतिं यान्ति** ( ते लोक सुद्धां माझा आश्रय केल्यानंतर उत्तमोत्तम गतीला जातात.

**मां हीति । मां हि यस्मात्पार्थ व्यपाश्रित्य मामाश्रयत्वेन गृहीत्वा येऽपि स्युर्भवेयुः पापयोनयः पापा योनिर्येषां ते पापयोनयः पापजन्मानः । के त इत्याह स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति गच्छन्ति परां गतिं प्रकृष्टां गतिम् ॥ ३२ ॥**

भक्तीच्या साम्राराज्यांत जातीला महत्व नाहीं, प्रेमानें सर्व जीव समत्व पावतात, असें सांगण्यासाठीं भगवान म्हणतात, अर्जुना! पापयोनीमध्यें, पापजातीमध्यें, ज्यांचा जन्म झाला आहे असे लोक–स्त्रिया, वैश्य, शूद्र इत्यादि जीव-जे कोणी असतील, त्यांनींसुद्धां माझा आश्रय केला असतां, मला एकनिष्ठ भावानें शरण आले असतां, ते लोक उत्तमोत्तम अशी जी सायुज्यस्थिति त्या स्थितीप्रत जातात. ब्रह्मज्ञानरूपी परिसाचा स्पर्श झाला असतां कोणतेंही लोखंड सुवर्णत्वच पावणार! हा **द्वीवेदींचा** दाखला उत्तम होय.

**शिष्य**—स्त्रिया, शूद्र, वैश्यांस पापजन्मी असें कां म्हटलें ?

**गुरु**—कारण, सहाजिकतःच त्यांच्या मनाची प्रवृत्ति विषय-विलासाकडे असते व विद्येचें अध्ययन त्यांस नसतें म्हणून त्यांस पापयोनी असें ह्मटलें.

**प्रपाकार; शंकरानंद**—ऋग्वेद, व सामवेद श्रुतींमधून वैश्यांचा उद्धार झाला आहे, असें दर्शविणाऱ्या श्रुती देतात.

**श्रीधर**—पापयोनी=निकृष्टयोनी, म्लेंच्छ, किरात, अन्त्यजादिक. शिवाय स्त्रिया इत्यादि असा अर्थ देतात.

**ज्ञानेश्वर**-- .... **म्हणोनि भक्ति येथ गा सरे** (सरस आहे. पुढारी होते.)। **जाति अप्रमाण** ॥ राजाज्ञेनें जसें मुद्रांकित कातडें चलन पावतें, तशी भक्तीनें मनुष्यांची किंमत ठरतें. परमेश्वरसन्निध गेल्यावर जातिभेद अगर लिंगभेद नाहीं.

पंडितांनींही ३०।३१।३२।३३।३४ मध्यें अनन्य भक्तीचें महात्म्य अत्यंत सुरसतेनें वर्णिलें आहे. स्त्रियांवर यांचा कटाक्ष आहेच.

**टामसन** साहेबांचें मार्थे हा श्लोक वाचून फिरलें! पण यांत आश्चर्य नाहीं. स्त्रिया, वैश्य, शूद्र यांस असें बाहेर काढल्यामुळें यांचा माथेशूळ उठला आहे! अधिकाराशिवाय ज्ञान नाहीं हें तत्त्व ख्रिस्ती लोकांतील अविवेकी लोकांस समजत नाहीं. तसेंच त्या श्लोकाचें स्वारस्यही साहेब महसुफांस कळलें नाहीं. असो; बुद्धमत प्रकट झाल्यावर गीता झाली असावी असा एक तर्क यांनीं व डेव्हिस साहे-बांनीं काढिला आहे तो असमंजस म्हणून बालिश होय. ॥ ३२ ॥

किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या
भक्ता राजर्षयस्तथा ॥
अनित्यमसुखं लोक-
मिमं प्राप्य भजस्व माम् ॥३३॥

**किं पुनः पुण्याः भक्ताः ब्राह्मणाः तथा राजर्षयः** (-तर मग-पुण्यजन्म पावलेले व माझी भक्ति करणारे ब्राह्मण व पुण्यश्लोक क्षत्रिय, सारांश ब्रह्मर्षि व राजर्षि यांस उत्तम गति प्राप्त होते; हें सांगावयास तरी हवें काय ? )-म्हणून-**इमं अनित्यं, असुखं, लोकं प्राप्य मां भजस्व** (हा क्षणभंगुर आणि दुःखदायक परंतु मोक्ष-साधक मृत्युलोक येऊन पावला आहेस त्यासाठीं माझें भजन कर )-

**किं पुनरिति । किं पुनर्ब्राह्मणाः पुण्याः पुण्ययोनयो भक्ता राजर्षयस्तथा राजानश्च त ऋषयश्चेति राजर्षयः । यत एवमतोऽनित्यं क्षणभङ्गुरमसुखं च सुखवर्जितमिमं लोकं मनुष्यलोकं प्राप्य पुरुषार्थसाधनं दुर्लभं मनुष्यत्वं लब्ध्वा भजस्व सेवस्व माम् ॥ ३३ ॥**

पापयोनींत जन्म पावूनही माझा आश्रय केल्यास जर उत्तम गति प्राप्त होते, तर पुण्ययोनींत जन्म पावलेले ब्राह्मण व पुण्यशील जनकादि क्षत्रिय ह्या सूक्ष्मविवेकी पुरुषांनीं जर माझी एकनिष्ठेनें भक्ति केली तर ते माझ्याशीं तादात्म्यच पावतात हें सांगावयाला तरी पाहिजे कशाला ? असो; असें आहे व कधीं न मिळावयाचा असा व ज्यांच्या साहाय्यानें मात्र मुख्य पुरुषार्थ साधणें शक्य आहे असा मनुष्य जन्म पावला आहेस, तसेंच हा मर्त्य लोक क्षणभंगुर व दुःखप्रचुर आहे असें तुला समजलें आहे, म्हणून तूं माझी एकनिष्ठतेनें आराधना करावयास लाग. आतां उशीर करूं नको. पापयोनी म्हणजे अन्यथ्याचरणानें जन्म पावलेले पशुपक्ष्यादिक असा अर्थ धनपतींस इष्ट नाहीं.

**मधाकार**—परमेश्वर अंतरस्थ भावाचा भोक्ता आहे, ‘ जेथें भाव तेथें देव ’ हें प्रसिद्ध आहे. शातपथी श्रुति म्हणते ‘ ( ज्यांस देवाचें ज्ञान झालें तोच देव होतो ). ’ अशीच ऋग्वेदश्रुति आहे.

**शंकरानंद व द्वैतवादी**—स्त्री शूद्रादिकांस ज्ञानाधिकार नाहीं हें सिद्ध करण्यासाठीं बरेंच विस्तृत पण अप्रासंगिक व्याख्यान या कर्मठाभिमान्यांनीं झोडलें आहे; पण ह्याचा निरास प्रो० द्विवेदींनीं उत्तम केला आहे.

**चतरजी**—पशुयोनींत अज्ञान असतें व देवयोनींत भोगरूपी समाधान असतें; ह्मणूनच मनुष्ययोनींत मात्र जीवाकरवीं पुरुषार्थसाधन घडूं शकतें; कारण हा लोक दुःखप्रद आहे व येथें दुःख आहे असें मनुष्यास ज्ञान आहे.

**द्विवेदी**—ज्ञानोदय झाला ह्मणजे पुनर्जन्म होऊन द्विजत्व प्राप्त होतें.

**नीलकंठ**—‘ परब्रह्माचें सत्यत्व या मृत्युलोकीं कळलें नाहीं तर पुढें महाअनर्थ उत्पन्न होतात. ’ अशा अर्थाची श्रुति देतात.

**समन्वयभाष्य**—२८–३४ श्लोकाचें तात्पर्य सांगतातः–जें जें आपण कर्म करितों तें तें भगवदाज्ञापालन आहे अशा बुद्धीनें वासनाशून्य व अहंकारशून्य भक्त आपलीं कर्में करीत असतो. हेंच कर्मसमर्पण होय. सिद्ध आहे तो आपली काया, मन बुद्धि इत्यादि कर्मसाधनेंच भगवंतास अर्पण करून त्याच्या प्रेरणेनें सर्व कर्म होतें असें समजतों; साधक आपल्या हातून होणारें कर्म परमेश्वरास समर्पितो. असो. कर्माचें आनंत्य आहे म्हणून सिद्धालाही कांहीं कर्मसंबंधें साधक होतां येतें. येथें ज्ञान म्हणजे भगवत्स्वरूपाचें ज्ञान, भक्ति म्हणजे कर्म समर्पण आणि कर्म करणें हें कर्म ह्या तिहींचें ( ज्ञानयोग, भक्तियोग व कर्मयोग यांचें ) साहचर्य असतें. भगवान सर्ववत्सल तर खराच; पण प्रत्येकाला ज्ञानभेदानें भिन्नानुभव येतो म्हणून भगवान सर्ववत्सल आहे असें प्रत्येकाला दिसत नाहीं; हा भगवंताचा दोष नव्हे तर जीवांनीं आपल्या स्वातंत्र्याचा अज्ञानानें

दुरुपयोग केला त्याचा दोष आहे. भगवद्भक्ति अनन्यत्वानें केली तर पापाचा नाश होतो; कारण पापबुद्धि चिरस्थाई नाहीं. कामक्रोधांचें कारण नष्ट झालें म्हणजे कामक्रोध नष्ट होतात. हें तत्त्व अज्ञानी लोकांस विदित नसतें म्हणून त्याचा प्रसार करावयाचा. हेतु इतकाच कीं भगवद्भक्तीनें सर्वांचा उद्धार व्हावा. शेवटच्या श्लोकांत ज्ञानयोग, भक्तियोग व कर्मयोग या तिन्ही योगांचें साहचर्य सांगितलें. नरहरी म्हणतातः या अध्यायांत परमेश्वर सत्य आहे, सत्तास्फूर्ति देणारा व नियंता तोच आहे, बाकी सर्व मिथ्या आहे हें ठरविलें.

**द्वैतवादी**---सर्वत्र सगुणपर अर्थ आहे.

**ज्ञानेश्वरांनीं** केलेल्या ब्राह्मण स्तुतीचा एक लक्षांश तरी आधुनिक ब्राह्मणांस मिळेल काय? असो; ....**आंगावरी पडतां पाषाण । न सुवावें केवीं वोडण** (ढाल कशी सर्वांगभर घेऊं नये?) । **रोगें दाटला' आणि उदासपण'। वोखदेसी ! ॥ जेथ चहूंकडे जळत वणवा । तेथूनि न निगिजे केवीं पांडवा ? । तेवीं लोका येऊनी सोपद्रवा । केविं न भजिजे मातें ? ॥अगा! मातें न भजावयालागीं। कवण बळ पां आपुलीया आंधीं । ....मज न भजतां सुखाचा। भरंवसा कोण ? ॥ ....अगा विषाचे कांदे वाटुनि । जो रस घेईजे पिळुनी । तया नांव अमृत ठेवूनी । जैसें अमर होणे ! ॥ तेविं विषयाचें जें सुख । तें केवळ परमदुःख । परि काय कीजे? मूर्ख । न सेवितां न सरे** ( सेवन न करितां दूर होत नाहीं. दुःखांचें सेवन करितो ! ) ॥ एकंदरीनें हें व्याख्यान सुवाचनीय आहे.

पंडित--अगा! **समर्थ कोण काळापरिस । त्यापासुनि जायाचा हा नरदेह परिस । प्राप्त झाला ह्मणोनि बापा ! आळस । न करीं, सोनें करीं लोखंडें आपलीं** ॥ ३३ ॥

**कथम्**—

कसें भजनपूजन करावयाचें? म्हणून विचारशील तर--

मन्मना भव मद्भक्तो
मद्याजी मां नमस्कुरु ॥
मामेवैष्यसि युक्त्वैव-
मात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥

**मन्मनाः, मद्भक्तः, मद्याजी, भव** ( माझ्या ठिकाणीं चित्तसर्वस्व अर्पण कर, माझा भक्त हो; माझ्या प्रीत्यर्थच सर्व विहित कर्मे कर. ) **मां नमस्कुरु** ( मलाच नमस्कार कर; मलाच शरण ये ) **मत्परायणः** ( मीच तुझा शेवटचा आश्रय आहे, माझ्याशिवाय तुला गति नाहीं; असा निश्चय कर. ) **एवं आत्मानं युक्त्वा मां एव एष्यासि** ( याप्रमाणें समाधिनिष्ठ झालास म्हणजे मजप्रतच येऊन पावशील. ) –सारांश तुला सायुज्यमुक्ति मिळेल.–

## इति श्रीमहाभारते श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे राजयोगोनाम नवमोऽध्यायः ॥९॥

मयि मनो यस्य स त्वं मन्मना भव । तथा भद्भक्तो भव । मद्याजी मद्यजनशीलो भव । मामेव च नमस्कुरु मामेवेश्वरमेष्यस्यागमिष्यासि युक्त्वा समाधाय चित्तम् । एवमात्मानमहं हि सर्वेषां भूतानामात्मा परा च गतिः परमयनं तं मामेवंभूतमेष्यसीत्यतीतेन पदेन संबन्धः, मत्परायणः सन्नित्यर्थः ॥ ३४ ॥

इति श्रीत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ श्रीमद्भगवद्गीताभाष्ये राजयोगो नाम नवमोध्यायः ॥ ९ ॥

माझ्या ठिकाणीं आपलें मनःसर्वस्व अर्पण कर; माझ्या व्यति-रिक्त दुसरें कांहीं चिंतन करूं नको. याचप्रमाणें माझा भक्त हो; पूज्यभाव माझ्यावर मात्र ठेव. माझी मात्र यज्ञयागादिरूपानें अगर पूजनअर्चनरूपानें आराधना करित जा. मी जो सर्वकर्ता, सर्वभोक्ता, सर्वानियंता परमेश्वर त्या मला नम्र हो. चित्त शांत व समाधिनिष्ठ झालें ह्मणजे माझ्या लोकाप्रतच येशील; आणि तुला सायुज्य मुक्ति मिळेल.

शिष्य--महाराज! परमेश्वर हाच सर्वांची शेवटची गति, शेवटचें आश्रयस्थान आहेना? अशा निरुपाधिक व उपद्रवशून्य परमेश्वरी-लोकाकडे जावयाचें म्हणजे जन्ममरणाला मारून टाकून नित्यसुखांत राहवयाचें असें होणार! असो; तेव्हां अशा सर्वव्यापी व सर्वांतर्यामी परमात्म्याला शरण गेलें असतां परमपदाची प्राप्ति होते. हाच आपला आशय ना?

गुरु--बरोबर समजलास. हें व्याख्यान जेथें ध्यानरूप आहे तेथें मध्यमाधिकारी लोकांस उपदेश आहे; पूजनार्चनादिक रूप आहे तेथें मन्दाधिकारी लोकांस उपदेश आहे. येणेप्रमाणें नवव्या अध्यायांत तत्पदलक्ष्य सोपाधिक ब्रह्माचें व्याख्यान झालें असें आनंदगिरी म्हणतात.

प्रपाकार--तात्पर्य सांगतातः

" विश्वाभासः किलासौ मदधिकरणकः स्यान्मदज्ञानकार्यं
यन्मिथ्या तद्धि सत्याश्रयमिति नियमो नैव मिथ्याश्रितं सत् ॥
सत्ये सत्यं भ्रमान्ते न भजति सहसाऽत्रास्थितं मय्यसंगे
तत्स्पर्शो वा कदाचिन्नभवति नवमेनोक्तमेतद्रहस्यम् ॥ "

हा सर्व विश्वासभास परब्रह्माच्या सत्तेनें उत्पन्न होतो. माझ्या अज्ञानाच्या योगानें उत्पन्न झालेली जी माया ती माझ्याच आश्रयानें राहून हा भ्रम उत्पन्न करिते. सारांश सत्यावर असत्याचा आभास होतो. असत्यावर सत्याचा भास होत नाहीं. मायेपासून परब्रह्माची उत्पत्ति नाहीं, तर परब्रह्मापासून मायेची उत्पत्ति आहे. सत्यरूपी,

भ्रमशून्य व निःसंग जें परब्रह्म त्या ठिकाणीं अज्ञानशून्य निष्ठा झाल्यावर अज्ञानाचा स्पर्श ही नसतो. हे नवव्या अध्यायाचें रहस्य आहे.

श्रीधरः—तात्पर्यः निष्ठा निजमैश्वर्यमाश्चर्यं भक्तेश्चाद्भुतवैभवम् ।
नवमे राजगुह्याख्ये कृपयाऽवोचदच्युतः ॥

आपलें आश्चर्यजनक ऐश्वर्य व भक्तीचा अवितर्क्य प्रभाव नवव्या-अध्यायाप्रमाणें कृपाळु अच्युतानें सांगितला.

**मधुसूदन व रंगनाथ—**

**" श्रीगोविंदपदारविन्दमकरन्दास्वादशुद्धाशयाः .**
**संसारांबुधिमुत्तरंति सहसा पश्यन्ति पूर्णं महः ॥**
**वेदान्तैरवधारयन्ति परमं श्रेयस्त्यजन्ति भ्रमं**
**द्वैतं स्वप्नसमं विदन्ति विमलां विन्दन्ति चान्दताम् " ॥**

( श्रीगोविंदपदकमलांतील मकरंदाचा शुद्ध 'मनानें ज्यांनीं आस्वाद घेतला ते लोक संसारसागर उत्तीर्ण होऊन एकदम पूर्ण यशाला पावतात. वेदान्त विचारांनीं त्यांस खरें कर्तव्य कळतें व भ्रम नष्ट होतो. द्वैत, भेदबुद्धि, स्वप्नासारखी खोटी आहे, असा निश्चय होऊन ते परम आनंदाला पावतात.

**नीलकंठ व धनपति**—माझें चिंतन कर; स्त्रिपुत्रादिक विषयांचें चिंतन करूं नको; माझा भक्त हो, धनासाठीं राजादिकांचा व भोगासाठीं इंद्रादिकांचा भक्त होऊं नको. माझ्यासाठीं यज्ञयाग कर, स्वर्गसुखासाठीं नको. असो; या प्रकारचे आचरणानें तुला अभेद मुक्ति मिळेल. '**यथा नद्यः स्यन्दमानाः समुद्रेऽस्तंगच्छन्ति नामरूपे विहाय । तथा विद्वान्नामरूपाद्विमुक्तः परात्परं पुरुषमुपैति दिव्यं ॥**' ( नामरूपाचा त्याग करून नद्या समुद्राशीं एकरूप होतात, तसाच ब्रह्मज्ञ पुरुष नामरूप त्यागून परब्रह्माशीं तादात्म्य पावतो. ) असो; येथें ज्ञेयब्रह्म व तत्साधक सुलभ उपाय सांगितला.

**चतरजी**--परमश्रेष्ठ व निर्विकार परमात्माचें येथें वर्णन आहे. मन्दाधिकाऱ्यासाठीं सगुणध्यानाचाही भक्तिजनक उपदेश आहे.

**द्विवेदी**—सर्वत्र सर्वदा ब्रह्ममय ऐस; मन, वाणी आणि कर्म ब्रह्मपर असूंदे. मोक्ष मिळेल.

**रामानुज**--सगुणपर अर्थ लावितात. तेलाच्या अखंड धारेप्रमाणें माझे ठिकाणी तुझें मन असूंदे. यांचें पर्यवसान अखंडभक्तिपर आहे. ही भक्ति साध्य झाली म्हणजे परमेश्वरसाक्षात्काराला मन समर्थ होतें.

**पंडितांचें** मत पहाः '**यतो वाचो निवर्तंते**' ( जेथून वाणी परत फिरते.) **हा अनुभव । आणि सर्वभूतीं दिसे वासुदेव । ऐसें असोनि सगुण देवाधिदेव । सेव्य जया ॥ तिहींच वाखाणावी गीता ।** हा पंडितांचा पंथ आहे. ॥ ३४ ॥

# अध्याय नववा.

## उपसंहार.

श्रीमद्भगवद्गीतेमध्यें जें उत्कृष्ट गुणसर्वस्व अवतीर्ण झालें आहे त्याचा आस्वाद नवव्या अध्यायामध्येंही ध्यात्रयास सांपडतो. शालीवाहन शकानंतर जे हजारो साधुसंत झाले त्या सर्वांस नववा अध्याय सर्वोत्तम म्हणून वाटत असे, असा लोकप्रवाद आहे. देहावसान व्हावयाचा समय येऊन समाधिस्थ होण्याचा प्रसंग आला असता ज्ञानेश्वरादिक साधुवर्यांनीं नववा अध्याय उघडून तो वाचित असतां समाधींमध्यें प्रवेश केला, असें ऐकिवांत आहे. प्रत्यक्ष भगवानही या अध्यायाच्या प्रथम श्लोकांत म्हणत आहेत कीं 'यांत सांगितलेलें ज्ञानविज्ञान अवगत झालें असतां अमंगल जन्ममरणापासून प्राणिमात्राची सुटका होते तेव्हां

**या अध्यायांत काय सांगितलें आहे,**

याचा विचार करून नंतर पुढील मार्गक्रमणास आरंभ करावयाचा आहे. नवव्या व्याख्यानांत अत्यंत कठिण असें जें अध्यात्मशास्त्र त्याची मीमांसा केली आहे ही मीमांसा केवळ शास्त्रीय अगर शाब्दिक मार्गानें केली आहे असें नाहीं. जें जें काय येथें सांगितलें आहे त्याचा प्रत्यक्ष अनुभव कसा येईल, याचीही दिशा या व्याख्यानांत दाखवून दिली आहे. या सर्वश्रेष्ठ अध्यात्मविद्येचें यथासांग अनुपालन झालें असतां पराकाष्ठेची कष्टप्रद जी जीवयात्रा तिचा अंत होऊन जीवास स्वस्वरूप प्राप्त होतें. भगवान सांगतात कीं ही विद्या अतिशय पवित्र आहे; प्रत्यक्ष समजण्यासारखी आहे; समाजपोषक व व्यक्तितारक आहे; समजण्यास व आचरण्यास सुगम आहे आणि या विद्येचा कधींही नाश होण्यासारखें हिचें स्वरूप नाहीं. सारांश याप्रमाणें सोपी, पवित्र, धर्मशील, विश्वसनीय व जन्ममरण चुकविणारी अशी ही राजविद्या कोणती आहे हें समजण्यासंबंधें अर्जुन जसा आतुर,

झाला असेल, तसेच गीताभक्तही झाले असतील असें समजून मी त्या विद्येचा यथामति ऊहापोह करितों आहें; इकडे वाचकांचे विश्वासपूर्वक अवधान असावें; नसेल तर पुरुषार्थ साध्य न होतां जन्ममरणाच्या दुःखमूलक व दुष्परिणामी चक्राच्या फेऱ्यांत सांपडावें लागेल! अशी इशारत करून मी प्रकृत विषयाकडे वळतों.

## ईश्वराचें गुह्य स्वरूप.

२ येथील चवथ्या, पांचव्या व साहाव्या श्लोकांत भगवंतानीं ब्रह्मरूपाचें वर्णन दिग्दर्शनरूपानें केलें आहें. हें स्वरूप समजून घेणें अत्यंत अगत्याचें आहे. खरा पुरुषार्थ साध्य करावयाचा या हेतूनें आत्मिक उन्नतीचा मार्ग आक्रमण करूं लागण्यापूर्वी, जें स्वरूप आपल्यास साध्य करून घ्यावयाचें आहे त्याची स्थूल माहिती व त्या साध्य वस्तूचें साधन करून देणारा मार्ग ह्या दोन्हीं गोष्टी अवश्यतः समजून घेतल्या पाहिजेत. असो; आतां परब्रह्म स्वरूपाचा विचार सांगितला आहे, त्याचें श्रवण करूं. हें जें आपल्या सभोंवार अनंत विश्वचक्र फिरतांना दिसत आहे, या सर्वविश्वांमध्यें परब्रह्माचें स्वरूप ओतप्रोत व घनदाट भरलेलें आहे. एक पावअंगुळ जागासुद्धां अशी नाहीं कीं जेथें परब्रह्माचें अस्तित्व नाहीं. प्रत्येक अणुरेणु व आकाशसर्वस्व हीं परब्रह्मानें व्यापून टाकिलीं आहेत. पण चमत्कार पहा कीं ज्याला कसल्याही प्रकारचा अवयव नाहीं, कोणत्याही प्रकारचें मूर्तस्वरूप नाहीं, अशा ब्रह्मानें हें दृश्य व मूर्तिमंत असें अनंतकोटी ब्रह्मांड व्यापून ठेविलें आहे! ब्रह्माचें स्वरूप मूर्त नाहीं म्हणून तें बुद्धीपासून स्थूल इंद्रियापर्यंतच्या कोणत्याही इंद्रियास गोचर नाहीं; पण विश्व हें कांहींसें दृश्य आहे, म्हणून तें कांहींअंशीं इंद्रियगोचर आहे. असो; तेव्हां अशा अमूर्त सद्वस्तूनें हें दृश्य ब्रह्मांड सर्वथा व्यापून ठेविलें आहे हा व्यावहारिक दृष्टीनें मोठाच चमत्कार होय! आपल्यासारख्या 'चक्षुर्वै सत्यं' नामक महासिद्धांताचा मात्र आश्रय करणाऱ्या स्थूल दृष्टीच्या जीवांस 'मूर्त व म्हणून दृश्य विश्वास व्यापून टाकणाऱ्या अमूर्त आणि म्हणूनच **ज्ञानगम्य** ब्रह्म वस्तूचा' परिचय होणें दुःसाध्यच होय. गुह्य, गुह्य तें हेंच कीं अमूर्त वस्तु मूर्त पदार्थांस आवरून

धरिते. येथें अश्रद्धा अथवा अविश्वास होण्याचें कारण नाहीं. डोळ्यास दिसतें तेंच खरें असें जर आपण व्यवहारांत मानितों, व डोळ्यास पाहण्याची शक्ति देणारी व विषयास दृश्य करविणारी अमूर्त शक्ति आपल्याजवळ अखंडत्वानें व सर्वव्यापीपणानें राहते असाही जर आपला दृढ विश्वास आहे, तर सर्व विश्वास व्यापून त्याला अस्तित्व देणारी व सर्वत्र आणि सर्वदा अखंडत्वानें राहणारी अमूर्त ब्रह्मवस्तु ' आहे कीं नाहीं ' याबद्दल तरी संशय कां उत्पन्न व्हावा ? असो; तेव्हां अशा रीतीनें विश्वव्यापी अमूर्त सद्वस्तु ओतप्रोत भरलेली आहे असें समजलें ह्मणजे त्या प्रचंड, अगाध व अनंत ब्रह्मसमुद्रांत केवळ लहरींच्या स्वरूपानें विश्व व विश्वांतील भूतें आहेत हें सहजच समजेल. हीं सर्व सूक्ष्म आणि स्थूल भूतें या ब्रह्म वस्तूंत नांदत आहेत असें आपल्यास दिसतें म्हणून या भूतांच्या योगानें ब्रह्मवस्तूस अस्तित्व आलेलें आहे, असें मात्र नाहीं. भूतें आहेतशीं दिसतात यावरून ब्रह्मवस्तु आहे असें ज्ञान अनुमानानें ठरवून घ्यावयाचें हें खरें; पण या भूतांच्या अस्तित्वानें ब्रह्मवस्तु आहे असें मात्र नाहीं. मूर्त पदार्थांनीं ब्रह्मवस्तूचें नियमन होत नाहीं, मूर्त वस्तूमध्यें अमूर्त वस्तु मूर्तत्वानें नाहीं, तर अमूर्त वस्तूच्या अस्तित्वामुळें दृश्य भूतांस अस्तित्व आहेसें भासतें. हा चमत्कार पहिल्यापेक्षांही गुह्यतर होय. सर्व पदार्थांस आश्रय व आधार देऊन त्या पदार्थांमध्यें पदार्थ रूपानें नसणें हा चमत्कार आहे. सर्व दृश्य विश्व अंतर्बाह्यतः व्यापून पुनः त्या विश्वामध्यें परिच्छिन्नरूपानें नसणें हाच हा चमत्कार होय. सूर्याचा प्रकाश सर्व पदार्थांस प्रकाशित करितो, व सर्वांस आंतून बाहेरून व्यापून राहतो म्हणून प्रत्येक पदार्थांतील परिच्छिन्न तेजानें सूर्य हा तेजोगोलक झाला आहे, किंवा पदार्थांतील तेज हाच सूर्य आहे हें जसें आपण व्यवहारांत म्हणत नाहीं, त्याचप्रमाणें सर्व परिच्छिन्न पदार्थांस ' अस्तित्व, भातित्व, व प्रियत्व ' देणारी ब्रह्मवस्तु ही या परिच्छिन्न पदार्थांत परिच्छिन्नत्वानें दिसत व असत नाहीं.

पण यांहीपेक्षां तिसरा चमत्कार गुह्यतम आहे. परब्रह्मामध्यें सर्व भूतें आहेत असें चवथ्या श्लोकांत सांगितलें यावरून आपल्या

साख्याची अशी समजूत होईल कीं परब्रह्म वस्तूला अवयव आहेत व आकार आहे व सर्व पदार्थ एकत्र केले असतां ब्रह्मवस्तु सिद्ध होईल. सारांश कालस्थलाला ही वस्तु गोचर आहे. असा प्रकार नाहीं असें स्पष्टपणानें कळावें, एतदर्थ भूतें 'माझ्यामध्यें नाहींत' असें पांचव्या श्लोकांत सांगितलें आहे. ह्याचें रहस्य असें कीं सर्व वस्तूंचें अधिष्ठान ब्रह्म असल्यामुळें त्या वस्तु ब्रह्मांत आहेत असें दिसतें; परंतु वस्तुतः तशी स्थिति नाहीं. मंदप्रकाशामध्यें एखादी दोरी लांबच लांब पसरलेली असली म्हणजे पाहणारास सर्पाचा आभास होतो हें सगळ्यांस विदित आहे. आतां सर्पाचें जें भासमान अस्तित्व आहे, त्याचें अधिष्ठान रज्जु आहे, म्हणजे त्या दोरीमध्यें सर्प आहे असें आपण व्यवहारांत म्हणूं. पण तीव्र प्रकाशामध्यें तीच दोरी पाहिली असतां तिचें सर्पत्व नष्ट होऊन लांबच लांब दोरी मात्र स्थिरत्वानें राहिली आहे असें स्पष्ट होईल. दोरीच्या ठिकाणीं प्रथमतः सर्प दिसला. तीव्र उजेड आल्यावर सर्प जाऊन दोरी राहिली; तथापि 'निदान सर्पाभास कोठें होता?' असें कोणी विचारल्यास दोरीमध्यें होता असें बोलण्याच्या इराद्यानें आपण दोरीकडे बोट दाखवूं. पण वस्तुतः सर्पत्वच नष्ट होऊन दोरी मात्र राहील. भगवंताचें म्हणणें असेंच आहे. प्रथमतः हें परिच्छिन्न, मर्यादित व कालस्थलास वश असें जग दिसतें; पुढें ज्ञान वाढत जातें तसतसें परमेश्वराचें अस्तित्व निश्चित होऊन जगांत परमेश्वर भरला आहे, असें कळतें व पुढें परमेश्वरांत जग आहे आणि शेवटीं परमेश्वर, परमात्मा, परब्रह्म अशी स्थिति मात्र आहे असें कळतें. असो; हें जें चमत्कारत्रय आहे त्यासच भगवंतांनीं 'योगैश्वर्य' ह्मटलें आहे. भूतांचें अधिष्ठान असून भूतांमध्यें नसणें किंवा आत्मस्वरूपानें भूतांचा 'सर्गस्थितिप्रलय' चालू ठेवणें याचेंच नांव योगैश्वर्य होय.

परमात्मस्वरूप घ्या किंवा परब्रह्मस्वरूप घ्या, त्यांची गूढता सहज उकलण्यासारखी नाहीं. परब्रह्म हें सर्वांचें अधिष्ठान तर आहेच; पण पुनः तें सर्वकारण असून पुनः तें निर्लेपही आहे! तें त्रिगुणातीत आहे. स्वयंभू आहे, पूर्ण आहे, शुद्ध आहे. आपण स्थूलदृष्टीचे पुरुष आहोंत म्हणून हें असलें शब्दातीत, कल्पनातीत, स्वरूप

आपल्यास समजेणें नाहीं. तथापि केवळ दिग्दर्शन करण्यासाठीं लहानसें उदाहरण घेतों. आपल्यास सुखदुःख होत असतां, आपण काम करित असतां, आपण स्वस्थ असतां जर विचार करूं लागलों तर सुखदुःखाचा, कामाचा व स्वस्थतेचा पाहणारा कोणी तरी निराळा 'मी' या स्वरूपानें आहे, करणाऱ्याहून किंवा भोगणाऱ्याहून तो निराळा असून करण्याचा, भोगण्याचा, व वाटण्याचा तो साक्षी आहे, असें आपल्यास विचाराअंतीं कळून येतें. आपण साखर खात असतांनाच जर आस्वादसुखाची मीमांसा करूं लागलों तर गोडीची रुचि घेणाऱ्याहून रुचीचें ज्ञान असणारा व रुचि घेत आहे असें पाहणारा कोणी तरी तटस्थ व उदासीन निराळाच 'मी' आहे असा अनुभव आपल्यास असतो, हें ज्यानें त्यानें स्वानुभवानें ठरवावें. हा साक्षी प्रत्यगात्मा ज्याप्रमाणें प्रत्येक ठिकाणीं हजर असून स्वतः निर्लेप राहतो, प्रत्येक गोष्टीस स्वतः अस्तित्व देऊन पुनः प्रत्येक वस्तूच्या व्यतिरिक्त असतो, त्याचप्रमाणें परब्रह्माची व्यवस्था आहे असें सांगण्याचा भगवदुद्देश आहे.

ह्याप्रमाणें परब्रह्माच्या स्वरूपाविषयीं स्थूलमानानें विचार झाला. हें गूढस्वरूप वाणीनें एकमेकांस सांगतां येण्यासारखें नाहीं; ह्याचें केवळ दिग्दर्शन मात्र करितां येणार आणि तेवढाच प्रयत्न मीही भगवत्साहाय्यानें केला आहे. सारांश भगवत्स्वरूप ओळखण्यास स्वस्वरूपाचा परिचय हवा आणि हा परिचय वेदांतश्रवणादिकांनीं, गुरूपदेशानें व भगवदनुग्रहानें होणार आहे. आपलें स्वरूप, आपला आत्मा, हा निर्लेप-स्वयंभु, सर्वव्यापी, सर्वकारण व सर्वसाक्षी आहे हें कळलें म्हणजे भगवत्स्वरूप कळेल.

## सृष्टिरचना.

२ आपल्या या परिच्छिन्न देहनगरीचें अध्यक्षत्व **जीवाकडे** आहे असें कांहीं काळपर्यंत आपल्यास वाटतें व आत्मिक उन्नतीच्या प्रथमारंभीं तें अध्यक्षत्व कांहीं वेळ जीवाकडे कांहींसें असतें ही; तशीच सृष्टिरचनेच्या व्यवस्थेची घटनाही सर्व ब्रह्मांडाच्या अध्यक्षाकडून, परमेशाकडून होत असते. म्हणजे त्या नित्य चिदात्म्याच्या अस्तित्वानें ब्रह्मांडास अस्तित्व येतें आणि परिच्छिन्न पदार्थांच्या मर्यादित कर्मा-

नुसार ह्या ब्रह्मांडास विविधता व वैचित्र्य येऊन उत्पत्तिविनाशाचें रहाटगाडगें परिभ्रमण करावयास लागतें.

परब्रह्माचे ज्ञानविज्ञान झाल्यावर म्हणजे साक्षात्कार झाल्यानंतर जीवन्मुक्तास 'सृष्टि कां उत्पन्न झाली?' 'कोणीं उत्पन्न केली?' 'कशापासून ती निर्माण झाली?' हे प्रश्न निरर्थक होतात. 'सर्व ब्रह्म आहे' असा साक्षात्कार झालेल्या मुक्त पुरुषास सृष्टि, तिची उत्पत्ति, तिच्या उत्पत्तीचा हेतु इत्यादि कांहीं एक प्रश्न उत्पन्न होत नसून उत्पत्ति, स्थिति, लय नाहीं, अशी एकरसात्मक, अखंड, साक्षीभूत—अशी मात्र—स्थिति असते. उत्पत्तिलय, विषमता, सुखदुःख इत्यादिक त्याला नसतात. त्याची जी अखंड ज्ञानदृष्टि असते, त्या दृष्टीला जन्ममरण नसतें म्हणजे ह्या मुक्त पुरुषाच्या दृष्टीनें कोणी जन्मास येत नाहीं व कोणी मरतही नाहीं. सारांश ज्ञानदृष्टीच्या मुक्त पुरुषाला सृष्टिसंबंधीं सर्व प्रश्न शून्यार्थक आहेत. परब्रह्माची हीच स्थिति असते म्हणून तें परब्रह्म कर्मशून्य, निर्विकार, शुद्ध, बुद्ध, नित्य आणि मुक्त असतें. आणि म्हणूनच तें साक्षित्वानें राहतें असें ९ व १० श्लोकांत म्हटलें आहे. आपणासारख्या मर्यादित दृष्टीच्या पुरुषास दिसणारा उत्पत्तिलय हा ज्ञानदृष्टीच्या पुरुषास व ब्रह्मास विवर्तरूपी भासतो. हें एक आपणासारख्या स्थूल दृष्टीच्या पुरुषांस महागूढ आहे.

परंतु ज्यांस ज्ञानविज्ञान झालें नाहीं, मुख्य पुरुषार्थ साध्य झाला नाहीं, सारांश ज्यांची दृष्टि कमीअधिक मर्यादित आहे, त्यांस वरील प्रश्न अत्यंत महत्वाचे आहेत. जावत्कालपर्यंत जीवांची दृष्टि मर्यादित आहे, तोंपर्यंत पुरुषार्थसिद्धि, तत्संबंधीं साधनें, येथील सृष्टिविषयक चमत्कार यांविषयीं प्रश्न उत्पन्न व्हावयाचे व त्यासंबंधें श्रुति, युक्ति व अनुभव यांस मान्य अशीं उत्तरें देण्याच्या व समजून घेण्याच्या कामीं तो पुरुषार्थी जीव प्रयत्नही करावयाचा. असो; तेव्हां त्याच्या दृष्टीस योग्य म्हणजे त्याला समजेल असें उत्तर भगवान देतात कीं जीवदृष्टीनें भूतांचा अत्यंत नाश होतो, तो प्रकृतीमधील लय होय. उत्पत्ति ही पुरुषदृष्टीनें परमेश्वराकडून म्हणजे परब्रह्माच्या प्रकटस्वरूपाकडून होत असते. ही उत्पत्ति व हा लय भूतांच्या कर्मानुसार होण्याचा

नियम आहे. परब्रह्माच्या साक्षित्वानें परमेश्वर उदासीन राहून प्रकृतीच्या करवीं सृष्टीची उत्पत्ति-स्थितिलयघटना करवितो. ही घटना व विघटना भूतांच्या कर्मानुसार होते. एवंच या सृष्टीला अस्तित्व येतें तें व लय होतो तो भूतांच्या कर्मानुसार होय. सारांश परिच्छिन्न दृष्टीनें पाहिलें असतां खालील सिद्धांत सत्य आहेतसें भासेल. ही सृष्टि अनंत आहे; ( २ ) या सृष्टीचा आरंभ किंवा लय ह्या दोन्ही गोष्टींचें ज्ञान परिच्छिन्न बुद्धीच्या बाहेर आहे, तथापि सृष्टींतील नियमांवरून असें दिसतें कीं येथें रात्रंदिवस घडामोड चाललेली आहे. म्हणजे कोणत्याही परिच्छिन्न वस्तूला ( आकाश आणि काल अपवाद आहेत ) कायमचें असें स्वरूप नाहीं. स्वरूपामध्यें घडोघडीं, क्षणोक्षणीं बदल होत आहे. कोणत्याही वस्तूचा अत्यंत नाश होत नाहीं, केवळ तिच्या स्वरूपामध्यें कमी अधिक फरक होत असतो. ओळखतां येत नाहीं असा फरक झाला म्हणजे आपण त्यास मृत्यु ( नाश ) म्हणतों व दृश्य असें स्वरूप बुद्ध्यादिक इंद्रियांस गोचर झालें म्हणजे जन्म झाला असें म्हणतो. सारांश जन्म म्हणजे प्रथम उत्पत्ति नाहीं व मरण म्हणजे शेवटचा नाश नाहीं. व्यवहाराच्याही तात्विक दृष्टीनें म्हणजे परिच्छिन्न शास्त्रीय दृष्टीलासुद्धां जन्मणारी व मरणारी वस्तु दिसत नाहीं. ध्यानांत ठेवण्यासारखा शास्त्रीय सिद्धांत हा कीं प्रकृति नित्य आहे परंतु चंचल आहे. ही चंचलता चैतन्याच्या साक्षित्वानें होणाऱ्या कर्मानें उत्पन्न किंवा नष्ट होते; म्हणजे या चंचल स्वरूपामध्यें होणारा फरक चैतन्यसाक्षित्वानें होतोसा दिसतो, परंतु वास्तविकतः तो फरक प्रकृतीच्या संगतीनें अभिमान धरून चालणाऱ्या परिच्छिन्नचैतन्याकरवीं होतो. ( ३ ) सर्वांचा अध्यक्ष परमेश्वर आहे. सारांश उघड रीतीनें बोलावयाचें झालें म्हणजे परमेश्वराच्या सान्निध्यानें विश्वघटना व विश्वविघटना होत असून जीव शिव हे कांहींसें निमित्तकारण व कांहींसें उपादान कारण आहेत. परिछिन्न दृष्टीला वासना व अभिमान असतात. ह्यांची गति पुरुषार्थाकडे लागली, अथवा विषयांचा कंटाळा येऊन तद्विषयीं वैराग्य उत्पन्न व्हावयास सुरुवात

झाली, म्हणजे शारीरिक सुखापेक्षां मानसिक सुख जास्त मोलवान वाटूं लागतें, नंतर सत्ता, कीर्ति, इत्यादि मिळवावी असा अभिनिवेश उत्पन्न होतो, पुढें स्वकल्याणाचा मोर्चा मागें सरकून कुटुंबकल्याण लोककल्याण, विश्वकल्याण, इत्यादि पुरुषार्थ साध्य करावे असें वाटून तत्प्रीत्यर्थ प्रयत्न सुरू होतात; ह्यानंतर वासना व अभिमान सर्वथा विगलित होऊन कर्तव्य दृष्टीनें कर्म होतें. ही अशी आपली मानसिक प्रगति चालली असतां प्रथम मूर्तस्वरूपी देवाची, पुढें कल्याणगुणगणमंडित ईश्वराची व नंतर आत्मस्वरूपी परमात्म्याची निःसीम निष्काम भक्ति होत असते. या भक्तीचा उन्नतावस्थेंत प्रथमतः **जग खरें आहे,** नंतर तें ईश्वराधीन आहे, पुढें जगच सर्वथा ईश्वर आहे आणि भक्तीच्या पराकाष्ठावस्थेंत ईश्वरच सर्व आहे आणि शेवटीं सर्व एकच आहे, असें भिन्न भिन्न परंतु उत्कृष्ट, उत्कृष्टतर उत्कृष्टतम भक्तिस्वरूप उज्वलित होतें. सारांश मर्यादित दृष्टीच्या वेळीं जगत् सत्य आहे, असा भास असून आपण त्याचा उपभोग घ्यावा अशा प्रकारचा पुरुषार्थ असतो. या पुरुषार्थानें जन्ममरण चुकत नाहीं. पुढें मानवी शास्त्रपद्धतीनें जगतांचें अनंतत्व सिद्ध होतें व धर्मदृष्टीनें ईश्वर या जगतांचा नियामक असून जीवांच्या कर्मानुसार सुखदुःखांचा धाता आहे, असें समजतें. जन्ममरण येथेंही चुकत नाहीं, जगांत ईश्वर आहे व ईश्वरांत जग आहे या धार्मिक व तात्विक दृष्टींनीं कांहींशी शांति मिळते परंतु संसार मरत नाहीं; परंतु भक्तीची पराकाष्ठा होऊन ईश्वराचा मी निष्काम सेवक, (२) ईश्वराचा निरपेक्ष मित्र, (३) ईश्वराचें मी परिछिन्न स्वरूप व (४) ईश्वर आणि मी एकच अशा क्रमानें आत्मसाक्षात्कार व ब्रह्मसाक्षात्कार होऊन एकरसात्मकता बनली म्हणजे उत्तम ज्ञानविज्ञान होऊन प्राणी मुक्त होतो. एवंच परमेश्वराची भक्ति हें मुक्तीच्या साधनांपैकीं उत्तम साधन आहे. ब्रह्मसाक्षात्कार अद्वैतज्ञानपूर्वक अखंड भक्तीनेंच साध्य व्हावयाचा आहे. असो,

३ परब्रह्माविषयींचा विचार तूर्त एका बाजूस ठेवून केवळ परमेश्वराचाच विचार केल्यास परिच्छिन्न दृष्टीनें विश्वाचा उत्पत्तिकर्ता व सं-

हारकर्ता तोच आहे असें स्पष्ट होतें. येथील जन्ममरणापासून किंवा सुखदुःखापासून सुटका करून घ्यावयाची असेल तर तो परमेश्वर अमूर्त, प्रकृतीचा स्वामी, वासनाशून्य व अभिमानरहित, सर्वसाक्षी, सर्वव्यापी, सर्वशक्ति, इत्यादि अनंत गुणांनीं मंडित आहे असा विश्वास उत्पन्न करून घेतला पाहिजे आणि येथील क्षणिक सुखदुःखांचा त्याग करून निष्काममनानें, त्याची आराधना कर्तव्यतत्परता-बुद्धीनें केली पाहिजे. ही न करितां परमेश्वर आपल्यासारखाच देहाश्रित आहे, त्याचें आर्जव केलें असतां तो स्तुतिवश होऊन भाळण्यासारखा आहे अशा प्रकारच्या मानवीकल्पनांनीं ईश्वरी मूर्ति घडविली म्हणजे कांहीं थोडें-बहुत कल्याण होईल हें खरें, पण पुरुषार्थसिद्धि होणार नाहीं. पुरुषार्थ सिद्धीला निष्काम, निर्लोभ, स्वसुखाभिलाषविरहित अशा प्रकारची आराधना अखंड असली पाहिजे. सकामभक्ती विषय-सुख देईल; व विषयसुखापासून उत्पन्न होणारी क्षणिक शांतिही देईल; पण निर्विषय सुख देण्याचें सामर्थ्य सकामभक्तीला नाहीं. सकामभक्तीच्या पाठीमागें लागलेले लोक **स्वसुखाचे** दास होत. आणि स्वसुखदास म्हणजेच राक्षस किंवा असुर होत. '**मला विषयसुख** हवें' अशी वासना जोंपर्यंत प्रबळ आहे (या वासनेंत संपत्तिसुख, स्त्रीसुख, आरोग्यसुख, पुत्रसुख, कीर्तिसुख, सत्ता-सुख, स्वातंत्र्यसुख इत्यादि सर्व वैषयिक सुखांचा अंतर्भाव होतो) तोंपर्यंत राक्षसी अवतार आहे, कलियुग आहे असें समजावयाचें. सारांश, 'स्वतःचें सुख' हा जोंपर्यंत मानवी प्रयत्नांचा पुरुषार्थ आहे, व तत्प्रीत्यर्थ जीवंत राहणारी वासना व अभिमान जोरदार आहेत, तोंपर्यंत ते ते मानव तमोगुणाश्रित किंवा रजोगुणा-न्वित आहेत असें समजावयाचें आणि तोंपर्यंत कलियुगाचा प्रभाव बलवंत आहे असें ठरवावयाचें. हें ११ व १२ श्लोकांवरून उत्पन्न होणारे विचार मुमुक्षु वाचकांच्या हृदयांत पूर्णपणें ठसतील तर पुष्कळच कार्य होईल. अधिकारानुसार वासनेचा व अभिमानाचा त्याग करावयाचा व परमेश्वराची भक्ति करावयाची ती 'मला अमुक दे, तमुक नको' ह्या सकाम बुद्धीची नसून 'माझें कर्तव्य निष्का-

मत्त्वानें होईल' अशा प्रार्थनापुरःसरत्वानें व्हावयाची, हें तत्व व हें रहस्य त्यांच्या मनांत बिंबेल तर पुरुषार्थ-साधनाच्या मार्गाला ते येऊन भिडले ते जवळ जवळ आले असें म्हणण्यास हरकत नाहीं.

अधिकारानुसार वासनात्याग होऊं लागला व अभिमानशून्यता येऊं लागली म्हणजे क्रमाक्रमानें परमेश्वराचें कीर्तन, परमेश्वराचें ध्यान, त्याविषयीं नम्रबुद्धि, व त्याचें अखंड स्मरण इत्यादि कर्तव्यें निष्कामत्वानें होऊं लागतात. सर्व 'सृष्टीचा चालक तो आहे, तो स्वतः निर्विकार आहे, जगताची घडामोड त्याच्या सत्तेनें होत असून विश्वव्यवस्थेंत मी निमित्तमात्र आहे. स्वतःसंबंधें परमेश्वराचें निष्काम भजनपूजन करणें म्हणजे निर्लोभ मनानें प्राप्त झालेलें शास्त्रविहित कर्तव्य निर्लोभबुद्धीनें करणें, निदान प्रयत्न करणें येवढें कायतें माझ्या स्वाधीन आहे, तो परमेश्वर सर्व कल्याणगुणगणमंडित असून त्याचें भजनपूजन अनन्यभावानें अखंड केलें तरच त्याची प्राप्ति होऊन माझी सुटका व्हावयाची आहे ( मला कर्तव्यकर्तृत्वाचें समाधान मिळण्यासारखें आहे )—अशा प्रकारची सात्विक वृत्ति उत्पन्न होईल. ही वृत्ति झाली असतां तुकारामादिक महासाधूंप्रमाणें आपण परमेश्वरी गुणांचें कीर्तन करूं, त्यास अनन्यभावानें आळवूं, त्याचें अनन्यध्यान करूं आणि निर्मळ चित्ताचे होऊं.

याप्रमाणें शुद्धचित्त झाल्यानंतर सर्वत्र ईश्वर भरला आहे, सर्व कर्ताकरविता तो आहे, सृष्टिनियामक तोच आहे, आपल्यास तारणारा तोच आहे, आपले आईबाप, आपले इष्टमित्र तोच असून आपल्यास शरणस्थान तोच आहे, आपला खरा स्नेही तोच आहे व आपल्यास जो पुरुषार्थ साधावयाचा आहे तोही तोच आहे; सारांश परमेश्वराव्यतिरिक्त कांहीं नाहीं, सृष्टि तो, सृष्टिनियामक तो, उपास्य तो, उपासक तो, उपासना तो आणि उपास्य द्रव्येंही तोच, अशी सर्वत्र ईश्वरी भावना होऊन आपल्या हातून जें काय कर्तव्य होत जाईल तें परमेश्वररूपानेंच होत जाईल, अशी अखंड भक्ति एकनिष्ठ मनानें झाली, वेदांतश्रवण, गुरूचा अनुग्रह आणि परमेश्वरी कृपा झाली म्हणजे साक्षात्काराचा अधिकार आपल्यास प्राप्त होतो.

हा अधिकार प्राप्त झाला, पूर्ण अद्वैत स्थिति विचारांत, उच्चारांत व आचारांत बाणली म्हणजे उपास्य स्वरूप व उपासक स्वरूप हीं वस्तुतः एकच आहेत, असें ज्ञान होऊन पुढें साक्षात्कार होईल आणि प्राणी मुक्त होईल.

सगुणभक्तीचें महात्म्य या प्रकारचें आहे. सगुणानंतर निर्गुणज्ञान वेदांत विचारानें कसें साध्य होतें हें मागें सांगितलेंच आहे. असो; तेव्हां आपला अधिकार निरहंकारपणानें समजून घ्यावयाचा हें मोक्षार्थी पुरुषाचें पहिलें कर्तव्य आहे. नंतर वासनात्याग (वैराग्य), अहंकारशून्यता (कर्तृत्वाचा अभिमान नसणें) ह्या पायऱ्या चढून तत्पदाचा म्हणजे विश्वाचा व विश्वनियामकाचा विचार शास्त्रीयपद्धतीनें करावा. हा विचार शास्त्रशुद्धमार्गानें करीत असतां ईश्वराचें अखंड अस्तित्व सर्वत्र दिसूं लागेल, ईश्वराचें गुणानंत्य प्रकट होईल, पूज्यबुद्धि उत्पन्न होऊन तिचा उत्कर्ष होईल आणि नित्य व एकनिष्ठ ध्यानाचा अभ्यास सुकर होऊन बुद्धीला उत्तम संस्कार मिळतील. पुढें वेदांतविचार सुरू केला म्हणजे द्वैतभावना सर्वथा नष्ट होऊन अद्वैत बाणेल. हें या अध्यायांतील भक्तीचें रहस्य आहे.

## सकामभक्ति.

४ पण सामान्यतः बहुतेक जीवांस वरील तत्त्व समजण्याचा अधिकार प्राप्त झालेला नसतो. उघडच आहे कीं सृष्टीच्या उत्पत्तिकालापासून आपल्या जीवाबरोबर साहचर्यानें वाढलेल्या वासना व मित्रत्वानें आपली पाठ न सोडणारा अहंकार या उभयतांची व आपली ताडातोड करण्याचें काम पुष्कळांच्या हातून होण्यासारखें नसल्यामुळें पूर्ण निष्कामभक्तीचें रहस्य फारशा लोकांस समजत नाहीं. प्रकृतीच्याच साम्राज्यांत राहून त्या सर्वशक्ति व सर्वगामी प्रकृतीच्या विरुद्ध बंड करावयाचें व त्यांत विजयसिद्धि संपादन करावयाची, तिला आपल्या स्वाधीन करून घेऊन त्या जड प्रकृतीला चैतन्यस्वरूप द्यावयाचें हें सामान्य वीरांचें काम नव्हे. शिवाय स्वार्थत्यागाच्या शिक्षेमध्यें उत्तम निष्णात झालेल्या म्हणजे कसलेल्या वीरांसही अनेक जन्मपर्यंत अखंड श्रम करावे लागतात, तेव्हां वरील गोष्ट साध्य होते!

तेव्हां अर्थातच असल्या घनघोर संग्रामाचें स्थळ अपिल्यासारखे सामान्य लोक पाहण्याची इच्छा करीत नाहींत. रणस्तंभाजवळ छातीनें उभें राहून अद्वैताचा शुभ्र व निर्मळ झेंडा संभाळण्याची गोष्ट फार लांब, ह्याची वार्ताच नको!! नुसता कामाचा हल्ला आल्याबरोबर दांतीं तृण धरणें हें मात्र आम्हांस साहजिक होय. सारांश आमच्यासारख्यांनीं स्वार्थाची मर्यादा थोडीशी विस्तृत केली, वासनेचा थोडासा त्याग केला, अभिमानास थोडेंसें शून्यत्व आणिलें ह्मणजे मिळविली! सारांश प्रकृति नामक शत्रूस तोंड न दाखवितां व तिच्या समोर उभे न राहतां कोठें तिचें एखादें घोडें पळीव, एखादा लुंगा सुंगा शिपाई धरून आण, तिची दाणावैरण बंद कर.' अशा प्रकारची पद्धति चालविली, तर भाग्य म्हणावयाचें! पण आम्ही असले शेंदाड शिपाई आहोंत कीं इवलामा स्वार्थत्याग केल्याबरोबर तट फुगून जाऊन 'आम्ही यंव केलें, त्यंव केलें' अशा फुशारक्या मारावयास लागतों आणि जो अभिमानत्याग आम्हीं केला असें म्हणतों त्याच्या अनंतपट अभिमानाचें ओझें आपल्या खांद्यांवर वाहावयास लागतों! इतकेंच नव्हे तर बक्षिसेंही मागावयास लागतों! याला का स्वार्थत्याग, विषयवैराग्य, अभिमानशून्यता ह्मणावयाचें?

पण असल्या सकाम भक्तीबद्दलही ईश्वराच्या न्यायी राज्यांत बक्षिसें मिळतात. प्रकृतीला थोडासा धक्का देणाऱ्याला सुद्धां ईश्वराच्या चैतन्यात्मक अमदानींत बक्षीस मिळतें. यज्ञयाग करणारे लोक यास पंथांतील होत. 'आजची पोळी उद्यां खाऊं' असें म्हणणारांपैकीं हे लोक होत. यांच्या या मृत्युलोकांतील यज्ञयागांनीं (स्वार्थत्यागानें) पुष्कळ कार्यसिद्धि वास्तविक पाहिलें असतां व्हावयाची. पण 'आह्मांस स्वर्गसुख हवें, पुत्र हवा, द्रव्य हवें, कीर्ति हवी,' अशा मागण्यांच्या वजनांनीं हा स्वार्थत्याग दडपून जातो. असो; ह्या पुरुषांस ह्यांच्या क्षणिक विषयवैराग्याबद्दल बक्षीस मिळतें; पण काय? तें अर्थातच कालभंगुर असतें. जितकी पुण्याई असेल तितक्या कालपर्यंत सुखोपभोग घेतला म्हणजे हे जीव पुनः जन्ममरणाच्या चक्रांत येऊन पडतात! एवंच, वासना आहे, अहंकार आहे, तोंपर्यंत ह्मणजे

वासनेसहित व अभिमानासहित असणाऱ्या जीवांच्या हातून झालेला स्वार्थत्याग आत्मिक उन्नतीच्या अंशतःही उपयोगी पडत नाहीं. विषयाची आशा केली व तो मिळण्यासाठीं योग्य प्रयत्न केले तर तो विषय प्राप्त होईल हें खरें; पण विषय हा चैतन्यात्मक नाहीं ह्मणून अनित्य आहे; अतएव प्राप्त झालेला विषय नष्ट होतो आणि नष्ट झाला ह्मणजे दुःखप्राप्ति होते. तात्पर्य: विषयाची आराधना जोंपर्यंत आहे तोंपर्यंत चिरकाल टिकणारें अखंड स्वास्थ्य मिळणें नाहीं. खरेंच आहे: अग्नीचा उपशम व्हावा या हेतूनें आपण जर त्यांत तेल तूप ओतूं लागलों तर जसा न विझतां अग्नि जास्तच प्रज्वलित होतो, त्याप्रमाणें शांति मिळण्यासाठीं जर आपण विषयोपभोगाची योजना केली तर स्वार्थ अथवा शांति न मिळतां उलट उपभोगतृष्णा मात्र वाढण्याचा संभव, नव्हे निश्चितपणा, आहे. म्हणून भगवंतांनीं २१ व्या श्लोकांत सांगितलें आहे कीं 'विषयेच्छा धारण करणाऱ्या लोकांनीं वेदविहित जरी सर्व कर्मे केलीं किंवा आशापूर्णचित्तानें पुरुषार्थाचा मार्ग शोधिला तरी मुख्य फल जें शांति तें न मिळतां जन्ममरणाची यात्रा मात्र या कामुक भक्तांच्या पाठीवर बसेल. उघडच आहे: काम म्हणजे विषयेच्छा होय. आपण देहमर्यादितच आहों अशी परिच्छिन्न कल्पना आपली असली, असा आपला निश्चय असला म्हणजे आपण अपूर्ण आहों, आपल्यास हें हवें, तें हवें, अशी इच्छा उत्पन्न होऊन तत्प्राप्त्यर्थ आपले प्रयत्न सुरू होतात. प्रयत्नांतीं फल मिळालें तर सुख होतें; यश नाहीं मिळालें तर दुःख होतें. हीं दोन्ही कालभंगुरच असतात. तथापि अभिमान कायम असतो म्हणून सुखाचा वियोग आणि दुःखाचा संयोग हे दोन्ही तळमळ उत्पन्न करितात; अर्थात् शांति नाहींशी होते. तेव्हां मिळविलेल्या फलापासून उत्पन्न होणारें सुख, शांति देणारें नाहीं; शांति हवी असेल 'तर विषय अनित्य आहेत; विषयोपभोगानें देहाची, इंद्रियांची मनाची व बुद्धीची तृप्ति न होतां तळमळ वाढते; जीवाच्या आध्यात्मिक उन्नतीचें कार्य होत नाहीं; म्हणून विषयोपभोग नको' अशा प्रकारचें वैराग्य उत्पन्न होऊन तें स्थिर झालें पाहिजे. शांति हवी,

असेल तर 'मी पूर्ण आहें किंवा असलों पाहिजे; मी कर्ता व भोक्ता नाहीं किंवा नसलों पाहिजे; मी परिच्छिन्न नाहीं किंवा नसलों पाहिजे; सारांश मी नित्य, शुद्धबुद्धमुक्त आहें, किंवा असलों पाहिजे' अशा तऱ्हेचा निश्चय अध्यात्मिक श्रवणमननानें व निदिध्यासानें साध्य होईल असा प्रयत्न कर्तव्यतत्परतेनें केला पाहिजे. आपली वासना मोडण्यासाठीं परहिताच्या पाठीमागें निरभिलाषबुद्धीनें लागलें पाहिजे. अहंकार नष्ट करण्यासाठीं विश्वाचा, विश्वांतील घडामोडींचा, विश्वनियमांचा, व विश्वनियामकाचा शास्त्रतः विचार करून विषयासंबंधानें आपल्यास बिलकूल कर्तव्य-सामर्थ्य नाहीं, ह्या सृष्टिव्यवस्थेंत आपण केवळ पंगु आहोंत, निमित्तमात्र आहोंत, सर्व सामर्थ्य एका परमेश्वरास मात्र आहे, परमेश्वरी कृपा होईल तसतसा मीही प्रकृतीचा स्वामी होत जाईन, असा निश्चय ज्ञानविज्ञानानें करून घेतला पाहिजे. स्वेतरांचें खरें कल्याण करणें व कल्याण करीत असतां अहंकाराचा व सिद्धिजन्य सुखाचा आणि असिद्धिमूलक दुःखाचा त्याग केला पाहिजे. हें ईश्वराच्या भक्तीचें एक अंग आहे. सृष्टिनियम अबाधित आहेत, सृष्टीची उत्पत्ति जीवांच्या उन्नतीसाठीं दयाळु परमेश्वरानें केली आहे व दयाघन परमेश्वराचें अखंड ध्यान भक्तिपूर्वक केल्याशिवाय आपलें दुर्बलत्व, आपलें अकिंचिज्ञत्व आपल्यास स्पष्ट व्हावयाचें नाहीं व हें स्पष्ट झाल्याशिवाय ईश्वराविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न होणार नाहीं. ही पूज्यबुद्धि पराकाष्ठेला पोहोंचली म्हणजे वासना निर्मूळ होते व अहंकारही सकारण नष्ट होतो. पुढें 'ईश्वर म्हणजेच मी' असा ज्ञानविज्ञानासह निश्चय होऊन हा पुरुष सर्वथा मुक्त होतो. एवंच निष्कामता, अहंकारत्याग, तत्त्वाचें पूर्णज्ञान आणि अखंड उपासनेनंतर अखंड अद्वैतनिश्चय हीं मुक्तीचीं साधनें आहेत.

### परमेश्वराची निष्काम भक्ति.

६. हा बोध ज्यास झाला तेच अनन्यभक्त होत. हेच जीवन्मुक्त पुरुष होत. यांचें सर्व योगक्षेम भगवान चालवितात हें आतां सांगण्याचेंसुद्धां कारण नाहीं. ( १ ) कारण ते स्वतःच परमेश्वर-स्वरूपी झालेले असतात; ( २ ) त्यांस वासनारूपानें किंवा अहंकाररूपानें

कोणत्याही गोष्टीची अपेक्षा नसते; ( ३ ) त्यांस सदासर्वदां समाधान, खरें समाधान, असतें. सारांश त्यांचा देहच चिन्मय बनून जातो व त्यांचें अस्तित्व केवळ जगदुद्धारासाठीं व लोकसंग्रहासाठीं असतें. अद्वैतज्ञानी भक्त ते हेच होत.

## अन्य देवतांची निष्काम भक्ति.

७. यावरून दुसरी भक्ति कुचकामाची आहे असें मात्र समजूं नये. कोणत्याही योग्यतेची कां असेना, पण भक्ति ही वस्तु मोलाची आहे. श्रद्धायुक्त निष्कामभक्ति असेल पण पूर्णज्ञान झालेलें नसेल तर मोक्षाचें साधन व्हावयाचें नाहीं हें खरें; तथापि मोक्षमार्गाला नेणारी ही निष्कामभक्ति होईल. परिछिन्न देवतांची निष्काम आराधना केली असतां चित्तशुद्धि होते हें खरें; पण आराध्य दैवतच प्रकृतिमिश्रित असल्यामुळें 'मोक्ष' नामक पुरुषार्थाची जोड त्यांच्याकरवीं होत नाहीं. ज्या देवतेचें जसें आपण आराधन करूं तसें ती देवता आपल्यास फल देईल. परमेश्वराखेरीज ज्या इतर देवता आहेत, त्यांचें स्वरूप मर्यादित असले कारणानें, त्यांची सत्ता कालदेश परिच्छिन्न असल्यामुळें आणि त्या स्वतःच प्रकृतीला वश असतात म्हणून, त्यांची कितीही निष्काम भक्ति केली तरी तिच्यायोगें इष्टकार्याची सिद्धि होणार नाहीं. म्हणजे जन्ममरण चुकणार नाहीं व पूर्ण शांति मिळणार नाहीं. उघडच आहे कीं ज्या देवता स्वतःच मरणाधीन आहेत; विकारवश आहेत, कामदेवाच्या ताब्यांत आहेत, त्या बिचाऱ्या स्वभक्तांस कशाची शांति देणार? त्यांचा जन्ममृत्यु कसा चुकविणार? किंवा लोभद्वेष कसा नाहींसा करणार? या देवतांची भक्ति प्रथमारंभीं युक्त होते. पण मनुष्य जीव जसा जसा जास्त सुसंस्कृत होतो, सृष्टीचें ज्ञान जसें फांकत जातें, तसा तसा त्याचा बुद्धिगोल विस्तृत होत जातो हा अनुभव आहे. व याचें विवरण ६ व्या अध्यायाच्या उपसंहारांत केलेंही आहे. असो; ही निष्कामभक्ति परमेश्वराच्या वरीं रुजु असते व भक्त्यनुसार व उपास्य-स्वरूपाच्या ज्ञानानुसार त्या त्या भक्तास फल मिळतें. हें फल उत्तम प्रतीचें नसल्यामुळें ते काल-विध्वंसी असतें हें ध्यानांत ठेवून ईश्वराचें पूर्ण

स्वरूप समजून घ्यावें. ज्ञानाची अवश्यकता आहे ती येवढ्याचसाठीं! ज्ञानाशिवाय मुक्ति मिळत नाहीं याचा तरी अर्थ हाच आहे. सर्व-कर्ता—करविता परमेश्वर आहे, सर्वत्र तोच ओतप्रोत भरला आहे, तो शुद्ध नित्य, बुद्ध व मुक्त आहे, तो सर्वसाक्षी आहे, असें ज्ञान करून घेऊन जेव्हां त्याची सातव्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें निःसीम भक्ति करावी तेव्हां त्याचें स्वरूप समजेल, विज्ञान होईल, साक्षात्कार होईल आणि मोक्ष मिळेल. इतर देवतांच्या हातून हें कर्म होणार नाहीं.

## म्हणून परमेश्वरभक्ति करावी.

८ निष्कामभक्ति असली, ईश्वरी स्वरूपाचें पूर्ण ज्ञान झालें, म्हणजे त्या जगदीशास भक्त जें काय अर्पण करितील तें प्रियच असतें. कारण त्याचें सर्व कर्म परमेश्वरार्पण बुद्धीनें होत असतें. त्यांचा स्वाभिमान नष्ट होऊन दृष्टि अमर्याद झालेली असते. 'स्वतःचें अस्तित्व' ज्ञानपूर्वक नष्ट केल्यावर पापपुण्याचा विचार अर्थशून्य होतो. सारांश त्यांचें करणें, त्यांचें बोलणें, त्यांचें मानणें, सर्व ईश्वर-पर असतें. स्वतःचा अभिमान ज्ञानपूर्वक नष्ट झाला म्हणजे संसार संपतो. मग असल्या पुरुषांस सर्व विश्व परमेश्वरी स्वरूपानें भरलेलें दिसतें. कर्म करित असूनही त्यांचा संन्यास सिद्ध होतो. असल्या भक्तांची योग्यता भगवंतांनीं एका शब्दांतच सांगितली आहे, ती ही कीं 'ते माझे आत्मेच होत.' हे भक्त केवळ जगदुद्धारक होत. भाग्यवंत देशांत व भाग्यवंत कुलांत असल्या महात्म्यांचा जन्म व्हाव-याचा. यांच्या विश्वव्यापी संसारयात्रेनें सर्व विश्वच मोक्षमार्गाकडे वळत असतें. सरकारी अमलाच्या दपटशाहानें, सामाजिक बंधनांनीं, धर्माच्या अविज्ञात विधिनिषेधांनीं जीं कार्यें कधींहीं व्हावयाचीं नाहींत, तीं कार्यें या महाभक्तांकडून लीलेनें सहज होत असतात.

## अमोघ ईश्वरी दयाघनत्व.

९ ईश्वर हा निःपक्षपाती आहे. लाघवी पुरुषांस तो वश होतो व दुराचारी पुरुषांचा तो तिरस्कार करितो, असला प्रपंच त्याचें घरीं ना-हीं. ज्याचें अंतःकरण शुद्ध, ज्याची निष्ठा उत्तम, ज्याचें ध्यान प-रमेश्वराकडे एकाग्र झालें, तो पूर्वजन्मीं किंवा पूर्वकाळीं जरी पापपुरुष

असला तथापि तो ईश्वराच्या धर्मराज्यांत साधु पदवीस अधिकारानुसार प्राप्त होतो. हें तत्त्व ख्रिस्ती धर्मपुस्तकांत किंवा मुसलमानी पुस्तकांत आहे असें ऐकिवांत नाहीं. ईश्वरानें न्यायाच्या समयीं जी शिक्षा ठोठावली ती कायमची असा त्या पुस्तकांतील आशय आहे, असें ह्मणतात. हें जर खरें असेल तर अर्थातच कृष्णप्रणीत वेदांतोक्त धर्म श्रेष्ठ आहे, असें ह्मणावें लागेल. अत्यंत पापकर्मे करून धर्मबाह्य झालासा दिसणारा प्राणी जर कधीं काळीं ( आहे त्या जन्मीं अगर पुढील जन्मीं ) उपरत झाला, विषयवैराग्य होऊन तो जर भक्तिपंथास, निष्काम भक्तिपंथास, ज्ञानपुरःसर निष्काम भक्तिपंथास, ज्ञानध्यानपुरःसर निष्काम भक्तिपंथास क्रमशः लागला, त्याचें चित्त शुद्ध होऊन वासना व अहंकार यांनीं हकुहळू ' यःपलाय ' केलें, त्याला जर अद्वैतज्ञान झालें, तर असा पूर्वीचा पापकर्माहि मोक्षपदवीस पोहोंचूं शकेल ! वाहवा ! काय या गीताप्रणीत धर्माची थोरवी वर्णन करावी ? सर्व धर्मांनीं टाकून दिलेल्या प्राण्यानें जर कदाचित् गीतोक्त अमृताचें सेवन यथाशक्ति करून तेथें सांगितलेलें पथ्यकर आचरण ठेविलें तर तो तसला पापीही मुक्त होण्याची सवलत ज्या धर्मांत दिली आहे; त्याचें कौतुक करावें तरी किती ? विशेषतः मनुष्यास प्राप्त झालेल्या इच्छास्वातंत्र्याचा, ज्ञानस्वातंत्र्याचा व वर्तनस्वातंत्र्याचा कितीहि वेळ त्याच्या हातून दुरुपयोग झाला तथापि जर त्याच्या मनांत दृढपणानें आपलें वर्तन शुद्ध करावयाचें येईल, जर त्यास केव्हां तरी अनुताप होईल तर त्यांस श्रेष्ठमार्गानें जाण्याची क्रमशः मोकळीक आहे. इतकेंच नव्हे ! तर त्याचा एकनिष्टपणा कायम राहिल्यास त्यांत निश्चितपणानें त्याला मोक्षही मिळेल! पुनर्जन्मासंबंधें, मूर्तिपूजेसंबंधें अत्यंत कडक टीका करून वेदांतधर्माचा उपहास करण्याचें अखंड व्रत ज्यांनीं एकनिष्ठेच्या बाण्यानें चालविण्याचा विडा उचलिला आहे, त्यांनीं शांतपणांनें, निःपक्षपातीपणानें, शुद्ध चित्तानें, श्रेष्ठपुरुषार्थाचा सावकाश, सयुक्तिकतः व अनुभवासह विवेकपूर्वक विचार केला असतां त्यांस अढळून येईल कीं वेदांतप्रणीत अद्वैतसिद्धांताच्या श्रुतिविहित, युक्तिशुद्ध व अनुभवजन्य अशा मार्गाला लागण्यासाठीं जीं अनेक

साधनें सांगितलीं आहेत तीं यथायोग्य असून अवश्यक आहेत. सारांश अत्यंत अवघड दिसणारा मोक्षमार्ग श्रीमद्भगवतप्रणीतमार्गानें कंठीला असतां कोणासही इष्टग्रामास, सुखधामास, शांतिगृहास, जातां येईल. ' माझ्या भक्तांचा नाश कधींही होत नाहीं. ' ही कधींही न मालविली जाणारी स्वयंप्रकाश मशाल घेऊन जर आमचे 'ब्राह्मण' म्हणवून घेणारे वेदांतभक्त आपल्या बरोबर घेऊन जगदोद्धारासाठीं एकनिष्ठ भक्तीनें व कर्तव्यतत्परतेनें बाहेर पडतील व सात्विकतः अखंड प्रयत्न करितील तर बिशाद काय आहे कीं कोणत्याही देशांतील कसलाही नाठाळ प्राणी विषयोपभोगाच्या अथवा निराशेच्या अंधकारामध्यें दडून राहील ! सारांश भगवंतांच्या आश्रयाचा ज्यांस एकदां सद्गुरुमुखानें लाभ झाला ते शूद्र असोत, पापी असोत, प्रत्यक्ष स्त्रियाही असोत, त्या सगळ्यांचा उद्धार होणें शक्य आहे. इतकेंच काय, पण संभवनीय आहे; किंबहुना निश्चितच आहे असें प्रत्येक सुजाण मनुष्यानें समजावें. वाचकहो ! नवव्या अध्यायांतील ३४व्या श्लोकाचें व १८व्यांतील ६५व्या श्लोकाचें नित्यशः एकाग्रमनानें मनन व तदनुरूप आचरण करण्याचें व करविण्याचें मनावर घ्याल तर आपल्यास या मृत्युलोकच्या अत्यंत कष्टमय संसारांत रात्रंदिवस पोळून काढणारी तळमळही कारणासह जळून खाक होईल आणि 'जगीं सर्व सुखी असा कोण आहे ? ' असे प्रापंचिकांच्या सुखासंबंधानें सानुकंप उद्गार काढणारे साधुश्रेष्ठ समर्थ **रामदास** अथवा

> ' In such a world, so thorny, and where none
> Finds happiness unblightede, or, if found,
> Without some thistly sorrow at its side ... '

असे उद्गार काढणारा कवि **कौपर** या उभयतांचें स्वानुभव एकीकडे सारून देऊन

**आनन्दं ब्रह्मणो विद्वान् न बिभेति कदाचन**

( ब्रह्मानंदाच्या अनुभवी पुरुषास कसलेंही भय उरत नाहीं. )

या तैत्तिरियोपनिषदाची सार्थकता करणारा एकच धर्म आहे आणि

तो श्रीमद्भगवत्प्रणीत गीताशास्त्रांतील धर्म होय; असा आपला निश्चय होईल, यांत मला तरी संदेह वाटत नाहीं.

## तात्पर्य.

१०. असो; हें विषयांतर होय. नवव्या अध्यायामध्यें ब्रह्मस्वरूपाचें गुह्य, सृष्टिरचनेचें गुह्य इत्यादि गुह्यें प्रकट करून इष्टतम पुरुषार्थ जो मोक्ष त्याचें साधन निष्कामभक्तिपूर्वक अद्वैतज्ञानानें कसें होतें हें सांगितलें. त्या साधनाला साध्य करून देणारे जे मार्ग आहेत तेही सामान्य प्रतीच्या भक्तांसाठी आहेत. यांचें मननपूर्वक 'वाचन जर होईल तर गीतोक्त मोक्षमार्ग उत्तम, पवित्र, अनुभवयोग्य धर्मविहित व सवघड आहे असें प्रत्येकास समजेल.

पहिला भाग समाप्त.

शुभं भवतु.